आगरकरांची स्वतंत्र बुद्धी परंपरा व राजशासन या दोहोंचेही प्रसंगी उल्लंघन करून आपली सत्यनिष्ठा कायम ठेवावी, या मताचा पुरस्कार करीत होती. याच त्यांच्या स्वतंत्र बुद्धीमुळे त्यांनी जहाल राजकारण व जहाल समाजकारण, यांची मुहूर्तमेढ महाराष्ट्रात रोविली, आणि आपल्या संस्कृतीच्या गुणानुवादात तिचे दोष विसरू नका व जगातील इतर राष्ट्रातील यशस्वी सामाजिक व राजकीय तत्त्वांचा आनंदाने स्वीकार करा, असा उपदेश महाराष्ट्रीयांना केला.

—आचार्य शं. द. जावडेकर



**गोपाळ गणेश आगरकर**

जन्म १४ जुलै १८५६)  (मृत्यू १७ जून १८९५

# आगरकर - वाङ्मय

## खंड १

(सुधारणाविभाग - पूर्वार्ध)

संपादक
म. गं. नातू
दि. य. देशपांडे




महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.



प्रकाशक :
सचिव,
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ
मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय इमारत,
१७२, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय मार्ग,
दादर, मुंबई - ४०००१४.



प्रथमावृत्ती : जानेवारी १९८४
पुनर्मुद्रण : डिसेंबर, १९९९







मुद्रक :
स्नेहेश प्रिंटर्स,
३२०-अ, शाह अँड नाहर इंड. इस्टेट अ-१,
धनराज मिल आवार, सिताराम जाधव मार्ग,
लोअर परळ, मुंबई-४०० ०१३.



किंमत : रु. १८४/-

# निवेदन

महाराष्ट्रातील सुधारकाचे अग्रणी गोपाळ गणेश आगरकर यांचे वाङ्मय कित्येक वर्षे अत्यंत दुर्मिळ झाले आहे. या लेखनाचे अभ्यासपूर्वक संपादन करून ते श्री. म. गं. नातू आणि दि. य. देशपांडे यांनी प्रथम महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या सहकार्याने १९८४ मध्ये प्रसिद्ध केले. आगरकरांची विवेकवादी जीवनदृष्टी आणि समतावादी तत्वज्ञान उमजूनही समाजाच्या पचनी पडले आहे असे वाटत नाही. आजही या थोर समाजसुधारकाचे विचार समाजाने पूर्वग्रहरहित दृष्टीने समजावून घेण्याची गरज आहे. म्हणून आगरकर वाङ्मयातील सुधारणा विभाग - पूर्वार्ध या ग्रंथाची दुर्मिळ झालेली नवीन आवृत्ती आज महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ पुनर्मुद्रित करीत आहे. चिकित्सक वाचक याही आवृत्तीचे मन:पूर्वक स्वागत करतील असा मला विश्वास वाटतो. पुस्तकाचे मुद्रक, स्नेहेश प्रिंटर्स, मुंबई यांनी पुस्तकाची छपाई वेळीच करून दिल्याने तसेच मंडळाचे सचिव, चंद्रकांत वडे यांनी या पुस्तकाच्या छपाईच्या कामात स्वत: लक्ष घातल्याबद्दल त्यांचेही आभार.

**द. मा. मिरासदार**
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई.

आश्विन, शुद्ध नवमी, १९२१
दसरा, १९९९
(१९ ऑक्टोबर, १९९९)

## प्रस्तावना :

उत्पादनाच्या साधनांत जसजसा बदल होत जातो तसतसा इतिहासात पण बदल होत जातो, ही कार्ल मार्क्सने एक महत्त्वाची गोष्ट सांगितली आहे. 'ज्ञान' हेही एक प्रकारचे उत्पादन मानले तर ज्ञान मिळविण्याच्या साधनांत, प्रक्रियेत, जसजसा बदल होईल तसतसा सामाजिक इतिहासाच्या जडणघडणीत पण बदल होईल हे उघड आहे. इ. स. १८१८त पेशवाईचा शेवट होऊन इंग्रजांची सत्ता महाराष्ट्रात सुरू झाली. १८३५ साली लॉर्ड मेकॉलेने इंग्रजी शिक्षणपद्धती या देशात आणली. त्यायोगे येथील ज्ञानक्षेत्रात क्रांतीकारक बदल घडून आला. याविषयी शंका नाही. हा सर्व बदल सामाजिकच होता. अर्थात या बदलाला राजकीय पुटे पण होती. कारण ज्याला आपण 'राजकीय' म्हणतो तोही सामाजिक प्रक्रियेचाच एक भाग असतो. पण इतिहासाच्या काही कालखंडांत राजकीय पुटे अधिक तीव्रतेने जाणवतात. विशेषत: ज्या देशात राजकीय स्थित्यंतर झालेले असते, एक सत्ता जाऊन दुसरी सत्ता आलेली असते, त्या ठिकाणी सामाजिक प्रश्नांची राजकीय पुटे स्वतंत्र रूपाने उभी राहतात; आणि त्यातून राजकीय प्रश्न जणू काही स्वतंत्र प्रश्न आहे, असा आभास उत्पन्न होतो. १८१८ त पेशवाई संपली, १९४७ त इंग्रजी सत्ता संपुष्टात आली. या सव्वाशे वर्षात एक दशकसुद्धा असे गेले नसेल की, जेव्हा देशाच्या काही भागात राजकीय उद्रेक झाले नाहीत. त्यात आपल्या खास डोळ्यात भरणारे म्हणजे १८५७ चे स्वातंत्र्ययुद्ध, वासुदेव बळवंत फडके यांचे बंड, रँड साहेबाचा चाफेकर बंधूंनी केलेला वध, बंगाल-पंजाबमधील दहशतवादी चळवळ, बॅरिस्टर सावरकर आणि गदरपक्ष यांनी उभारलेली चळवळ, लाहोर आणि काकोरी इत्यादि नावांनी प्रसिद्ध असलेले राजकीय कट, सुभाषचंद्र बोसांनी केलेली आझाद हिंद सेनेची स्थापना, त्याचप्रमाणे टिळक, गांधी, इत्यादींनी केलेल्या स्वदेशी, असहकार, 'भारत छोडो' आदि चळवळी, इत्यादीही राजकीय विचारांनी घेतलेली दृश्य रूपे म्हणून सांगता येतील. अर्थात अशा चळवळींच्या मागे पण एक विचार असतो, तो सामाजिक असतो आणि इतर सामाजिक विचारांपासून पूर्णपणे अलिप्त राहून तो वाढत

नसतो. तो तसा वाढता तर सरंजामशाहीतून साम्राज्यशाही किंवा वसाहतवादातून उत्पन्न होणारे दास्य समाजात कधी दिसले नसते. असा बदल घडून येण्याकरिता समाजातील सर्व क्षेत्रात बदल होत जावा लागतो आणि असा बदल सर्वशः सामाजिक असतो. समाजातील पुढारी आपल्या 'जाणी'प्रमाणे या बदलाच्या वेगवेगळ्या अंगांवर भर देतात व त्यातून सामाजिक प्रश्न वेगळे आहेत असा आभास पण उत्पन्न व्हावयास लागतो. लोकमान्य टिळक आणि गोपाळ गणेश आगरकर यांच्या संदर्भात अशाच तऱ्हेचा आभास उत्पन्न झाला होता, असे मला वाटते, कारण या दोघांनी आपल्या जीवनात सामाजिक बदलाच्या वेगवेगळ्या अंगांवर भर दिला होता. गोपाळ गणेश आगरकरांना राजकीय प्रश्नांचे वावडे होते; किंवा टिळकांना सामाजिक प्रश्नांचे वावडे होते; असा याचा अर्थ होत नाही. डोंगरीच्या तुरुंगात आगरकरांनी जे दिवस काढले त्याला काय आपण केवळ 'सामाजिक तुरुंगवास' म्हणून संबोधावयाचे? केसरीतून आगरकरांनी राजकीय लेख लिहिलेच नाहीत की काय? पण इंग्रजी राज्य आल्यानंतर आमच्या देशातील विद्वान आणि तेजस्वी समाज-प्रबोधकांनी आपल्या समाजाचे जे विश्लेषण केले त्यामुळे समाजाच्या वेगवेगळ्या प्रश्नांवर भर द्यावा असे त्यांना वाटू लागले, आणि त्यातून वेगवेगळ्या प्रकारच्या चळवळी निघाल्या. विष्णुबुवा ब्रह्मचारी, राजारामशास्त्री भागवत, महात्मा ज्योतिबा फुले, लोकहितवादी, न्यायमूर्ती रानडे, गोपाळ कृष्ण गोखले, लोकमान्य टिळक, अण्णासाहेब कर्वे इत्यादी महर्षींनी सामाजिक बदलाच्या निरनिराळ्या अंगांवर भर दिला. सर्वांची साधने वेगळी, पण साध्य एकच होते. सुराज्य उत्पन्न करणे, सुव्यवस्थित, सुशिक्षित, समाजाधिष्ठित समाज उत्पन्न करणे. अशा सुराज्यासाठी, 'स्वराज्य' मिळविणे आवश्यक आहे असे काहींना वाटले, (त्यातही स्वराज्य मिळविण्याच्या मार्गासंबंधी मतभेदही झाले.) तर काहींना स्वराज्य मिळविण्याकरिता, जातिभेद, स्त्रीशिक्षण आदि सामाजिक सुधारणा करून येथील सरंजामशाहीचे रूप बदलविणे आवश्यक वाटले. यातून टिळकपंथ आणि आगरकरपंथ निघाले. पण बुद्धिनिष्ठता मात्र या दोन्ही पंथांच्या मागे होती आणि बेंथम-मिलच्या उदारमतवादी प्रेरणेचा कमीअधिक स्पर्शही दोघांनाही झाला होता हे निश्चित. आपल्या समाजाचे मागासलेपण नाहीसे झाले पाहिजे हे दोघांनाही वाटत होते. त्यांच्याच सहकाऱ्यांपैकी विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनी इंग्रजीला वाघिणीचे दूध म्हटले, आणि त्या काळच्या सर्व प्रबोधकांना ते मान्य होते; ते काय केवळ राजकीय सत्तांतर घडवून आणण्याकरिता की काय? त्या वेळेच्या वातावरणातच सामाजिक बदल ही कल्पना दरवळून राहिली होती. त्यामुळेच महात्मा फुले यांनी सत्यशोधक समाज स्थापून ब्राह्मण्याचे

वाभाडे काढले व स्त्रीशिक्षण, अस्पृश्योद्धार इत्यादि कार्यक्रम हाती घेतले; न्यायमूर्ती रानडे, तेलंग, आदींनी प्रार्थनासमाज स्थापन करून हिंदुधर्मात बदल घडवून आणण्याचा प्रयत्न केला, आणि असा बदल घडवून आणता येणे अशक्य आहे असे वाटल्यावरून गोरेशास्त्रींसारखे काही लोक ख्रिश्चनपण झाले. आणि इंग्रजी राज्य ही 'देवाची देण' आहे असा विचार पण काही लोकांनी मांडला. पण वरपांगी विरोधी वाटणाऱ्या या विचाराचे मूळ शोधता आपणांस असे निश्चितच आढळेल की, या सर्वांना आपल्या मागासलेल्या समाजात बदल घडवून आणावयाचा होता, पेशवाई का गेली आणि इंग्रजांचे राज्य का आले याचे विश्लेषण करावयाचे होते; एक सामाजिक चळवळ करावयाची होती; या सामाजिक चळवळीकरिता साहित्य निर्माण करावयाचे होते. त्यामुळेच लोकहितवादींपासून ते केशवसुतांपर्यंत मोठमोठे लेखक, कवी, विचारवंत या महाराष्ट्रात उत्पन्न होऊ शकले. पण समाजाचे पुनरुत्थान करणे, समाजाचे प्रबोधन करणे हा या सर्व विचारवंतांच्या कार्याच्या मागील हेतू होता. या प्रबोधनाच्या चळवळीत कै. गोपाळ गणेश आगरकर यांचे स्थान अनन्यसाधारण होते; यात शंकाच नाही.

आगरकरांचे साहित्य, त्यांचे केसरी-सुधारकांतील लेख, आज जवळ जवळ दुर्मिळ झाले आहेत. ते पुनश्च प्रकाशित करून नव्या पिढीला उपलब्ध करून द्यावे, हा या ग्रंथप्रकाशनामागचा एकमेव हेतू. आगरकर, फुले, टिळक, कर्वे, आंबेडकर हे सर्व जनतेच्या सदैव स्मृतीत असले पाहिजेत, तरच समाज जागृत होत राहील. गेल्या वर्षी माझे मित्र श्री. दिनकर साक्रीकर यांच्याशी 'टिळक-आगरकर' या नाटकावर बोलत असता साक्रीकर म्हणाले : 'आगरकर यांच्या विचारधनाचे स्वतंत्रपणे मूल्यांकन व्हावयास पाहिजे. गेल्या शतकातील आगरकर-टिळक वादापासून आगरकरांच्या विचाराचे मूल्यांकन टिळक-विचाराच्या संधिप्रकाशात केले जाते; ते आता तरी थांबले पाहिजे. टिळकांचा ज्याप्रमाणे स्वतंत्रपणे विचार केला जातो तसा आगरकरांचाही व्हावयास पाहिजे.' याविषयी साक्रीकरांप्रमाणेच माझ्याही मनात कधी शंका नव्हती. असा विचार कोण करू शकतो, हेही मला माहीत होते. त्यामुळे माझ्या सुहृद प्रा. श्रीमती म. गं. नातू आणि प्रा. दि. य. देशपांडे यांनी जेव्हा माझ्याजवळ आगरकरांचे साहित्य, 'साहित्य आणि संस्कृती मंडळा'ने पुनर्मुद्रित करावे असा प्रस्ताव मांडला; तेव्हा तो मला माझ्या मनोगताचा प्रतिध्वनीच वाटला. अर्थातच मी त्याचे मन:पूर्वक स्वागत केले. एवढेच नव्हे, तर त्या ग्रंथाचे संपादनही त्यांनीच करावे आणि त्याला एक दीर्घ, स्वतंत्र प्रस्तावनाही लिहावी अशी विनंती मी केली. आज ही

विनंती आकारास येत आहे यात मला साफल्याचा आनंद आहे. या दोघांचाही आगरकरांचा प्रगाढ अभ्यास आहे. आगरकरांवर निष्ठा आहे. त्यांनी आगरकरांचा लेखसंग्रह डोळसपणे संपादित करून त्याला दीर्घ, सर्वांगसुंदर आणि आगरकरांच्या विचाराची स्वतंत्रपणे मूल्यांकन करणारी प्रस्तावना लिहिली हे त्यांचे साहित्य आणि संस्कृति मंडळावर न फिटणारे ऋण झाले आहे. माझ्या शब्दाचा त्यांनी मान राखला; हा त्यांनी मजवरही मोठाच अनुग्रह केला आहे.

प्रा. नातू यांचा माझा परिचय गेल्या जवळ जवळ ३० वर्षांचा आहे. तेजस्वी बुद्धी, प्रगाढ व्यासंग आणि समाजसुधारणेची अनिवार तळमळ हे त्यांचे गुण सर्वांच्या परिचयाचे आहेत. त्या स्त्रीस्वातंत्र्याच्या फार मोठ्या कैवारी. आगरकरांचे विचार सक्रियपणे जीवनात उतरविणाऱ्या ज्या काही स्त्रिया मी पाहिल्या आहेत, त्यापैकी प्रा. नातू या एक होत! प्रा. दि. य. देशपांडे यांचा माझा संबंध तर आणखी जुना, सुमारे ४८ वर्षांचा. विद्यापीठात ते माझ्या दोन वर्षे पुढे होते. त्यांना 'वाट पुसतच' मला माझा अभ्यास पुरा करता आला. प्रगाढ व्यासंग व कुशाग्र बुद्धी या आपल्या गुणांमुळे त्यांनी आमच्या पिढीलाच नव्हे, तर पुढील अनेक पिढ्यांना भारून टाकले आहे. या दोघांनी अंगावर घेतलेले काम पुरे केले याबद्दल त्यांना शतश: धन्यवाद.

नारायण मुद्रणालयाचे श्री. मधुसूदन बनहट्टी यांनी हे काम अल्पावधीत पूर्ण केले याबद्दल त्यांना व त्यांच्या मुद्रणालयाच्या कामगारांनाही धन्यवाद.

आगरकरांचे साहित्य पुनर्मुद्रित करून साहित्य आणि संस्कृती मंडळाने आपल्या कार्याचा एक मोठा यशस्वी टप्पा गाठला आहे, असे मी समजतो.

सुरेंद्र बारलिंगे
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

मुंबई,
दि. १ जानेवारी १९८४

## संपादकीय निवेदन :

महाराष्ट्रातील विवेकवादाचे अध्वर्यू, सुधारकाचार्य गोपाळ गणेश आगरकर यांचे वाङ्मय गेली कित्येक वर्षे अतिशय दुर्मिळ झाले आहे. जे उपलब्ध आहे तेही अतिशय जीर्ण आणि बहुधा अपुरेही असते. या थोर विचारवंताचे वाङ्मय याप्रमाणे मिळेनासे व्हावे या गोष्टीची खंत बऱ्याच वर्षापासून मनाला लागून राहिली होती. कारण आगरकरांचे वाङ्मय केवळ ऐतिहासिक दृष्टीने अभ्यास करावा असे नाही, तर ते आज सुमारे शंभर वर्षानंतरही अजून ताजेच आहे. त्यांनी पुरस्कारलेली विवेकवादी जीवनदृष्टी आणि समतावादी तत्त्वज्ञान अल्पांशानेही आपण अजून आत्मसात केलेले नाही. उलट आज आपण पुन्हा अंधश्रद्धा आणि विषमतावादी विचारसरणीच्या मोठ्या प्रमाणात आहारी चाललो आहोत. हे वाङ्मय जर पुन्हा उपलब्ध झाले तर त्याच्या वाचनाने सध्या चाललेल्या परागतीला थोडा तरी लगाम घातला येईल असे वारंवार वाटे. म्हणून आमचे मित्र व महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांच्याजवळ आम्ही आगरकर वाङ्मयाचे पुनर्मुद्रण करण्याचे काम मंडळाने करावे, असा प्रस्ताव मांडला. त्याला त्यांनी तात्काळ संमती दिली, व अल्पावधीतच मंडळाची मान्यताही मिळवून दिली. त्यामुळेच हे बहुमोल वाङ्मय पुन्हा उपलब्ध होण्याचा योग येत आहे.

यां ग्रंथात आगरकरांचे संपूर्ण वाङ्मय पुनर्मुद्रित केलेले नाही: फक्त त्यांचे पुस्तकरूपाने प्रकाशित झालेले वाङ्मयच आम्ही पुनर्मुद्रित केले आहे. हे वाङ्मय प्रकाशनकालक्रमानुसार पुढीलप्रमाणे आहे :

१. **डोंगरीच्या तुरुंगांत आमचे १०१ दिवस**, १८८२
२. **विकारविलसित अथवा शेक्सपिअरकृत हॅम्लेट नाटकाचे भाषांतर**, १८८३.
३. **वाक्यमीमांसा आणि वाक्यांचें पृथक्करण**, १८८८.
४. **विविधविषयसंग्रह**, १८९१.
५. **निबंधसंग्रह**, भाग-१, १८९५ (प्रकाशक-शिराळकर आणि कंपनी)
६. **निबंधसंग्रह**, भाग-२, १९१७ (प्रकाशक-ठोसर)
७. **निबंधसंग्रह**, भाग-३, १९१८ (प्रकाशक-फडतरे)

यांपैकी **विकारविलसित** नाटकाची आतापर्यंत अनेक पुनर्मुद्रणे झाली आहेत. तसेच **डोंगरीच्या तुरुंगांत आमचे १०१ दिवस**, आणि **विविधविषयसंग्रह** यांचेही प्रत्येकी एकेक, आणि **वाक्यमीमांसा** या ग्रंथाची दोन पुनर्मुद्रणे झाली आहेत. **निबंधसंग्रह भाग १** चे १९१९ मध्ये एक पुनर्मुद्रण झाले असून प्रा. मा. दा. आळतेकरांनी **संपूर्ण आगरकर** या नावाने १९३७ मध्ये प्रकाशित केलेल्या तीन भागांपैकी पहिला भाग म्हणजे **निबंधसंग्रह**, भाग १ चे दुसरे पुनर्मुद्रण आहे. आळतेकरांचे भाग २ व भाग ३ म्हणजे **निबंधसंग्रह**, भाग २ चेच पूर्वार्ध आणि उत्तरार्ध असून, त्यांनी संपादलेल्या **संपूर्ण आगरकर** या ग्रंथात **निबंधसंग्रह**, भाग ३ समाविष्टच झालेला नाही. त्यामुळे या भागाचे **आगरकर-वाङ्मय** या ग्रंथात पहिलेच पुनर्मुद्रण होत आहे. प्रस्तुत ग्रंथात ही सर्व पुस्तके प्रथमच एकत्रित स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

प्रस्तुत **आगरकर-वाङ्मय** या ग्रंथात वरील वाङ्मयाची तीन खंडात पुढीलप्रमाणे विभागणी केली आहे:

**खंड १ : सुधारणाविभाग** - पूर्वार्ध
**खंड २ : सुधारणाविभाग** - उत्तरार्ध
**खंड ३ : विविधविषयविभाग**

यांपैकी **सुधारणाविभागात** वर उल्लेखलेले **निबंधसंग्रह** भाग १, २, व ३ यांचा समावेश असून, **विविधविषयविभागात डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस, विकारविलसित, वाक्यमीमांसा**, आणि **विविधविषयसंग्रह** हा सुधारकातील सुधारणेतर विषयांवरील निबंधाचा संग्रह यांचा समावेश केला आहे. कालक्रम सोडून वरील प्रकारची विभागणी करण्यामागील हेतूच्या स्पष्टीकरणार्थ दोन शब्द लिहिणे अवश्य आहे. आगरकरांच्या वाङ्मयापैकी प्रमुख भर अर्थातच त्यांच्या सुधारणाविषयक लिखाणावरच द्यायला हवा. महाराष्ट्र; आगरकरांना प्राधान्याने सुधारक म्हणूनच ओळखतो, आणि सुधारणा विषयानेच त्यांचे बहुतेक वाङ्मय व्यापले आहे. म्हणून आगरकर-वाङ्मयाचे प्रथम सुधारणाविभाग व विविधविषयविभाग असे दोन विभाग करून, नंतर त्यांतील सुधारणाविभाग पूर्वार्ध आणि उत्तरार्ध अशा दोन खंडांत विभागून प्रत्येकी सुमारे ५०० पृष्ठांचे तीन खंड करण्याचे आम्ही योजले.

एक प्रश्न वाचकांच्या मनांत उद्भवण्याचा संभव आहे. तो म्हणजे **केसरी**तील आगरकरांच्या निबंधाचा समावेश आम्ही या ग्रंथात का केला नाही, हा! याबाबतीत आमच्या मते मोठी अडचण **केसरी**तील कोणते लेख निःसंशय आगरकरांचे आहेत हे ठरविण्याची होती. **केसरीतील निवडक निबंध**, पुस्तक १ व २ या

खुद्द आगरकरांनी प्रकाशित केलेल्या पुस्तकांत समाविष्ट झालेल्या निबंधापैकी आगरकरांचे कोणते हे बऱ्याच प्रमाणात अनुमानानेच ठरवावे लागते, आणि त्याबाबतीत मतभेद आहेत. म्हणून **केसरी**तील निर्विवादपणे आगरकरांचेच म्हणून अन्य पुराव्यावरून माहीत असलेले लेख तेवढे आम्ही या ग्रंथाच्या तिसऱ्या खंडात समाविष्ट केले आहेत.

या ग्रंथात समाविष्ट केलेले आगरकरांचे लेख मुळात **सुधारकाच्या** ज्या अंकांत प्रकाशित झाले त्यांच्या तारखा देण्याची आमची इच्छा होती. **निबंधसंग्रह,** भाग ३ या पुस्तकात या तारखा दिलेल्या आहेत,पण **निबंधसंग्रह,** भाग १ व २ यांत तारखांचा निर्देश नाही. त्यामुळे त्यांतील लेखांचा लेखनकाळ कळू शकत नाही, आणि अभ्यासकांची अडचण होते. म्हणून **निबंधसंग्रह,** भाग १ व २ यातील निबंधाच्या तारखा मिळविण्याचा आम्ही प्रयत्न केला, पण दुर्दैवाने आम्हाला यात अपयश आले. कलकत्ता येथील राष्ट्रीय ग्रंथालय, दिल्लीतील राष्ट्रीय अभिलेखागार, मुंबई येथील रॉयल एशियाटिक सोसायटीचे ग्रंथालय, केसरी-मराठा ग्रंथशाळा, वाडिया ग्रंथालय, फर्ग्युसन कॉलेज, पुणे, हिंद सेवक समाज ग्रंथालय, पुणे, मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, शासकीय ग्रंथालय, पुणे, या आणि आणखीही अनेक ग्रंथालयांकडे आम्ही विचारणा केली. परंतु तेथे कोठेही सुधारकांचे अंक एक तर मुळीच नाहीत; किंवा असलेच तर फार थोडे, १-२ वर्षांचे, आणि तेही फुटकळ आहेत असे कळले. त्यामुळे नाइलाजाने **निबंधसंग्रह** भाग १ व २ मधील निबंध मुळातल्याप्रमाणे तारखांशिवाय छापले आहेत.

या ग्रंथाच्या पहिल्या दोन खंडांची (म्हणजे सुधारणाविभागाची) सूची दुसऱ्या खंडाच्या शेवटी येणार आहे. तिसऱ्या खंडाची (म्हणजे विविधविषयविभागाची) प्रस्तावना व सूची त्या खंडात येतील.

आता शेवटी ऋणनिर्देश! हे कार्य तडीस नेण्यास ज्यांनी प्रत्यक्षाप्रत्यक्ष हातभार लावला, त्यांच्या मदतीचा कृतज्ञतापूर्वक उल्लेख करण्यात आम्हांला फार आनंद होत आहे. या श्रेयनामावलीत पहिला मान महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाचे अध्यक्ष डॉ. सुरेंद्र बारलिंगे यांचा. त्यांनी मनावर घेतले नसते तर हे काम होणे अतिशय दुर्घट होते. त्यांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोत. या ग्रंथाचे साहित्य जमविण्याच्या कामी ज्यांची बहुमोल मदत झाली त्यात **आगरकरांशी ओळख** या ग्रंथाचे कर्ते श्री. पु. पां. गोखले यांचे आम्ही फार आभारी आहोत. त्यांनी आमच्या योजनेचे मन:पूर्वक स्वागत केले, काही सूचना दिल्या, आणि आपल्या ग्रंथातून काही साहित्य वापरण्यास परवानगीही दिली. ह्या साहित्यांत 'सुधारकाचे जाहीर पत्रक' आणि आगरकरांच्या हस्ताक्षराचे छाप

यांचा समावेश आहे. मुंबईच्या अभिनव प्रकाशनचे श्री. वा. वि. भट यांनी आम्हाला कोठेही मिळू न शकलेल्या **विविधविषयसंग्रह** या ग्रंथाची झेरॉक्स प्रत काढून पाठविली, त्याबद्दल आम्ही त्यांचे अत्यंत आभारी आहोत. आगरकरांच्या ग्रंथांच्या प्रथमावृत्ती मिळविण्याचा शक्यतो प्रयत्न आम्ही केला. त्यात नागपूर विद्यापीठातील मराठी विभागाचे प्रमुख डॉ. वि. बा. प्रभुदेसाई यांनी आपुलकीने **डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस** आणि **वाक्यमीमांसा** या ग्रंथांच्या प्रथमावृत्ती पुरविल्या. **निबंधसंग्रह**, भाग २ या ग्रंथाची प्रथमावृत्ती आम्हाला नागपूर येथील हिंदु धर्म-संस्कृति मंडळाच्या ग्रंथालयातून श्री. ना. ग. बैतुले यांच्या सौजन्याने मिळाली. **वाक्यमीमांसा** या ग्रंथाची एक प्रत पुणे विद्यापीठातील मराठी विभागाचे डॉ. भा. दि. फडके यांनी पुरविली. आगरकरांचे छायाचित्र आणि **सुधारक** पत्राच्या अंकाच्या पहिल्या पृष्ठाचे छायाचित्रही डॉ. बाबा आढाव यांनी अतिशय कार्यव्यग्र असतानाही वेळात वेळ काढून पुरविली. या सर्वांच्या बहुमोल मदतीबद्दल आम्ही त्यांचे ऋण मानावे तेवढे थोडेच. कलकत्ता येथील राष्ट्रीय ग्रंथालयातील मराठी विभागाचे प्रमुख श्री. श्री. बा. जोशी यांनी आमच्या पत्राला ताबडतोब उत्तर देऊन पुष्कळ उपयुक्त माहिती पुरविली. तसेच डॉ. स. गं. मालशे यांनीही प्रकृति-अस्वास्थ्य असूनही, आमच्या अनेक पत्रांना अविलंब उत्तरे देऊन उपयुक्त माहिती दिली. याबद्दल या दोघांचे आम्ही आभारी आहोत. आमच्या उपक्रमास नागपूर विद्यापीठाचे भूतपूर्व कुलगुरू डॉ. वि. भि. कोलते यांनी मनःपूर्वक प्रोत्साहन दिले. प्रा. ग. प्र. प्रधान, डॉ. य. दि. फडके, डॉ. अशोक केळकर, श्री. राम पटवर्धन, डॉ. अनिल अवचट, श्री. वसंत पळशीकर, श्री. यदुनाथ थत्ते, श्रीमती दुर्गाबाई भागवत, श्री. वामन निंबाळकर व श्री. अंबादास देवळे यांनीही बहुमोल साह्य केले. या सर्वांचे आम्ही अत्यंत ऋणी आहोत. नागपूर विद्यापीठातील राज्यशास्त्राचे प्रपाठक डॉ. भा. ल. भाळे आणि रसायनशास्त्राचे सेवानिवृत्त प्राध्यापक डॉ. रा. ह. सहस्रबुद्धे यांनी या उपक्रमात खूपच रस घेऊन आम्हाला प्रोत्साहित केले याबद्दल आम्ही त्यांचे अतिशय आभारी आहोत. शेवटी हा प्रथम खंड सुबक छपाई करून तयार करून दिल्याबद्दल येथील नारायण मुद्रणालयाचे श्री. मधुसूदन पांडुरंग बनहट्टी व श्री. श्रीकृष्ण पांडुरंग बनहट्टी या बंधुद्वयांचे आणि या ग्रंथाचे वेष्टन आणि सजावट आकर्षक करून दिल्याबद्दल चित्रकार श्री. संजय धोतरकर यांचेही आम्ही आभारी आहोत.

१४, अंबाझारी लेआउट,
नागपूर ४४० ०१०

**म. गं. नातू**
**दि. य. देशपांडे**

# अनुक्रमणिका

## निबंधसंग्रह-भाग २

# विवेकधिष्ठित सर्वांगीण सुधारणेचे उद्गाते

## गोपाळ गणेश आगरकर

'...खरी सुधारणा कशात आहे हे फारच काळजीने ठरविले पाहिजे. कारण वारंवार होते काय की विशिष्ट वासनाधीश किंवा सत्ताधीन झालेल्या मनुष्यास वास्तविक सुधारणा कशात आहे हे नीट न समजून, जेवढे जुने असेल तेवढे फेकून देण्यात व कसल्या तरी नवीन गोष्टींचा अंगीकार करण्यात आपण सुधारणा करीत आहो असा भ्रम होतो ! असल्या लोकांस सुधारक म्हणण्यापेक्षा दुर्धारक म्हणणे हेच बरे ! उदाहरणार्थ, हिंदु धर्मात बरीच व्यंगे आहेत म्हणून यहुदी, महंमदी, ख्रिस्ती किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या धर्माचा अंगीकार करणाऱ्या मनुष्यास विचारी ही संज्ञा सहसा देता येणार नाही...ज्या देशात आपले शेकडो पूर्वज जन्मास आले, वाढले, व मरण पावले, ज्या देशातील हजारो पिढ्यांनी अनेक गोष्टींत मोठ्या कष्टाने केलेल्या अनेक सुधारणांचे फळ आपणांस ऐतेच प्राप्त झाले-अशा देशातील धर्माचा व रीतिरिवाजांचा, व लोकांचा सर्वथैव त्याग करणाऱ्या मनुष्यास खऱ्या सुधारकांची पदवी कधीही शोभणार नाही. स्वभूमीत, स्वलोकांत, स्वधर्मात आणि स्वाचारांत राहून अविचारी व अज्ञान देशबांधवांच्या निंदेस किंवा छळास न भिता, त्यांच्याशी कधी भांडून, कधी युक्तिवाद करून, कधी लाडीगोडी लावून, अथवा सामर्थ्य असल्यास कधी त्यांना दटावून त्यांची सुधारणा करणे यांतच खरी देशप्रीती, खरी बंधुता, खरा देशाभिमान, खरे शहाणपण व खरा पुरुषार्थ आहे, याच्या उलट जे वर्तन करतात ते सुधारणा करीत नाहीत, तर फक्त शृंखलांतर करतात!'[१]

**—गो. ग. आगरकर**

एकोणिसावे शतक हे भारताच्या इतिहासातील प्रबोधनयुग म्हणून ओळखले जावे. या शतकात इंग्रजी राजवटीबरोबर येथे आलेल्या प्रगत अशा पाश्चात्य संस्कृतीचे भारतीय संस्कृतीतील आचार-विचारांना तीव्र धक्के दिले. भारतीयांना सर्वथा अपरिचित अशा व्यक्तिस्वातंत्र्य, समता, लोकशाही इत्यादि मूल्यांचा त्यांना परिचय झाला, आणि पूर्वी कधी नव्हत्या इतक्या समस्या राष्ट्रांसमोर उभ्या राहिल्या. उलटसुलट विचारांच्या प्रचंड वावटळी उठल्या व त्यांनी समाज घुसळून निघाला. या विचारमंथनातून राष्ट्राची नवीन जडणघडण होऊ लागली.

---

१. **आगरकर-वाङ्मय**, खंड १, पृ. १८३. यापुढे अवतरणांच्या शेवटी कंसांत दिलेले पृष्ठांक या ग्रंथातील आहेत असे समजावे.

इ. स. १८१८ साली शनिवारवाड्यावर इंग्रजाचे निशाण लागून सबंध भारतावर ब्रिटिश सत्तेचे शिक्कामोर्तब झाले. त्यावेळी स्वातंत्र्यापहारामुळे दु:खी होण्याऐवजी जनता हर्षभरीत झाली. उत्तर पेशवाईत महाराष्ट्रात जी विलक्षण बेबंदशाही माजली होती, तिचा नवीन सत्तेने बीमोड केल्यामुळे लोकांना साहजिकच हायसे वाटले; आणि तिचे स्वागत करण्यातच त्यांना धन्यता वाटू लागली. ही ब्रिटिश सत्ता अनेक दृष्टींनी अतिशय जबरदस्त होती. पराक्रमाबरोबरच तिच्याजवळ विकसित संस्कृती, शिस्तबद्ध राजवट, वैज्ञानिक सामर्थ्य, इत्यादि अनेक आयुधे होती. शिवाय भारतीयांचे कल्याण करण्याकरिता आपण आलो असल्याचा मोहक मुखवटा तिने धारण केला होता. त्यामुळे भारतीय जनता तिच्यावर अगदी भाळून गेली, तिच्या तेजामुळे ती पार दिपून गेली, आणि तिची स्थिती मोहनिद्रेत निपचित पडल्यासारखी झाली.

परंतु ही स्थिती फार काळ राहिली नाही. १५-२० वर्षाच्या आतच राष्ट्राला जाग येण्याची चिन्हे दिसू लागली. इंग्रजी शिक्षणाने लाभलेल्या नवीन दृष्टीमुळे हळूहळू नवविचाराचे, उत्साहाचे व उमेदीचे वारे सर्वत्र वाहू लागले. आपला धर्म व समाजरचना यांतील उणीवा जाणवू लागल्यामुळे त्या दूर करून त्यांची पुनर्रचना करण्याची निकड विचारवंतांना तीव्रतेने भासू लागली. त्याचबरोबर पारतंत्र्याचे वाढते चटकेही त्यांना बसू लागून त्याचे पाश तोडण्याचे आव्हान त्यांच्यासमोर उभे ठाकले.

महाराष्ट्राच्या इतिहासात १८३० ते १९०० हा काळ सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा देदीप्यमान ठरला. देशोद्धाराच्या ध्येयाने झपाटलेल्या उत्तुंग कर्तृत्वाच्या किती व्यक्ती या काळात निर्माण व्हाव्यात? 'मुहूर्तं ज्वलितं श्रेयो नच धूमायितं चिरं' या वचनाचा प्रत्यय देणाऱ्या बाळशास्त्री जांभेकर, विष्णुशास्त्री चिपळूणकर, गोपाळ गणेश आगरकर, यांसारख्या अल्पायुषी महापुरुषांनी आपल्या लोकोत्तर कर्तृत्वाने काळावर मात करून चिरंजीवित्व मिळविले, व ज्यांना सुदैवाने दीर्घायुष्य लाभले त्या लोकहितवादी, महात्मा जोतीबा फुले, न्यायमूर्ति रानडे, लोकमान्य टिळक आदि महाभागांनी आपल्याला लाभलेल्या आयुष्याचे पुरेपूर माप देशाच्या पदरात टाकले. आपल्या विद्वत्तेने, त्यागाने, अविरत कष्टाने व निष्कलंक चारित्र्याने त्यांनी या प्रदेशाचे 'महाराष्ट्र' हे नाव सार्थ केले. प्रत्येकाची प्रकृती, सामर्थ्य, दृष्टिकोण आणि कार्यपद्धती भिन्न भिन्न असली तरी देशसेवेच्या खडतर व्रताचा अंगीकार प्रत्येकाने सारख्याच उत्कटतेने केला असल्यामुळे त्या सर्वांच्या कर्तृत्वाने हा काळ उजळून निघाला.

या समाजधुरीणांपैकी सुधारकाचार्य गोपाळ गणेश आगरकर यांच्या

जीवनाचा आणि कार्याचा विचार येथे करावयाचा आहे.

विवेकवादाचे अध्वर्यू गोपाळ गणेश आगरकर यांचा जन्म १८५६ साली झाला आणि १८९५ साली त्यांची जीवितयात्रा संपली. म्हणजे त्यांना अवघे एकोणचाळीस वर्षे आयुष्य लाभले. या अल्पायुष्यातही अनेक प्रकारच्या बिकट व प्रतिकूल परिस्थितीला त्यांना तोंड द्यावे लागले. परंतु कोणत्याही आपत्तीला न जुमानता त्यांनी जी कामगिरी केली तिला अर्वाचीन इतिहासात तोड नाही. संबंध जीवनाचे विवेकवादी तत्त्वज्ञान त्यांनी महाराष्ट्राला दिले (मराठीत लिहिण्याचा त्यांचा कटाक्ष होता; नाहीतर उभ्या हिंदुस्थानाला त्यांनी हे तत्त्वज्ञान दिले असे म्हणता आले असते.) समाजाची विवेकशक्ती जागृत करण्यासाठी आणि त्याला न्यायाने, समतेने आणि स्वाभिमानाने जगण्यास समर्थ करण्यासाठी ते अहर्निश झटले. 'टाकातून अर्थबोधक अक्षरे काढण्याचे सामर्थ्य असेल, व ती वाचण्यास निदान एक इसम तयार असेल तोपर्यंत', 'इष्ट असेल ते बोलणार आणि साध्य असेल ते करणार' हे आपले व्रत त्यांनी आमरण पाळले; धार्मिक, सामाजिक आणि राजकीय विचार विवेकाच्या कसोटीवर पारखले; जीवनाच्या सर्व अंगांवर साचलेली रूढीची, अंधश्रद्धेची, दुराग्रहाची व अज्ञानाची जाळीजळमटे मुक्त बुद्धीने शोधून ती दूर करण्याचे कळकळीचे आवाहन समाजाला केले; आणि समाजाच्या सर्वांगीण उन्नतीस आवश्यक असे विवेकवादाचे बहुमोल तत्त्वज्ञान त्याला दिले. या तत्त्वज्ञानास आपल्या निष्कलंक, नि:स्वार्त व कृतिशील चारित्र्याची जोड देऊन विवेकी जीवनाचा आदर्श त्याच्यापुढे ठेवला.

परंतु अशा या थोर विचारवंताची महाराष्ट्राने सतत उपेक्षाच केली. त्यांच्या कार्यासंबंधी अनेक गैरसमज व प्रतिकूल ग्रह निर्माण झाले आणि त्यामुळे त्यांचे तत्त्वज्ञान नीट समजून न घेताच त्याने त्याकडे पाठ फिरविली. ही पूर्वग्रहाची पटले दूर करून त्यांच्या तत्त्वज्ञानाचे यथार्थ स्वरूप दाखविण्याचा हा एक नम्र प्रयत्न.

## १

आगरकरांच्या जीवनाकडे पाहिले की, 'लौकिक दृष्ट्या ध्येये म्हणजे दु:खे, पण या दु:खांतच उच्च व सात्त्विक आनंद भरलेला आहे' या वा. म. जोशी यांच्या वचनाची प्रचीती येते. त्यांच्या आयुष्याचा चरित्रपट कालदृष्ट्या तोकडा. पण या लहानश्या पटावर रेखले गेलेले कर्तृत्वचित्र केवढे भव्य आणि उदात्त असावे ! सर्वभक्षक कालही महान व्यक्तींपुढे हात टेकतो तो असा!

आगरकरांचे आयुष्य म्हणजे झुंज, सर्वत्र झुंज, आणि तीही एकाकी झुंज. प्रथम विद्यार्जन करताना दारिद्र्याशी, कष्टांशी, त्यातून उद्भवलेल्या दम्याशी,

पुढे आयुष्यभर अंगीकृत कार्याप्रीत्यर्थ शासनाशी, जनतेशी, प्रिय आप्तांशी जिवलग मित्रांशी व अखेर मृत्यूशी!

आगरकरांचा जीवनपट अंतश्चक्षूंसमोर उलगडू लागला की त्यातील अनेक धीरोदत्त व करुण चित्रांनी आपले मन एकाच वेळी स्तिमित आणि व्याकुळ होते. सातारा जिल्ह्यातील कऱ्हाडजवळील टेंभू या गावी १४ जुलै १८५६ रोजी गरीब पण सत्त्वशील मातापित्यांच्या पोटी जन्मलेला हा एक जीव. घरोघरी आढळणाऱ्या इतर अनेक जीवांसारखा! महानतेचे किंवा अद्भुततेचे कोणतेही वलय त्याच्याभोवती नव्हते. उलट प्रतिकूल परिस्थितीच्या वेढ्यात तो गुरफटला होता. त्याचे पहिले चित्र डोळ्यांपुढे येते ते अगदी प्राथमिक शिक्षणासाठीही घर सोडावे लागणाऱ्या चिमुरड्या गोपाळाचे. टेंभूस शाळा नसल्यामुळे कऱ्हाडला आजोळी जाऊन समवयस्क दत्तूमामाबरोबर 'बारा वर्सावेरी इंग्रजीची तीन बुके' करणारा बुद्धिमान, सभाधीट, लेखनपटू असा गोपाळ. अभ्यासाप्रमाणेच कृष्णाकोयनेच्या संगमात पोहण्यात, झाडांवर, डोंगरांवर चढण्यात व हुतुतू खेळण्यातही पटाईत! आपल्याला निर्भेळ आनंद देणारे असे गोपाळाचे हे एकमेव चित्र. त्यानंतर आपल्यासमोर येते ते शिक्षणासाठी दाही दिशा वणवण हिंडणाऱ्या व त्यापायी बाल्य कोळपून गेलेल्या गोपाळाचे. दत्तूमामा आणि बरोबरचे इतर सवंगडी पुढील शिक्षणासाठी पुण्यास जातात; पण कऱ्हाडमधील नागपूरकर मुन्सफांच्या निबंधस्पर्धेत बक्षिसे मिळविणाऱ्या गोपाळाला मात्र दारिद्र्यापायी त्याच मुन्सफांच्या कचेरीत खर्डेघाशी पत्करावी लागते. पण पुढील शिक्षणाची संधी शोधण्यात चित्त गुंतलेल्या या ज्ञानतृषार्तास आपले एक लांबचे चुलते रत्नागिरीस 'दिपुटी' असल्याचे कळते आणि लगेच त्याचे चिमुकले पाय रत्नागिरीकडे चालू लागतात. दीडशे मैलांची पायपीट करून रत्नागिरी गाठलेल्या गोपाळाला चुलत्याकडून अपेक्षित प्रतिसाद मिळत नाही. पण न डगमगता तो तेथेच वार लावून, माधुकरी मागून व शागिर्दी करून जिद्दीने विद्यार्जन चालू ठेवतो. तेवढ्यात दुर्दैवाने चुलते एकाएकी निवर्तल्यामुळे तो परत कऱ्हाडास येऊन कंपौडरी करू लागतो. नंतर मामीला अकोल्यास पोचविण्याचे निमित्त मिळताच शिक्षणाच्या आशेने तिकडे धावतो. त्यांच्याबरोबर परत यावे लागल्यामुळे तो पुणे गाठतो. तेथेही सोय न लागल्यामुळे अखेरीस पुन्हा अकोल्यास येतो व तेथे भागवतमामांच्या घरी राहून विष्णू मोरेश्वर महाजनी यांच्या मदतीने तीन वर्षे शिकून प्रवेशपरीक्षा उत्तीर्ण होतो. पण येथेही प्रश्न संपत नाहीत. चिंता मिटत नाही. पुढील शिक्षणासाठी स्वारी पुण्यास दाखल होते, व कोठे 'वऱ्हाड समाचारा'त लिही, निबंधस्पर्धेत व वक्तृत्वस्पर्धेत बक्षिसे मिळव, शिष्यवृत्ती मिळव, कधी नाटक लिही, अशा तऱ्हेने

अनेक अडचणींना तोंड देत देत तो बी. ए. होतो. पण यापायी झालेल्या साऱ्या दगदगीने त्याची मूळची सुदृढ प्रकृती ढासळते. आनुवांशिक दमा डोके वर काढतो. व पुढील धकाधकीच्या जीवनात आणि आपणहून स्वीकारलेल्या दारिद्र्यात योग्य औषधोपचार, विश्रांती व स्वास्थ न मिळाल्यामुळे तो कायमचे ठाण मांडून असतो.

यानंतर सर्व प्रकारच्या संकटांना तोंड देत देत एम. ए. होण्याची प्रतिज्ञा पूर्ण करणारे दृढनिश्चयी आगरकर; एम. ए. झाल्यानंतर अध्यापनात गढलेले, विद्यार्थ्यांवर जीव ओतून प्रेम करणारे आगरकर; आणि तेजस्वी संपादनाने केसरीची जोपासना करून मराठी वृत्तसृष्टीत आगळ्या तेजाने तळपणारे संपादक आगरकर-अशी त्यांची एकाहून एक विलोभनीय चित्रे आपल्यासमोर येतात. मात्र ही चित्रे आता एकट्या आगरकरांची नसतात, तर टिळक-आगरकरांची असतात.

धकाधकीच्या विद्यार्थिदशेत आगरकरांना एकदाच काय तो निश्चित व आनंदी जीवन जगण्याची संधी मिळाली. १८७८ साली बी. ए. झाल्यावर फेलोशिप मिळाल्यामुळे एम. ए. चा अभ्यास करताना आगरकरांच्या मागची पैशाची विवंचना बरीच दूर झाली होती. याच वेळी बाल गंगाधर टिळक एल्एल. बी. च्या अभ्यासासाठी डेक्कन कॉलेजच्या वसतिगृहात राहावयास आले होते. या वास्तव्यात या दोन समानशील, तेजस्वी, ध्येयवादी तरुणाची गाढ मैत्री जमली. त्या काळात त्यांनी मातृभूमीच्या उद्धाराचे अनेक बेत रचले. त्यासंबंधी मनमुराद वादविवाद करण्यात रात्रीच्या रात्री घालविल्या. सरकारी नोकरी न पत्करता केवळ निर्वाहापुरतेच वेतन घेऊन शिक्षणकार्यात सर्व आयुष्य घालविण्याचा त्यांनी संकल्प केला. एम. ए. होताच यासंबंधात आगरकरांनी आपल्या आईला लिहिले, ''आपल्या मुलाच्या मोठाल्या परीक्षा होत आहेत, आता त्याला मोठ्या पगाराची चाकरी लागेल व आपले पांग फिटतील. असे मोठाले मनोरथ, आई, तू करीत असशील. पण मी आत्ताच तुला सांगून टाकतो की विशेष संपत्तीची, विशेष सुखाची हाव न धरता, मी फक्त पोटापुरत्या पैशांवर संतोष मानून सर्व वेळ परहितार्थ खर्च करणार.'

१८८० साली विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी सरकारी नोकरीची रुपेरी बेडी तोडली आणि लोकशिक्षणाकरिता स्वतंत्र शाळा स्थापण्याचा मनोदय जाहीर केला. तो कळताच आगरकर व टिळक हे दोघेही त्यांना येऊन मिळाले व या तीन शक्तींच्या एकोप्याने महाराष्ट्रात एका नव्या युगाचा प्रारंभ झाला. स्वातंत्र्यप्राप्ती आणि त्यासाठी लोकशिक्षण या समान ध्येयावर या त्रिमूर्तीनि आपले लक्ष केंद्रित केले, आणि त्यामुळे देशोन्नतीच्या चळवळीला स्वातंत्र्यप्राप्तीच्या ध्येयाचे एक

नवे परिमाण मिळाले. सरकारी शाळांतील निःसत्त्व शिक्षणपद्धतीत स्वत्वाचा जिव्हाळा ओतून शिक्षण 'तलवारीच्या पोलादासारखे कठीण व लखलखीत' करण्यासाठी त्यांनी १ जानेवारी १८८० रोजी पुण्यात न्यू इंग्लिश स्कूलची स्थापना केली. एम. ए. ची परीक्षा आटोपून आगरकर १८८१ मध्ये शाळेस येऊन मिळाले आणि टिळकाच्या हातात हात घालून त्यांनी देशसेवेस प्रारंभ केला. समान ध्येयामुळे त्या दोघांतील स्नेह इतका दृढ झाला की, महाराष्ट्रीयांच्या अंतःकरणावर 'टिळक-आगरकर' हा द्वंद्व समास कोरला गेला तो कायमचाच. आगरकर हे नाव तर कधी एकट्याने उच्चारले जातच नाही. त्यामागोमाग आपल्या अंतःकरणात 'टिळक' हे नाव निनादतेच. दोन स्वयंभू, तुल्यबल व महान नेत्यांची एवढी जूट होण्याचे अपूर्व भाग्य महाराष्ट्रास लाभले होते. सरकारी नोकरी न पत्करता देशोद्धारार्थ जीवन वेचण्याची दीक्षा या दोघांनीच प्रथम महाराष्ट्रास दिली व त्यायोगे एक नवा पायंडा घातला.

शाळेस प्रथमपासूनच महादेव बल्लाळ नामजोशी व नंतर संस्कृतचे गाढे पंडित वामन शिवराम आपटे हे लाभले होते. या 'ग्राज्वेट पांडवा' च्या बाहेर असामान्य कर्तृत्वाने शाळेचा लौकिक एका वर्षातच सर्वत्र पसरला. परंतु शाळेबाहेर असलेल्या असंख्य लोकांचे प्रबोधन त्याने कसे होणार? देशापुढील इतर समस्या कशा सुटणार? त्यासाठी २ जानेवारी १८८१ रोजी टिळकांच्या संपादकत्वाखाली **मराठा** हे इंग्रजी, आणि ४ जानेवारी १८८१ रोजी टिळकांच्या संपादकत्वाखाली **केसरी** हे मराठी, अशी दोन वृत्तपत्रे मंडळीने काढली. त्यामुळे त्यांच्या हातांत जनताजागृतीचे एक प्रभावी शस्त्र आले. त्यातून सरकारच्या अन्यायाला वाचा फोडली गेली आणि इंग्रजी राजवटीच्या बाह्य झगमगाटाने दिपून गेलेल्या जनतेच्या डोळ्यात अंजन पडू लागले. परंतु वृत्तपत्रांच्या अंगी असलेल्या या सामर्थ्याबरोबरच त्यांच्यावर गंडांतरे येण्याचे धोकेही पुष्कळ असतात, याचा प्रत्यय या संपादकद्वयाला एका वर्षातच आला. कोल्हापूर संस्थानचे दिवाण माधवराव बर्वे यांच्या राजकारणामुळे कोल्हापूरच्या गादीवर असलेल्या शिवाजी महाराजांचा अनन्वित छळ होत असल्याबद्दल, या पत्रांनी त्यांच्याविरुद्ध आवाज उठविताच बर्व्यांनी दोन्ही संपादकांवर खटला भरला व १३ जुलै १८८२ रोजी त्यांना चार महिन्यांची साध्या कैदेची शिक्षा ठोठावली जाऊन या दोन स्नेह्यांची डोंगरीच्या तुरुंगात रवानगी झाली. यापूर्वी चारच महिने आधी १७ मार्च १८८२ रोजी चिपळूणकर वयाच्या बत्तिसाव्या वर्षी एकाएकी निर्वतल्यामुळे संस्थेवर मोठाच आघात झाला होता. त्यांच्यावरील मृत्यूलेखात आगरकरांनी लिहिले: 'आमचे धैर्य आणि कार्यनिष्ठा ही कसास लागण्याची संधी आली आहे, असे

आम्ही समजतो.' या कसोटीस मंडळी उतरली. कोल्हापूर प्रकरणात झालेल्या खर्चासाठी आगरकरांनी तुरुंगात **विकारविलसित** हे हॅम्लेटचचे भाषांतर पुरे केले. व **डोंगरीच्या तुरुंगात आमचे १०१ दिवस** हे कैद्याच्या जीवनावरील मराठीतील पहिले पुस्तक तेथेच लिहिले. तुरुंगातून सुटका होताच हजारो लोकांनी प्रथम मुंबईत व नंतर पुण्यात या दोघांच्या मिरवणुका काढून सत्कार केला व मानपत्रे दिली. यात महात्मा जोतीबा फुले यांनी मोठ्या उत्साहाने व आपुलकीने पुढाकार घेतला होता.

तुरुंगातून सुटल्यावर सर्वजण पुन्हा दुप्पट जोमाने कामास लागले. आगरकरांच्या कुशल संपादनामुळे व प्रभावी लेखनसामर्थ्यामुळे **केसरी**ची गर्जना महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यात निनादली व त्याने लोकांची मने जिंकली. न्यू इंग्लिश स्कूलच्या यशाची कमानही सतत उंचावत होती. या यशात आपट्यांचे असमान्य अध्यापयकौशल्य आणि समर्थ प्रशासन यांचा वाटा मोठा होता. सामुदायिकरीत्या काम करण्यास आवश्यक तेवढा संयम व बंधने आपसांतील मतभेद बाजूस ठेवून सर्वांनीच पाळली. त्यामुळे त्यांच्या कार्याचा व्याप वाढू लागला. १८८४ च्या अखेरीस डेक्कन एज्युकेशन सोसायटीची त्यांनी स्थापना केली, व १८८५ साली सोसायटीचे फर्ग्युसन कॉलेज सुरू झाले.

परंतु कालांतराने, संस्थेच्या सभासदांतील मतभेदाची दरी रुंदावू लागली व त्यांच्यातील ऐक्य दुभंगू लागले. १८८४ साली बैरामजी मलबारी या पारशी समाजसुधारकाचे बालविवाह व विधवाविवाह यासंबंधीचे टिपण प्रसिद्ध झाले, आणि टिळक व आगरकर यांच्यातील मतभेद जाहीर झाले. बालविवाहाचा प्रश्न आगरकरांच्या अत्यंत जिव्हाळ्याचा होता. बालविवाहामुळे स्त्रियांवर ओढवणाऱ्या वैधव्य, केशवपन, आदि आपत्तींनी आगरकर त्या हतभागी स्त्रियांइतकेच व्यथित होत असत. त्यामुळे सतीच्या चालीप्रमाणेच बालविवाहाची चालही कायद्याने बंद करणे त्यांना अत्यावश्यक व अपरिहार्य वाटत होते. ही चाल त्यांना अगदी पहिल्यापासूनच एका अर्थाने सतीच्या चालीहूनही क्रूर वाटत होती. **केसरीच्या** पहिल्याच वर्षाच्या तेविसाव्या अंकातील 'बालविवाहापेक्षा सतीच बरी!' या लेखात ते म्हणतात : 'समजंस वाचकहो, हा बालविवाह नव्हे, आमच्या देशाला महाक्षयरोग लागला आहे.'[२] त्यांच्या मते सतीची चाल म्हणजे 'एक घाव तीन तुकडे' या म्हणीप्रमाणे तात्काळ प्राण घेणारी, तर बालविवाहाची चाल एखाद्या वृक्षाला हळूहळू नष्ट करणाऱ्या किड्यासारखी, अतएव अधिक घातक होती.

---

२. केसरीतील निवडक निबंध, दुसरे पुस्तक, आवृत्ती दुसरी, १९४०, पृ. १११.

त्यामुळे अखेरीस आगरकरांना या प्रश्नावरून २५ ऑक्टोबर १८८७ रोजी अपत्यवत वाढवलेला **केसरी** सोडावा लागला. पण हा तीव्र दु:खाचा घोट त्यांनी पचविला व एकाच वर्षाने १५ ऑक्टोबर १८८८ रोजी गोपाळ कृष्ण गोखल्यांच्या सहकार्याने एक स्वतंत्र पत्र काढले, आणि त्याला **'सुधारक'** हे त्या काळी निंदाव्यंजक असलेले, पण आपल्या उद्दिष्टांचे स्वरूप व्यक्त करणारे नाव दिले.

आता त्यांच्या ऊर्जस्वल लेखणीला सारे मैदान मोकळे झाले. विचारांची परिपक्वता आणि आविष्काराचे पूर्ण स्वातंत्र्य यामुळे **सुधारक** चढत्या वाढत्या तेजाने तळपू लागला. आगरकरांचे संपूर्ण व्यक्तिमत्व प्रतिबिंबित करणाऱ्या **सुधारकातून** अवघ्या सात वर्षांत विवेकाच्या पायावर जहाल राजकीय व जहाल सामाजिक सुधारणेची मुहूर्तमेढ त्यांनी रोवली. हे बिकट कार्य करताना त्यांना अर्थातच एकाच वेळी राजक्षोभास, लोकक्षोभास, एवढेच नव्हे तर जिवलग आप्तांच्या व निकटतम मित्रांच्या रोषासही सामोरे जावे लागले. प्रसंगी खुनाच्या धमक्यांनाही तोंड द्यावे लागले. पण हे दिव्य त्यांनी मुळीच न डगमगता केले. आगरकरांच्या चरित्रातील हे सर्वात महान धीरोदत्त पर्व!

सर्व बाजूंनी होणाऱ्या विरोधास तोंड देता देता शरीर थकले, पार खचले; पण त्यांचा उत्साह व उमेद इतकी प्रचंड की 'मन सुधारकी रंगले, अवघे जन सुधारक झाले' अशी मनोहर स्वप्ने ते पाहात होते. पण वास्तव फार कठोर असते. 'कोण स्वस्थ बसणार? सुधारक अं!' असा प्रश्न दृढ आत्मविश्वासाने प्रतिपक्ष्यास विचारणाऱ्या आगरकरांवर एकामागून एक बिकट आपत्ती कोसळत होत्या. शाळा व कॉलेज यांचा भरभक्कम आधारस्तंभ असलेल्या आपट्यांचा अवघ्या चौतिसाव्या वर्षी मृत्यू; त्यांच्या पत्नीचे जुलमाने झालेले केशवपन; या मागोमाग धारप व केळकर याही सहकाऱ्यांचा मृत्यूने घेतलेला बळी-अशा निर्घृण आघातांनी आगरकरांचे स्नेहार्द्र व हळवे अंत:करण होरपळून गेले. यानंतर फर्ग्युसन कॉलेजची नवी इमारत पाहताना एकीकडे आपट्यांच्या स्मरणाने कष्टी झालेल्या, पण दुसरीकडे ईप्सित गाठल्यामुळे आनंदित झालेल्या आगरकरांना पाहून थोडा दिलासा मिळतो. पण क्षणभरच. कारण मृत्यूने आपले पाश त्यांच्यावरही टाकलेलेच असतात ! पण त्याची चाहूल लागल्यावरही न डगमगता त्यांनी आपले कार्य अखेरपर्यंत चालू ठेवले. आपल्या मागे आपल्या पत्नीने केशवपन करू नये म्हणून तिच्या मनाची तयारी केली, आणि स्वाभिमानाने व स्वावलंबनाने मुलांचा सांभाळ करावा असे तिला सांगितले. आपल्या प्रेतदहनाची इतरांना झीज लागू नये म्हणून पैशांची एक पुरचुंडी बांधून ठेवली. आणि १७ जून १८९५ रोजी पहाटे 'झोप येते, मी स्वस्थ निजतो, तुम्हीही निजा' असे

पत्नीला सांगून स्थितप्रज्ञाप्रमाणे ते मृत्यूला सामोरे गेले!

या धक्क्याने सारा महाराष्ट्र हळहळला. 'माझ्या प्रेतदहनार्थ' हे शब्द लिहिलेली ती पैशांची पुरचुंडी पाहून गोखल्यांना रडू कोसळले. हजारो शिष्यांच्या व मित्रांच्या शोककल्लोळात मुळामुठेचा तीर बुडाला. **केसरीतला** 'आगरकरां'-वरील मृत्युलेख लिहीत असता टिळक घळघळा रडत होते, व तो दोन कॉलमांचा लेख लिहिण्याला त्यांना या उमाळ्याच्या अडथळ्यामुळे चार तासही पुरले नाहीत, असे सांगतात.. ...टिळकांनी....लिहिले :''देशी वर्तमानपत्रास हल्ली जर काही महत्त्व आले असले तर ते बऱ्याच अंशी आगरकर यांच्या विद्वतेचे व मार्मिकतेचे फल होय, यात शंका नाही.''[३] २४ जूनच्या **सुधारकातील** आगरकरांवरील इंग्रजी मृत्युलेखाचा आरंभ गोखल्यांची शेक्स्पिअरने अँटनीच्या तोंडी घातलेल्या ब्रूटसविषयीच्या पुढील उद्‌गाराने केला:

.....the elements
So mixed in him that Nature minght stand up
And say to all the world, 'this was a man!'

आगरकरांचा 'एक विद्यार्थी' **सुधारकाच्या** त्याच अंकात लिहिलेल्या पत्रात म्हणतो :'कै. प्रिन्सिपालसाहेब! ज्या अज्ञान देशबांधवांसाठी आपल्या कुटुंबाची, मित्रांची, ज्ञातीची व प्रसंगी त्या देशबंधूंची इतराजी तुम्ही आनंदाने, खुशीने, दृढनिश्चयाने सहन केली, तथापि त्यास म्हणून सोडलेच नाही; शत्रूही बोलणार नाही असे शब्द आपल्या निकट मित्रांनी सार्वजनिकरीत्या आपणावर टाकिले तरी आपण डगमगला नाही; पतित मनुष्याची जी अवस्था करू नये ती आपल्या मूर्ख विद्यार्थ्यांनी व दुराग्रही प्रतिपक्षीयांनी पुण्यासारखा शहरात केली तरी त्या लोकांच्या हिताकडे किंचितही आपण दुर्लक्ष केले नाही; ज्या स्वार्थबुद्धीचा आपणांस जन्मातही स्पर्श झाला नाही तिचाच आरोप करण्यास जरी कोणी फारसे कचरले नाहीत तरी आपण त्यांस चिकटूनच राहिला.... दारिद्र्यावस्थेत विद्याभ्यास करून तारुण्यावस्थेतही निष्कांचनतेच्या पदरी जो पडला, आणि हजारो रुपये प्राप्तीची सुंदर आशा पुढे असता तिला ज्याने लाथाडले, त्याची निरपेक्षता किती असेल? ज्याने आपल्या विचारांची दिशा थोडीशी तरी बदलली असती तरी लोकप्रीतीने मेहेरनजर दाखविली असती-अशा स्थितीतही ज्याने मनाला चांगले वाटेल तेच लिहून व करून काही काळ तरी समाजद्वेष संपादून सुखावर पाणी सोडले, त्याची लोकहितैकनिष्ठा किती तीव्र व दृढ असेल बरे?'[४]

---

३. न. चिं. केळकर, लो. टिळक यांचे चरित्र (पूर्वार्ध), पृ. २०१.
४. मा. दा. अळतेकर, गोपाळ गणेश आगरकर, पृ. ४६१.

२

आता आपण आगरकरांच्या धार्मिक, सामाजिक व राजकीय तत्वज्ञानाकडे वळू.

आगरकरांच्या सर्व विचारांचा पाया विवेक हा होता. त्यांनी मानवी जीवनाची जी समीक्षा केली, त्याचे जे दोष सांगितले, त्यात ज्या नवीन सुधारणा सुचविल्या, त्या सर्व विवेकाच्या आधारावर. वृत्तपत्राच्या माध्यमातून विवेकवादाचा सर्वांगीण ऊहापोह करणे त्यांना शक्य नव्हते. तरीही त्याच्या मूलभूत तत्त्वांचे प्रसंगोपात्त विवेचन त्यांनी केले आहे. ते एकत्र केल्यास त्यातून विवेकवादाचे प्रतिपादन व बरेच तपशीलवार विवरण आपल्याला मिळू शकते.

परंतु हे करण्यापूर्वी 'विवेकवाद' या शब्दाविषयी थोडे लिहिणे जरूर आहे. इंग्रजी भाषेतील 'rationalism' या शब्दाचा पर्याय म्हणून मराठीत 'बुद्धिवाद', 'बुद्धिप्रामाण्यवाद' 'विवेकवाद' हे शब्द वापरले जातात. यांपैकी पहिले दोन शब्द न वापरता, तिसरा, 'विवेकवाद' हा शब्द येथे वापरला आहे, त्याचे थोडे समर्थन देणे अवश्य आहे. 'Retionalism' हा शब्द लॅटिन भाषेतील 'ratio' या शब्दापासून बनलेला असून त्याला इंग्रजीत 'reason' हा पर्याय आहे. या 'reason' चा समानार्थी म्हणून 'बुद्धी' हा शब्द आपण वापरतो. परंतु त्यात एक अडचण अशी आहे की 'बुद्धी' हा शब्द 'intellect' आणि 'intelligence' या आणखी दोन इंग्रजी शब्दांचा पर्याय म्हणूनही सर्रास वापरला जातो, आणि त्यामुळे नेमका अर्थ व्यक्त करणे कठीण होऊन बसते. या तीन इंग्रजी शब्दांपैकी 'intelligence' चा पर्याय म्हणून 'बुद्धी' हा शब्द मानसशास्त्रीय परिभाषेत रूढ आहे. म्हणून अर्थाचा गोंधळ टाळण्याकरिता 'reason' ला 'बुद्धी' हा शब्द वापरणे योग्य नाही. 'Reason' आणि 'intellect' हे शब्द स्थूलमानाने एकाच अर्थाचे आहेत, म्हणून त्यांचा पर्याय म्हणून 'विवेक' हा शब्द वापरणे उचित होईल. 'Reason' च्या अनेक कार्यांपैकी सत्यासत्याचा, तसेच इष्टानिष्टाचा विवेक करणे हे कार्य प्रमुख आहे; त्यामुळे 'reason' ला 'विवेक' हा पर्याय योग्य वाटतो. आगरकरांनीही सामान्यपणे 'विवेक' हाच शब्द वापरला आहे.

आपले संपूर्ण जीवन विवेकाने नियंत्रित असावे असा आगरकरांचा आग्रह होता. ते म्हणतात : 'विवेक पूर्ण जागृत झाला नव्हता तोपर्यंत विश्वासाने किंवा श्रद्धेने प्रत्येक गोष्टीत आपला अंमल चालविला यात काही वावगे झाले नाही. जसा लोकांस तसा मनास कोणी तरी शास्ता पाहिजे; व ज्याप्रमाणे मुळीच राजा नसल्यापेक्षा कसला तरी राजा असणे बरे, त्याप्रमाणे वर्तनाचे नियमन करणारे असे कोणतेच तत्त्व नसण्यापेक्षा विश्वासासारखे एखादे स्खलनशील तत्त्व असणे

देखील इष्ट आहे. पण हे कोठपर्यंत? अधिक चांगले तत्त्व अस्तित्वात आले नाही तोपर्यंत. ते आले की जुन्या प्रमादी तत्त्वाने आपली राजचिन्ह श्रेष्ठ तत्त्वाच्या स्वाधीन केली पाहिजेत. हे सरळ अधिकारांतर येथून पुढे विश्वास आणि विवेक यांच्या दरम्यान होणार आहे व तसे होण्यातच मनुष्यतेस प्राप्त होण्यासारखे ऐहिक व पारमार्थिक सुख लौकर प्राप्त होऊ लागणार आहे. अशी आमची समजूत आहे. व ती तशी असल्यामुळे विश्वासावलंबी कल्पनांस आणि आचारांस विवेकाची आच देऊन झाळून पाहणे, हे **सुधारकाच्या** अनेक कर्तव्यांपैकी एक कर्तव्य होऊन बसते.' (५७) पण विवेक म्हणजे काय? आणि विवेकाने जीवनाचे नियंत्रण करावयाचे म्हणजे काय करावयाचे? असे प्रश्न यातून उद्भवतात. आपल्या जीवनाची ज्ञान व कर्म ही दोन प्रमुख क्षेत्रे आहेत. त्यांपैकी ज्ञानार्जनाच्या क्षेत्रात आपल्याला सत्यासत्याचा विवेक करावा लागतो व कर्माच्या क्षेत्रात इष्टानिष्टाचा विवेक करावा लागतो. विधानांच्या सत्यासत्यतेची शहानिशा केल्यावरच त्यांचा स्वीकार करावा, आणि कोणते कर्म इष्ट किंवा युक्त आहे याची शहानिशा केल्यावरच ते करावे असे विवेकवादाचे सांगणे आहे. आता विधानांची सत्यासत्यता आणि कर्मांची इष्टानिष्टता निश्चित करण्याचे आपल्याजवळ विवेकाशिवाय अन्य साधन नाही. त्यामुळे विवेकावादाचे समर्थन करण्याकरिता सत्यासत्यता आणि इष्टाइष्टता यांचे विवेकदत्त निकष कोणते आहेत ते सांगणे, आणि विवेकाखेरीज अन्य जे तथाकथित उपाय सांगितले जातात त्यांचे वैयर्थ्य दाखविणे अगत्याचे आहे.

ज्ञान म्हणजे काय किंवा सत्य विधान कशाला म्हणावे या प्रश्नाचे उत्तर गेल्या काही शतकांत विज्ञानाने पूर्णावस्थेस नेले आहे. विश्वास काय काय आहे आणि त्यांचे स्वरूप काय आहे हे निश्चित करण्याची रीत म्हणजे वैज्ञानिक पद्धती. ही पद्धत म्हणजे इंद्रियानुभव व त्याच्यावर आधारलेली अनुमाने असे स्थूलमानाने म्हणता येईल. आपल्याला ज्ञान होते ते एकतर इंद्रियांनी होते किंवा ऐंद्रिय ज्ञानावरून केलेल्या अनुमानाने होते. विज्ञान नावाची जी एक विराट ज्ञानसंहती आता प्रस्थापित झाली आहे आणि जिची प्रगती अव्याहत चालू आहे, ती सर्व शेवटी इंद्रियानुभवावर आधारलेल्या अनुमानांच्या साह्यानेच झाली आहे. या दोन आधारस्तंभाखेरीज ज्ञानाचा अन्य उपाय नाही असे विवेकाचे सांगणे आहे. तेव्हा ज्ञानाचे याखेरीज जे कोणते मार्ग आहेत असे मानले जाते त्यांचे स्वरूप आणि त्यांचा अधिकार काय आहे याचा विचार आता करणे अवश्य आहे.

विज्ञानाचे पराक्रम जरी मोठे असले तरी त्याचे क्षेत्र मर्यादित आहे, तसेच त्याने उपलब्ध करून दिलेले ज्ञान अंतिम नव्हे, असे मानणारे बरेच लोक आगरकरांच्या काळी होते आणि आजही त्यांची संख्या कमी नाही. ते म्हणतात

की विज्ञानाचे क्षेत्र बोलून चालून दृश्य किंवा इंद्रियगोचर जग. परंतु या जगाच्या पलीकडेही विश्व आहे आणि त्याची जाणीवही विज्ञानाला नाही. हे जग अतींद्रिय आहे. त्याला परलोक, पारमार्थिक सत्ता, परमेश्वर, इत्यादी नावांनी संबोधले जाते. ह्या पारमार्थिक जगाचे ज्ञान आपल्याला श्रुतींतून मिळते आणि साक्षात्काराने त्याची प्रचीती येते. ज्याला आपण धर्म म्हणतो त्याचे हेच सांगणे आहे आणि धर्माधिष्ठित तत्त्वज्ञानाचेही तेच प्रतिपादन आहे. उदा. भारतीय तत्त्वज्ञानात असे सांगितले आहे की अंतिम सत्याचे किंवा परमार्थाचे ज्ञान मिळविण्याचा एकमेव उपाय म्हणजे श्रुती. त्या अपौरुषेय असून ईश्वरकृत आहेत आणि त्यामुळे त्यात चूक किंवा न्यून काहीही असणे अशक्य आहे. त्यावर अनन्य श्रद्धा ठेवून त्यातील शिकवणीवर प्रदीर्घ काल चिंतन केल्यावर शेवटी आपल्याला परम सताचा साक्षात्कार होतो. त्यातून मग आपल्याला कळते की एक अद्वितीय असे परम तत्व आहे, आपण जीव त्याचेच अंश आहोत; आपले मूळ स्वरूप परमात्मरूपच होते, पण काही कारणामुळे त्या स्वरूपापासून आपण भ्रष्ट झालो आणि आपण इहलोकात जन्म घेतला. आपले परम प्राप्तव्य म्हणजे आपल्या मूळ परमात्मस्वरूपाची प्राप्ती हेच होय. ह्यालाच मोक्ष म्हणतात. मोक्षाहून श्रेष्ठ असे साध्य मानवापुढे नाही. हा मोक्ष कसा मिळवावयाचा याचे मार्ग श्रुतीतच आपल्याला सांगितलेले आढळतात. आणि भिन्न भिन्न दर्शनांनी त्यांचीच वेगवेगळी स्पष्टीकरणे दिली आहेत. आपल्या या संबंध विश्वावर कर्मसिद्धांताची अधिसत्ता आहे. प्रत्येक मनुष्याला आपल्या कर्माची फळे चाखावीच लागतात आणि त्याकरिता त्याला पुनर्जन्म घ्यावा लागतो, इत्यादि.

हे जे वर भारतीय धर्म आणि तत्त्वज्ञान यांचे प्रतिपादन संक्षेपाने दिले आहे, त्याच धर्तीची प्रतिपादने थोड्याफार फरकाने पृथ्वीच्या पाठीवर अन्य भागात जे धर्म आणि तत्त्वज्ञाने उद्भवली आहेत, त्यांनीही केली आहेत. आगरकर म्हणतात: 'धर्ममंदिराची रचाई श्रद्धेच्या किंवा विश्वासाच्या पायावर झालेली आहे, असे हिंदू धार्मिकांचेच म्हणणे आहे असे नाही. पृथ्वीवरील कोणत्याही प्रकारच्या धार्मिकास विश्वासाशिवाय त्राता नाही व थारा नाही. या संबंधाने बुद्धिवादाचे नाव काढले की त्यांच्या अंगावर काटा उभा राहतो!....त्यांना अशी भीती वाटते की, ते हिणकस ठरल्यास, पुढे काय करावे? आम्हास असे वाटते की असले भित्रपण फार दिवस चालावयाचे नाही. (५६-५७)

विवेकवादाच्या निकषावर धर्माची चिकित्सा केल्यास त्याची काय अवस्था होते हे पाहण्याकरिता आपण आपल्याला परिचित अशा हिंदू धर्माचे उदाहरण घेऊ. या संबंधात पहिला प्रश्न उपस्थित होतो तो हा की, आपण वर जे या धर्माचे प्रतिपादन दिले आहे ते सत्य मानण्यास आधार काय? श्रुतींच्या सत्यत्वाचा पुरावा

काय? याला उत्तर असे दिले जाते की श्रुती परमेश्वराचे शब्द आहेत आणि परमेश्वर पूर्ण असल्यामुळे तो असत्य बोलू शकत नाही. यातून दोन प्रश्न उद्‌भवतात. एक, परमेश्वर आहे कशावरून? आणि दोन, श्रुती त्याने केल्या कशावरून? यांपैकी पहिल्या प्रश्नाचे उत्तर निर्णायक देता येत नाही असा शेकडो वर्षांच्या हजारो विचारवंतांच्या चर्चेचा मथितार्थ आहे. परमेश्वर नाही असे सिद्ध करणारी निर्णायक प्रमाणे जरी उपलब्ध नसली, तरी तो आहे याचाही निर्णायक पुरावा नाही. त्यामुळे तो नाही हे निदान शक्य आहे हे मान्य केले पाहिजे. परंतु तो आहे हे जरी मान्य केले तरी त्याने श्रुती निर्मिल्या, ह्याला पुरावा काय हा प्रश्न शिल्लकच राहतो; आणि याला कसलाही सयुक्तिक पुरावा देता येत नाही. धार्मिक लोक म्हणतात की खुद्द श्रुतींतच असे म्हटलेले आहे की, त्या परमेश्वराची निःश्वसिते आहेत. पण ह्या युक्तिवादातील दोष अगदी उघड आहे. आगरकर म्हणतात, "अशा प्रकारच्या विचारशैलीस तर्कशास्त्रात परिवृत्तिवाद म्हणतात. अशा प्रकारच्या कोटिक्रमाने संशयनिवृत्ति होत नाही, कारण यातील विचार परस्परावलंबी असतात. 'पृथ्वी कोठे आहे?' 'शेषाच्या मस्तकावर', 'शेष कोठे आहे?' 'पृथ्वीच्या खाली!' अशा प्रकारची वरील प्रश्नोत्तरावली आहे."[५]

श्रुतिप्रमाण्यावर एक फार निर्णायक आक्षेप घेता येतो. तो म्हणजे श्रुती खऱ्या मानायचे ठरविले तरी कोणत्या श्रुती खऱ्या मानायच्या? कारण सर्वच श्रुती एकच गोष्ट सांगत नाहीत. उपनिषदांत अनेक मते आहेत. जसे अद्वैती मत त्यात सापडते तसेच द्वैती मतही सापडते. तेव्हा दोन श्रुतींमध्ये जर वाद निर्माण झाला तर कोणत्या श्रुतीचे आपण ऐकायचे? एका धर्माची मर्यादा ओलांडून आपण इतर धर्मांच्या श्रुती पाहू लागलो म्हणजे तर ही आपत्ती विशेषच जाचक स्वरूप धारण करते. कारण बायबल, कुराण, इत्यादि जे इतर श्रुतिग्रंथ आहेत त्यांचाही दावा आपण ईश्वराचे बोल ऐकवत आहोत असाच असतो. परंतु त्यात अत्यंत भिन्न गोष्टी ईश्वरप्रणीत म्हणून सांगितलेल्या आढळतात. त्या सर्वच खऱ्या असणे शक्य नाही. मग त्यांपैकी खऱ्या कोणत्या मानायच्या? यावर सामान्यपणे स्वीकारला जाणारा मार्ग म्हणजे जो ज्याचा धर्म; त्याची श्रुती त्याच्यावर बंधनकारक. म्हणजे प्रत्येक धर्माच्या अनुयायांच्या दृष्टीने अंतिम सताचे स्वरूप भिन्न आहे असे मानावे लागले. पण हे तर सर्वथा असमर्थनीय आहे. सत्य हे आत्मविसंगत

---

५. 'धर्मग्लानीबद्दल उपरति-२' **आगरकर-वाङ्मय, खंड २ मध्ये समाविष्ट होणार** असलेल्या निबंधांतील उताऱ्यांचे पृष्ठांक देणे शक्य नसल्यामुळे त्या निबंधांची नावेच तळटीपांत दिली आहेत.

असू शकत नाही. अंतिम सताचे स्वरूप काही तरी एकच असले पाहिजे. त्याची भिन्न श्रुतिकारांनी भिन्न वर्णने दिले असतील तर त्या सर्वांचे प्रतिपादन अप्रमाण मागण्यावाचून गत्यंतर नाही.

जी गोष्ट श्रुतींची तीच साक्षात्काराचीही. श्रुतीमध्ये सांगितलेल्या सताचा साक्षात्कार होण्याकरिता फार दीर्घ साधना करावी लागते हे प्रसिद्ध आहे. ही साधना म्हणजे साधकाच्या मनाला अखंड दिले जाणारे प्रशिक्षण असते. या प्रशिक्षणाचे स्वरूप बारकाईने तपासल्यास ते auto-suggestion सारखे, आत्ममंत्रणासारखे, असते असे दिसून येते. ज्याप्रमाणे मोहनिद्रेत संमोहक जे सांगेल तसा अनुभव संमोहित व्यक्तिला येतो, त्याचप्रमाणे साक्षात्कारातही साधकाने प्रदीर्घ काळपर्यंत जे ध्यान केलेले असते, सताचे जे स्वरूप आपल्या मनावर ठसविण्याचा प्रयत्न केलेला असतो, तेच स्वरूप शेवटी त्याला साक्षात् दिसते. यात आश्चर्य काही नाही. पण यावरून साक्षात्कार हा यथार्थ अनुभव आहे असे सिद्ध होत नाही. उलट एका विशिष्ट साक्षात्काराकरिता साधकाची तयारी सतत चाललेली असते, त्याला अनुकूल अशी मनोभूमिका त्यासाठी तयार केली जात असते. यावरून तो भ्रामक असतो हेच सिद्ध होते. त्यामुळेच हा साक्षात्कार प्रत्येक धर्माच्या साधकाला, एवढेच नव्हे, प्रत्येक साधकाला, वेगवेगळा येतो. उदा. रामभक्ताला धनुर्धारी रामाचा येतो, तर कालीच्या शिष्याला महिषासुरमर्दिनीचा येतो, इत्यादि.

याप्रमाणे इंद्रियानुभव व त्यावरून केलेला तर्क ह्यांखेरीज ज्ञानसाधने म्हणून जी सांगितली जातात ती, म्हणजे शब्द आणि साक्षात्कार, ज्ञानसाधने म्हणून निरुपयोगी आहेत हे सिद्ध झाले, व विवेकाचा ज्ञानक्षेत्रातील आग्रह रास्त आहे हे प्रस्थापित झाले. आता विवेकाचा कर्मक्षेत्रातील अधिकारही कसा समर्थनीय आहे ते पाहू.

ज्याप्रमाणे ज्ञानक्षेत्रातील प्रमुख प्रश्न 'मी काय खरे मानावे?' हा आहे. त्याप्रमाणे कर्मक्षेत्रातील प्रमुख प्रश्न 'मी काय करावे?' हा आहे. त्याचेही प्रचलित स्वीकृत उत्तर 'धर्म' हेच आहे. धर्माची दोन अंगे असतात. ज्ञानात्मक किंवा विश्ववर्णनात्मक आणि कर्मात्मक. त्याचे पहिले अंग भ्रामक आहे हे आपण पाहिले. आता त्याच्या कर्मोपदेशक अंगाकडे वळू. आम्हा हिंदूंच्या कर्मांचे नियंत्रण करणारे जे धर्मशास्त्र आहे त्याला स्मृतीही म्हणतात. या स्मृतींनी कर्मांचे चार प्रकार सांगितले असून ते अनुक्रमे नित्य, नैमित्तिक, काम्य आणि निषिद्ध हे होत. ह्या चतुर्विध कर्मांचे वर्णाश्रमधर्मात आणखी विभाजन होते. मनुष्यसमाजाचे चार वर्णांत विभाजन करून त्या वर्णांचे प्रत्येकी चार आश्रमात विभाजन केले आहे, आणि

प्रत्येक आश्रमात कोणी केव्हा काय करावयाचे याची विस्तृत आणि तपशीलवार नोंद केली आहे. आपले कर्तव्य काय आहे? निषिद्ध कर्मे कोणती? आणि अनुज्ञेय कर्मे कोणती? यांचा संपूर्ण तपशील या स्मृतीग्रंथातून दिला आहे. तसेच धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हे मानवाचे चार पुरुषार्थ सांगितले असून त्यांपैकी मोक्ष हा सर्वश्रेष्ठ पुरुषार्थ होय असे म्हटले आहे.

आता यासंबंधाने पहिले उत्तर असा उद्भवतो की, आपण स्मृतीचे आदेश का पाळायचे? याला पहिले उत्तर जे मिळते ते असे की स्मृती ऋषीप्रणीत असून ऋषींना ईश्वराकडून प्रेरणा मिळालेली आहे. यावर अनेक प्रश्न संभवतात. पहिला प्रश्न असा आहे की स्मृतीतील आदेश सर्वशक्तिमान परमेश्वराने दिलेले आहेत म्हणून ते आपल्यावर बंधनकारक आहेत, की ते चांगले, हितकर आहेत म्हणून परमेश्वराने ते आपल्याला दिले आहेत? जर सर्वशक्तिमान परमेश्वराने ते दिले आहेत म्हणून ते आपण ते पाळले पाहिजेत असे आपण म्हणालो तर त्यात जे जे शक्तिमान ते ते चांगले असे गृहीत धरल्यासारखे होते. पण शक्ती म्हणजे चांगुलपणा नव्हे हे उघड आहे. शक्ती म्हणजे चांगुलपणा असे म्हणणे म्हणजे गुलामांची नीती स्वीकारणे होईल. अशा नीतीविरुद्ध आपली नैतिक बुद्धी बंड करून उठते. पण जर आपण दुसरा पर्याय स्वीकारला आणि असे म्हणालो की ईश्वराचे आदेश आपण पाळले पाहिजेत, कारण ते हितकर आहेत आणि म्हणूनच ईश्वराने ते दिले आहेत, तर त्यावरही आपत्ती येते. कारण तसे मानले तर त्या आदेशांचे हितकरत्व ही स्वतंत्र गोष्ट आहे; आणि ईश्वराने ते दिले याच्याशी त्यांच्या हितकरत्वाचा संबंध नाही हे मान्य करावे लागते. यावरून नीती ईश्वरावर अवलंबून नाही हे स्पष्ट होते.

हिंदुधर्मप्रणीत नीतीची शिकवण भगवद्‌गीतेत आलेली आहे, असे सामान्यपणे मानले जाते. तिच्यानुसार मनुष्याचे सर्वोच्च प्राप्तव्य म्हणजे मोक्ष. मोक्ष म्हणजे सुटका. कशातून? तर सर्व प्रकारच्या दुःखांतून. परंतु या सुटकेचे लौकिक उपाय कामाचे नाहीत, कारण आपल्या बहुविध दुःखांचे खरे कारण आपला इहलोकीचा जन्म हेच आहे. जीवन दुःखयम आहे आणि त्याचा संपूर्ण नाश होईपर्यंत पूर्ण दुःखनाश अशक्य आहे. यावर एक उपाय असा सुचेल की 'मग आत्महत्या हे मोक्षाचे साधन होईल.' पण हे उत्तर बरोबर नाही, कारण मृत्यूनंतर पुनर्जन्म अटळ असतो म्हणजे मृत्यूने मोक्ष मिळत नाही. या ठिकाणी आपल्या तत्त्वज्ञानातील एका प्रमुख आणि महत्त्वाच्या सिद्धांताचा उल्लेख करावा लागेल. तो सिद्धांत म्हणजे कर्मसिद्धांत. ह्या सिद्धांताचे प्रतिपादन असे आहे की, प्रत्येक मनुष्याला आपल्या प्रत्येक कर्माचे फळ, सत्कर्माचेही फळ, भोगावेच

लागते, आणि त्याकरिता पुनर्जन्म घ्यावा लागतो. मग आपले सर्वश्रेष्ठ प्राप्तव्य जे मोक्ष, त्याचा उपाय कोणता? या प्रश्नाला गीतेचे उत्तर आहे-निष्कामकर्म. जोपर्यंत प्राण आहेत तोपर्यंत कर्म टाकणे कोणालाच शक्य नाही. पण त्या कर्मफळांचे बंधन चुकविण्याचा एक उपाय आहे, तो म्हणजे कर्मे फळांच्या अभिलाषेने न करता, केवळ कर्तव्ये म्हणून करणे. या पद्धतीने विहित कर्मे केली म्हणजे त्यांची फळे आपल्याला भोगावी लागत नाहीत आणि जन्ममृत्यूच्या फेऱ्यातून आपली सुटका होऊन आपण आपल्या मूळ स्वरूपास प्राप्त होतो.

आता हे नीतिशास्त्र एका अतिभौतिकावर (metaphysics), अध्यात्मशास्त्रावर, आधारलेले आहे हे उघड आहे. हे अध्यात्मशास्त्र आपण मानले नाही तर त्याच्यावर आधारलेले नीतिशास्त्रही आपण टाकू शकतो. आता हे अध्यात्मशास्त्र पूर्णत: श्रुतींवर आधारलेले आहे. पण श्रुती निराधार आहेत, हे आपण वर पाहिलेच आहे. मग या अध्यात्मशास्त्राच्या सत्यत्वाचे प्रमाण काय? या प्रश्नाला उत्तर नाही, आणि म्हणून विवेकाच्या निकषावर ते क्षणभरही टिकणारे नाही. उदा. कर्मसिद्धांताचे प्रतिपादन खरे कशावरून? याला अनेकदा कार्यकारणाच्या सिद्धांताचा आधार दिला जातो. प्रत्येक घटनेला कारण असते व प्रत्येक घटनेला कार्यही असते, या सर्वमान्य नियमावरून कर्मसिद्धांत निष्पन्न होतो असे म्हटले जाते. ज्याप्रमाणे कोणतीही घटना घडली की तिचे काही तरी कार्य घडतेच, त्याचप्रमाणे आपण कोणतेही कर्म केले तर त्याचेही फळ येणारच. पण या ठिकाणी फार मोठा गोंधळ आहे. कारणाच्या नियमात अभिप्रेत असलेली कार्याची संकल्पना आणि कर्मसिद्धांतात अभिप्रेत असलेली फळाची संकल्पना या अतिशय भिन्न कल्पना असून त्यांचा परस्परांशी कसलाही संबंध नाही. कर्मफळ ही कल्पना नैतिक आहे, कारण ही फळे चांगली किंवा वाईट अशी दोन प्रकारची असतात, आणि ती अनुक्रमे सत्कर्म आणि दुष्कर्म यांना येतात असे म्हणतात. परंतु कारणाच्या नियमात अभिप्रेत असलेली कार्याची संकल्पना ननैतिक (amoral) आहे. तिचा सत्कर्म व दुष्कर्म यांच्याशी कसलाही संबंध नाही. शिवाय कर्म करणारा आणि इतर यांतील कर्मसिद्धांताला अभिप्रेत असणारा भेद कारणाच्या नियमाच्या दृष्टीने पूर्णपणे अप्रस्तुत आहे. कर्माचे फळ कर्म करणाऱ्यालाच भोगावे लागते, पण कार्य कर्ता व इतर दोघांवरही घडू शकते. तसेच कारणाच्या नियमात अभिप्रेत असलेली कार्ये कारणानंतर तत्काळ घडतात, तर कर्मसिद्धांतास अभिप्रेत असलेली फळे पुढच्या जन्मास येतात. शिवाय कर्मसिद्धांत खरा असण्याकरिता सबंध विश्व कोणातरी नैतिक शक्तीच्या नियंत्रणाखाली आहे असे मानावे लागेल. पण त्याचा कसलाही साधक पुरावा

सापडत नाही. उलट बाधक पुरावा भरपूर आहे या सर्व कारणास्तव असा निष्कर्ष काढणे भाग आहे की, कर्मसिद्धांत ही पूर्णपणे निराधार अशी एक उपपत्ती आहे. कर्मसिद्धांत गेला की मोक्षकल्पनाही गेलीच. आणि म्हणून मोक्षप्राप्तीकरिता सांगितलेली गीताप्रणीत नीतीही निष्प्रयोजन ठरते.

शिवाय वर धर्माच्या ज्ञानात्मक अंगावर जो आक्षेप घेतला आहे तोच कर्मात्मक अंगालाही लागू आहे. तो म्हणजे विविध धर्मांनी कर्तव्य आणि निषिद्ध म्हणून सांगितलेले आचार अतिशय भिन्न आणि प्रसंगी परस्परविरुद्धही असतात. तेव्हा त्यांपैकी कोणते बंधनकारक समजावयाचे? याला उत्तर, ज्या त्या धर्माच्या अनुयायाने आपापल्या धर्माने सांगितलेल्या मार्गाने जावें असे आहे. पण यातून अशी अडचण निर्माण होते की एकच कर्म, (उदा. मूर्तिपूजा), हिंदूने केले तर ते सत्कर्म ठरते, पण मुसलमानांनी केले तर मात्र ते पाप ठरते. ही अवस्था विवेकास मुळीच पटण्यासारखी नाही हे उघड आहे.

या सर्व विवेचनाचा निष्कर्ष असा काढता येईल की, ज्याप्रमाणे ज्ञानाच्या क्षेत्रात धर्माला स्थान नाही; त्याचप्रमाणे कर्माच्या क्षेत्रातही त्याला स्थान नाही. आपण काय करावे आणि काय करू नये हे ठरविण्याचे धर्माखेरीज अन्य उपाय आपल्याजवळ आहेत. नीतिशास्त्राचे ते काम आहे. यासंबंधात आगरकरांनी 'धर्मग्लानीबद्दल उपरति-१' या निबंधात मांडलेले विचार फार महत्त्वाचे आहेत. 'सत्य बोलणे, परोपकार करणे, अपकार न करणे, सदुद्योगात गढून असणे, वाडवडिलांचा योग्य मान ठेवणे, स्वदेशावर प्रीती करणे, राजनिष्ठ असणे, वगैरे गोष्टी सर्वानुमते सद्गुण ठरल्या आहेत....मनुष्याचे सामाजिक हित वाढत जाण्यास त्या अत्यंत आवश्यक आहेत अशी सर्वांची खात्री झाली आहे. पण या व यांसारख्या गोष्टींशिवाय पुष्कळ इतर वस्तूंचा धर्म किंवा धर्मशास्त्र या संज्ञांत समावेश करतात....वेद, बैबल, कुराण ही सारी ईश्वरप्रणीत पुस्तके असून ज्याप्रमाणे ती साऱ्यांस तशी आहेत असे वाटत नाही, व ज्याला त्याला आपले धर्मपुस्तक तेवढे ईश्वरप्रणीत आहे असे वाटते, त्याप्रमाणे वेद ईश्वरप्रणीत मानाणाऱ्यांतही अनेक मतभेद आहेत. शिवाय धर्मशास्त्रात आचारप्रकरणही बरेच शिरते, किंबहुना धर्माचा मुख्य भाग तेच होऊन बसते....धर्ममंत्राबरोबरच जे तंत्राचे लचांड असते ते एकाचे दुसऱ्यास बिलकुल पटत नाही. ब्राह्मण म्हणतो शेंडी ठेवली पाहिजे; मुसलमान म्हणतो ती काढली पाहिजे; ख्रिस्त्याला दोन्ही गोष्टींचे काहीच वाटत नाही' म्हणून 'अलीकडील विद्वान लोक....नीतितत्त्वांचा विचार धर्मविचारापासून निराळा करतात....नीतितत्त्वांचा अभ्यास पृथक्‌पणाने केला असता तो फार सोपा जातो, म्हणून सर्वमान्य नीतितत्त्वांचा धर्मात समावेश न

करता त्या तत्त्वांचे स्वतंत्र शास्त्र कल्पून त्याचा स्वतंत्रपणे अभ्यास करवावा.'[६]

येथे महात्मा गांधींच्या धर्मविषयक एका मताचा उल्लेख करणे उद्‌बोधक होईल. सर्व धर्म सारखेच सत्य आणि पूज्य आहेत असे ते प्रतिपादीत. याच्या उलट आगरकरांचे म्हणणे सर्व धर्म सारखेच तुच्छ होत; असे होते. आता गांधीजी जेव्हा म्हणतात की सर्व धर्म सारखेच पूज्य आहेत; त्यावेळी त्यांना सर्व धर्मात शिकविली जाणारी समान नीतितत्त्वे अभिप्रेत असावीत हे उघड आहे. खरे बोलावे, परोपकार करावा, चोरी करू नये, हिंसा करू नये, इत्यादी नीतितत्त्वे सर्वच धर्मांनी वंद्य मानली आहेत हे स्वत: आगरकरही म्हणतात. परंतु असे असूनही सर्व धर्म सारखेच तुच्छ आहेत असे ते म्हणतात; याचे कारण असे आहे की, कोणत्याही धर्माचे तद्धर्मत्व, (म्हणजे हिंदुधर्माचे हिंदुधर्मत्व, इस्लामचे इस्लामत्व, इ.), तो धर्म आणि इतर धर्म यांत समान असणाऱ्या गोष्टींत असत नाही, तर तो धर्म आणि इतर धर्म यांतील भेदांत असते. आगरकर म्हणतात त्याप्रमाणे प्रत्येक धर्मात तंत्राचे लचांड असतेच आणि हे प्रत्येक धर्माचे वेगवेगळे असते; ते वेगळे असते यातच प्रत्येक धर्माचे वेगळेपण असते, आणि म्हणूनच दोन भिन्न धर्मांतच नव्हे, तर एकाच धर्मातील दोन पंथांतही कडवा विरोध असतो आणि प्रसंगी त्यांच्यात प्राणघातक संघर्षही पेटतात. शिया-सुनी, कॅथॉलिक-प्रॉटेस्टंट, अकाली-निरंकारी यांच्यातील हाडवैर याचेच द्योतक आहे. परंतु ह्या तंत्रात्मक, कर्म-कांडात्मक वेगळेपणाची चिकित्सा केल्यास त्याचे नैतिक मूल्य शून्य असते, असे सहज लक्षात येते. हिंदूने शेंडी राखणे, गंगास्नान करणे आणि गाय पवित्र मानणे, आणि मुसलमानाने सुंता करणे, मक्केची यात्रा करणे, डुकराचे मांस न खाणे या गोष्टींना नीतीच्या दृष्टीने काही महत्त्व नाही. त्यामुळे सर्व धर्म सारखेच तुच्छ होत हे आगरकरांचे मत; अधिक ग्राह्य आहे असे म्हणावे लागते.

आता 'आपण काय करावे?' याचे धर्मप्रणीत उत्तर आपण त्याज्य ठरविल्यामुळे त्याचे विवेकप्रणीत उत्तर काय असेल ते पाहू.

या संबंधात आगरकर नि:संदिग्धपणे सांगतात की, समाजास हितकारक असे आचार कोणते ते ठरविण्याचे सामर्थ्य पूर्वीच्या ऋषींप्रमाणेच आजच्या विचारवंतांतही आहे. 'कोणतेही आचार घालण्यास पूर्वीच्या ऋषींस जितका अधिकार होता. तितकाच आम्हांसही आहे; ....बऱ्या वाईटाची निवडानिवड करण्याची जितकी बुद्धी त्यांना होती तितकी किंवा तीहून अधिक आम्हांसही

६. 'धर्मग्लानीबद्दल उपरति-२.'

आहे; अनुजांसाठी त्यांचे अंत:करण जितके कळवळत होते, तितके किंवा त्याहून अधिक आमचेही कळवळत आहे; सृष्टिविषयक व तत्कर्तृविषयक ज्ञान जितके त्यांस होते, तितके किंबहुना त्याहून बरेच अधिक ज्ञान आम्हांस आहे; सबब त्यांनी घालून दिलेल्या नियमांपैकी जेवढे हितकारक असतील तेवढ्यांचेच आम्ही पालन करणार, व जे अपायकारक असतील ते टाकून देऊन त्यांचे जागी आम्हांस निर्दोष वाटतील असे नवीन घालणार.' (२८३)

हे नवीन आचार घालताना विवेकवादी व्यक्तीची विचारसरणी स्थूलमानाने पुढीलप्रमाणे असेल.

प्रत्येक मनुष्य आपल्या इच्छा पूर्ण करण्याकरिता धडपडत असतो. त्या पूर्ण झाल्या म्हणजे त्याला सुख, संतोष किंवा समाधान होते. त्या विफल झाल्या म्हणजे त्याला दु:ख, असंतोष किंवा असमाधान होते. परंतु आपला प्रश्न; मनुष्य काय करतो ? हा नाही. त्याने काय करावे? किंवा काय करणे त्याचे कर्तव्य आहे ? हा आहे. याचे उत्तर मनुष्यस्वभावास अनुसरून द्यावयाचे तर असे म्हटले पाहिजे की, हे इच्छापूर्तीचे समाधान जास्तीत जास्त प्रमाणात जास्तीत जास्त लोकांना ज्याने मिळेल ते आचरण युक्त किंवा विवेकी होईल. या दृष्टीने विचार करता पुढील गोष्टी ध्यानात येतात.

(१) आपल्या इच्छा अनंत असतात. त्यापैकी कोणतीही पूर्ण करायची म्हटली तरी इतर अनेक अपूर्ण ठेवाव्या लागतात. तेव्हा आपल्या एकूण इच्छांचा असा समन्वय घडवून आणला पाहिजे की त्यामुळे जास्तीत जास्त इच्छापूर्ती होईल आणि कमीत कमी इच्छा विफल होतील. त्याकरिता दूरदृष्टी ठेवावी लागेल. आगरकर म्हणतात : 'सुखोपभोगासाठी सर्व प्राणिमात्र धडपडत असतो व ज्यास जे प्राप्त होईल त्याने त्यापासून आनंद करून घ्यावा, हे योग्य आहे; पण ज्या सुखोपभोगामुळे निरंतर तो घेता येण्याची शक्यता नाहीशी होते; बुद्धीस मांद्य येते; गात्रे नि:शक्त होतात; उत्साह नाहीसा होतो, आणि कुटुंबास व राष्ट्रास कोणत्याही प्रकारचा फायदा न होता उलट नुकसान किंवा त्रास सोसावा लागतो, अशा सुखोपभोगात निमग्न असण्यात काय फायदा आहे बरे? ...सुदैवाने ज्यांना सुखोपभोग करून घेता येत असेल त्यांनी सुखांची निवड करताना ती आपणास व इतरांस शेवटपर्यंत हितावह होतील किंवा नाही, येवढे पाहात जावे म्हणजे झाले.' (४६-४७)

(२) दुसरी गोष्ट म्हणजे ज्या जास्तीत जास्त इच्छांची पूर्ती करण्याकरिता धडपडावे असे वर म्हटले त्या सर्व इच्छा ऐहिक असल्या पाहिजेत. पारलौकिक सुख किंवा समाधान ही गोष्ट केवळ मानीव असून ती पूर्णपणे निराधार आहे

असे विवेकाचे म्हणणे आहे. तेव्हा त्यांचा मुळीच विचार न करता आपण केवळ इहलोकात पूर्ण होणाऱ्या इच्छाच विचारात घेतल्या पाहिजेत.

(३) वरील विवेचनावरून असे निष्पन्न होते की, ज्याने त्याने आपल्याला महत्तम सुख मिळवावे. पण यावर असा आक्षेप घेतला जाईल की असे मानले तर परोपकार, समाजहितार्थ झटणे, इत्यादी गोष्टींना नीतीत स्थान राहणार नाही. परंतु हा आक्षेप मनुष्यस्वभावाचे अपुरे आकलन दाखविणारा आहे. मनुष्यास आपल्या इच्छांची पूर्ती प्रिय असते हे निर्विवाद आहे. पण म्हणून तो केवळ स्वार्थी असतो असे नव्हे. स्वसुखार्थ इच्छा ज्याप्रमाणे त्याच्या ठिकाणी असतात, त्याचप्रमाणे परसुखार्थ इच्छाही असतात. करुणा, परोपकार, सहानुभूति इत्यादी भावना मनुष्यस्वभावाचे अविभाज्य अंग आहेत. केवळ परोपरकारार्थ झटणारे महात्मे सोडून दिले तरी सामान्य मनुष्यांतही या भावना थोड्याफार प्रमाणात असतात. आपल्या कुटुंबातील व्यक्ती, आपले मित्र, आपले देशबांधव यांच्या दुःखाने तो व्यथित होतो आणि त्यांच्या सुखाने तो संतोष पावतो. त्यामुळे परार्थात स्वार्थही मोठ्या प्रमाणात आढळून येतो.

(४) आणखी एक महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, समाजातील बहुतेक व्यक्ती इतक्या दुर्बळ आणि अज्ञ असतात की त्यांनी स्वसुखार्थ कितीही धडपड केली तरी त्यांना फारसे सुख मिळण्याची आशा नसते. म्हणून सर्वांच्या, निदान अनेकांच्या सुखार्थ झटावे अशी नीती रूढ केली तर सर्वांना थोडेबहुत सुख मिळण्याचा संभव कितीतरी वाढतो. म्हणजे सार्वजनिक सुख हे आपल्या कर्माचे ध्येय लोकांपुढे ठेवल्याने प्रत्येकास सुख मिळण्याची शाश्वती वाढते. बेंटम, मिल, इत्यादि तत्त्वज्ञांनी म्हणूनच भूयिष्ठांचे भूयिष्ठ सुख (greatest happiness of the greatest number) हे ध्येय मानवसमाजाचे अंतिम ध्येय असले पाहिजे असे म्हटले आहे.

(५) मात्र सुख इष्ट आहे असे म्हणताना आणखी एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवली पाहिजे. ती म्हणजे सर्व सुखे एकाच योग्यतेची असतात असे विवेक सांगत नाही. मनुष्याच्या बऱ्याच इच्छा पशूंच्या इच्छांहून भिन्न नसतात हे खरे असले, तरी सुसंस्कृत मनुष्यास ज्ञानानंद, कलास्वाद, परोपकार, आत्मार्पण आदि केवळ मानवासच शक्य असलेल्या सुखांची फार मातब्बरी वाटते. ज्यांनी या उच्च सुखांचा अनुभव घेतलेला असतो, ते या सुखांचे माहात्म्य आग्रहपूर्वक प्रतिपादतात. तेव्हा या सुखांकडे आपण दुर्लक्ष करता कामा नये.

सारांश, बहुविध ऐहिक सुख जास्तीत जास्त प्रमाणात जास्तीत जास्त व्यक्तींच्या वाट्यास येणे हे आपल्या नैतिक जीवनाचे अंतिम ध्येय आहे आणि

म्हणून आपल्या समाजाची रचना, त्याच्या संस्था, त्यातील चालीरीती, त्याचे कायदे इत्यादींच्या मूल्यांचा निकषही तोच आहे. कोणताही आचार विवेकाच्या निकषावर घासून पाहणे याचा अर्थ आता स्पष्टपणे सांगता येईल. तो असा की वरील अर्थी भूयिष्ठांचे सुख निर्माण करणारा आचार युक्त आहे किंवा तो सदाचार आहे, आणि त्याहून कमी सुखोत्पत्ती ज्याने होते किंवा जो अनावश्यक दुःखास कारणीभूत होतो. तो आचार अयुक्त आहे, दुराचार आहे.

विवेकवादावर अनेक आक्षेप घेतले गेले आहेत आणि आजही घेतले जात आहेत. त्यांपैकी एक दोन महत्त्वाच्या आक्षेपांचा विचार करून हे विवेकवादाचे विवेचन संपवू. एक नेहमी घेतला जाणारा आक्षेप असा आहे की, विवेकवादानुसार आपल्या संपूर्ण जीवनाचे नियमन विवेकाने करावयाचे असल्याने मानवी स्वभावातील अन्य घटकांकडे दुर्लक्ष होणे अपरिहार्य आहे. विशेषत: भावना हे जे मानवी जीवनाचे एक अतिशय महत्त्वाचे अंग आहे त्याची विवेकवादी जीवनात उपेक्षा झाल्यावाचून राहणार नाही. पण मग मानवी जीवन रूक्ष, नीरस होणार नाही काय? प्रेम, वात्सल्य, मित्रांचा स्नेह, कलास्वाद, सौंदर्योपासना इत्यादी गोष्टींना फाटा मिळणार नाही काय? हा विवेकवादावर घेतला जाणार प्रमुख आक्षेप आहे. पण तो पूर्ण गैरसमजातून उद्भवला आहे. विवेकवादी जीवनात भावनांच्याकडे दुर्लक्ष होईल असे आक्षेपक कशाच्या आधारे म्हणतात ते कळत नाही. भावनेला आपल्या जीवनात महत्त्वाचे स्थान आहे हा निर्णय शेवटी करते कोण? भावना की विवेक? हा निर्णय विवेकाचाच आहे. कारण भावनेच्या ठिकाणी निर्णय करण्याचे, नियमन करण्याचे, सामर्थ्यच नाही. प्रेम, क्रोध, भय, जुगुप्सा इत्यादि भावना त्यांना अनुकूल अशा परिस्थितीत आपल्या मनात उद्भवतात. परंतु त्या सर्वच प्रसंगी त्यांचा उद्भव आणि त्याची मात्रा योग्य किंवा इष्ट असते असे आपण म्हणत नाही. उलट काम, क्रोध, मोह, लोभ, मद, मत्सर या भावना मानवाचे षड्रिपु आहेत, आणि स्नेह, करुणा, सहानुभूति इत्यादि भावना त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहेत असे आपण मानतो. यावरून सर्वच भावना सर्वदा सर्वत्र चांगल्या किंवा इष्ट असतात असे आपण मानीत नाही हे उघड आहे. पण अमुक भावना उच्च आणि अमुक भावना नीच, किंवा अमुक भावनेचा याप्रसंगी झालेला अविष्कार अतिरेकी होता तर त्याप्रसंगी तो युक्त प्रमाणात होतो, असे निर्णय आपण घेतो; यावरून भावना ही गोष्ट अंध आहे आणि तिला नियमनाची गरज आहे हेच आपण मान्य करतो. क्रोध किंवा भय या भावना नेहमीच अयुक्त असतात असेही आपण मानीत नाही. अन्यायाचा क्रोध आला पाहिजे, पापाचरणाचे भय वाटले पाहिजे हेही आपण म्हणतो. तसेच करुणा व परोपकार अपात्री दाखविल्यास

त्यापासून अपायच होतो हेही आपल्या परिचयाचे आहे. या सर्वांवरून हेच निष्पन्न होते की भावनेच्या ठिकाणी शक्ती आहे, पण ती अंध आहे; म्हणजे ती स्वत:चे मार्गदर्शन करू शकत नाही. तिला मार्गदर्शनाची आवश्यकता आहे. हे मार्गदर्शन तिला विवेकाशिवाय कोण करू शकणार? याप्रमाणे भावनेचे जीवनात महत्त्वाचे स्थान आहे, हे शेवटी विवेकच ठरवितो आणि म्हणून विवेकवादी जीवन भावनाशून्य होईल ही भीती निराधार आहे. आणि खरे पाहिले तर कोणाही विवेकवाद्याने भावनेचा तिरस्कार करावयास सांगितलेले नाही. खुद्द आगरकरांचे जीवन आणि कार्य यांकडे पाहिल्यास विवेकवाद्याचे ज़ीवन भावनाशून्य होईल या मताचे पूर्ण खंडन होते. विवेकवाद्यांना अपेक्षित विवेकवादी नीतीचे वर जे वर्णन केले त्यात ज्या बहुविध सुखांचा उल्लेख केला आहे, त्यात कौटुंबिक प्रेम, मित्रप्रेम, परोपकार, कलास्वाद यांच्याही सुखांचा अंतर्भाव आपण केला आहेच.

असाच आणखी एक आक्षेप गैरसमजातून उद्भवलेला आहे आणि तोही मोठमोठ्या लोकांकडून घेतला जातो. खुद्द लोकमान्य टिळकांनी तो आक्षेप घेतला आहे. आगरकरांच्या आणि आपल्या स्वत:च्या सुधारणेविषयीच्या भूमिकांची तुलना करतांना ते म्हणतात : 'धर्मदृष्ट्या आगरकर केवळ बौद्धिकवादी होते आणि तोच पंथ सामाजिक बाबतीतही निदानपक्षी आपल्या लेखांत त्यांनी स्वीकारला होता..... सुधारणा नको असे 'केसरी' चे म्हणणे केव्हाव्ही नव्हते, पण केवळ बौद्धिकदृष्ट्या किंवा तर्कदृष्ट्या सुधारणेचा विचार करण्यास केसरी तयार नव्हता.'[७] या विधानाचा काळजीपूर्वक विचार केल्यास अनेक प्रश्न उद्भवतात. केवळ बौद्धिकदृष्ट्या सुधारणा करावयाच्या म्हणजे काय करावयाचे? आणि तसे करण्यात गैर काय आहे? तसेच केवळ बौद्धिकदृष्ट्या सुधारणा करणे चूक असेल तर आणखी कोणती दृष्टी ठेवली पाहिजे? या प्रश्नांचा विचार करू लागल्याबरोबर टिळकांच्या वरील आक्षेपातील दोष स्पष्ट होऊ लागतात.

टिळकांच्या आक्षेपात 'बौद्धिकदृष्ट्या किंवा तर्कदृष्ट्या' असे शब्द आले आहेत. त्यावरून 'बुद्धी' व 'तर्क' हे दोन शब्द ते समानार्थी मानतात असे दिसते. पण हे समीकरण पूर्णपणे बरोबर नाही हे लक्षात ठेवले पाहिजे. बुद्धीच्या (किंवा विवेकाच्या) अनेक कार्यांपैकी एक कार्य तर्क किंवा अनुमान करणे हे सर्वश्रुत आहे. परंतु बुद्धीची तर्काखेरीज अन्यही कामे आहेत हे लक्षात घेणे जरूर आहे. अवकर्षण (abstraction) करणे, संकल्पना (concepts) तयार करणे, साम्य-भेद ओळखणे, तारतम्य करणे, हीही कामे बुद्धीचीच आहेत. निदान ही

---

७. लो. टिळकांचे 'केसरी'तील लेख, भाग ४, पृ. ५३४-३५.

कामे करण्याचे बुद्धीखेरीज आणखी कोणते साधन असू शकेल याची कल्पना करणे कठीण आहे. आता बुद्धीचे स्वरूप स्पष्ट केल्यानंतर केवळ बौद्धिकदृष्ट्या सुधारणा करणे म्हणजे काय व तसे करण्यात गैर काय आहे या प्रश्नाकडे आपण वळू शकतो. टिळकांच्या एकंदर विवेचनाचा अभिप्राय असा दिसतो की केवळ बुद्धीवर सुधारणा न आधारता, त्या करताना आपल्या सांस्कृतिक परंपरांचाही विचार केला पाहिजे. आपल्या सांस्कृतिक परंपरांचा समूळ उच्छेद न करता त्यांच्याशी अविरोधी अशा सुधारणा केल्या पाहिजेत असे टिळकांचे म्हणणे होते. हा युक्तिवाद प्रथमदर्शनी सयुक्तिक दिसतो. पण त्यात अनेक हेत्वाभास दडलेले आहेत. त्यात असे गृहीत धरलेले आहे की सामाजिक रूढींची इष्टानिष्टता ठरविण्याचे बुद्धीखेरीज आणखी एक प्रमाण आहे, ते म्हणजे स्वसंस्कृती किंवा स्वपरंपरा. परंतु एखादी रूढी किंवा चाल आपल्या संस्कृतीचा भाग आहे एवढ्यानेच केवळ ती रक्षणीय होते असे मानणे चूक आहे, हे खुद्द टिळकांनाही मान्य होते; कारण बालविवाह, अस्पृश्यता, इत्यादि आपल्या संस्कृतीतील गोष्टी अनिष्ट असून त्या सुधारल्या पाहिजेत असे त्यांचेही मत होते. पण या रूढी अनिष्ट आहेत आणि त्या बदलल्या पाहिजेत, हा निर्णय आपल्या बुद्धीचा आहे हे उघड आहे. म्हणजे एखादी रूढी आपल्या संस्कृतीचा भाग आहे ही गोष्ट तिच्या रक्षणीयत्वाकरिता पुरेशी होऊ शकत नाही. ती हितकरही असली पाहिजे; निदान ती अहितकर असता कामा नये हेही त्याकरिता अवश्य आहे. आणि ती हितकर आहे की नाही हे ठरविण्याचा अधिकार फक्त बुद्धीचा असल्यामुळे सुधारणा करायची की नाही; आणि करायची असल्यास कोणती करायची याचा निर्णय शेवटी बुद्धीचाच असणार! आता आपल्या सर्वच गोष्टी लज्जास्पद आहेत असे मानून परक्यांची सर्वच बाबतीत नक्कल करणे आगरकरांनाही मान्य नव्हते. म्हणूनच त्यांनी सुधारणेच्या पहिल्याच प्रतिज्ञेत 'भारतीय आर्यत्व न सांडता' हे शब्द घातले आहेत. आपल्या रूढींपैकी ज्या गोष्टी चांगल्या आहेत त्यांचे तर आपण रक्षण केलेच पाहिजे; पण ज्या अहितकर नाहीत अशा गोष्टीही त्यागण्यात काही शहाणपणा आहे असे त्यांना वाटत नव्हते. ते म्हणतात, 'आमचे काही रीतिरिवाज मूर्खपणाचे आहेत म्हणून प्रत्येक गोष्टीत परकीयांचे अनुकरण करणे हेही कोणत्याही दृष्टीने त्याचे त्याला किंवा इतरांला परिणामी विशेष सुखावह होण्याचा संभव नाही, असे आम्हांस वाटते. उदाहरणार्थ, कित्येक प्रसंगी धोतरे नेसणे सोईस्कर नाही म्हणून युरोपियन लोकांप्रमाणे दिवसभर पाटलोण घालून बसणे, किंवा ते लोक विशेष कामाकडे कागदांचा उपयोग करतात म्हणून आपणही तसे करणे हे केवढे मूर्खपण आहे बरे ?'(१८३) त्यांचे एवढेच म्हणणे होते की,

आपल्या रूढींचे रक्षणीयत्व अथवा अरक्षणीयत्व निश्चित करताना त्या हितकर आहेत की अहितकर आहेत याचा निर्णय करावा लागेल; आणि हा करताना त्या आपल्या संस्कृतीचा भाग आहेत, ही गोष्ट आपण पूर्ण दृष्टीआड केली पाहिजे. परंपरावाद्यांवर त्यांचा आक्षेप होता तो हा, की परंपराभिमानामुळे त्यांची बुद्धी किंवा विवेकशक्ती शृंखलाबद्ध होते आणि ते हिताहिताचा विवेक नीट करू शकत नाहीत. म्हणून टिळकांचा वरील आक्षेप बरोबर नाही हे दिसून येईल.

३

विवेकवादाचा अंगीकार केल्यास ज्ञान व कर्म या दोन्ही क्षेत्रांतील आपल्या परंपरागत आचारविचारात प्रचंड उलथापालथ होणे अपरिहार्य आहे, हे आपण वर पाहिले. आता विवेकवादाच्या आधाराने आगरकरांनी मांडलेल्या सुधारणा विचाराचे स्वरूप पाहावयाचे आहे.

सुधारणा म्हणजे काय, ती का करावयाची व कशी करावयाची, ती करताना कोणती दक्षता घ्यावयाची इत्यादि सर्व प्रश्नांचे सविस्तर विवेचन आगरकरांनी केले आहे. ते म्हणतात, 'सचेतन व अचेतन सृष्टीचा दास मी नाही, तर तिला दास करण्याचा, निदान तिच्याशी बरोबरीने वागण्याचा हक्क किंवा अधिकार मला आहे, असा विचार मनुष्याच्या अंतःकरणातून वागू लागला, म्हणजे त्याच्या खऱ्या सुधारणेस आरंभ होतो.' (३१-३२) मात्र खरी सुधारणा कशात आहे हे फार काळजीने ठरविले पाहिजे, असे ते आवर्जून सांगतात. जेवढे जुने असेल तेवढे फेकून देऊन कसल्यातरी नवीन गोष्टींचा अंगीकार करणे म्हणजे सुधारणा नव्हे असे ते स्पष्ट बजावतात. या बाबतीत त्यांनी आणखी एक महत्त्वाची खबरदारी घ्यावयास सांगितली आहे. ती ही; की कोणतीही सुधारणा जाणूनबुजून अंगीकारली तरच ती चिरस्थायी व फलप्रद होऊ शकते. प्रवाहपतित होऊन केलेले वर्तनांतर कधीही फलदायी होणे शक्य नाही. जाणूनबुजून उपाय योजणे यातच मनुष्याचे मनुष्यपण आहे. वस्तुस्थितीचा गुलाम होऊन ती वागवील तसे वागणे म्हणजे मनुष्यांत व इतर प्राण्यांत काही अंतर नाही असे दाखविण्यासारखे आहे. म्हणून कालावर व वस्तुस्थितीवर अवलंबून न राहता ज्या सुधारणा अत्यंत आवश्यक वाटत असतील, त्या करण्याविषयी बुद्धिपूर्वक प्रयत्न करण्यास लागले पाहिजे.

आगरकरांचा सुधारणाविचार अतिशय व्यापक होता. राजकीय, सामाजिक, धार्मिक आदि सुधारणांपैकी कोणत्याही एका सुधारणेस अग्रक्रम देणे त्यांना मान्य नव्हते. त्यांच्या मते हे वर्ग केवळ व्यवस्थेकरिता केलेले आहेत. 'ते सर्व मनुष्यांच्या वेगवेगळ्या व्यवहारांचे व्यंजक होत, व त्या सर्वांची एक समयावच्छेदेकरून

सुधारणा होत जाणे, म्हणजेच मनुष्याची सुधारणा झाली असे म्हणता येईल.' (३८१)

'**सुधारक** काढण्याचा हेतु' या **सुधारकातील** पहिल्याच लेखात मनुष्य सुधारणेचे अत्यावश्यक तत्त्व सांगताना ते म्हणतात, 'समाजाचे कुशल राहून त्यास अधिकाधिक उन्नतावस्था येण्यास जेवढी बंधने अपरिहार्य आहेत, तेवढी कायम ठेवून बाकी सर्व गोष्टींत व्यक्तिमात्रास (पुरुषास व स्त्रीस) जितक्या स्वातंत्र्याचा उपभोग घेता येईल तितका द्यावयाचा, हे अर्वाचीन पाश्चिमात्य सुधारणेचे मुख्य तत्त्व आहे.' (८) या अवतरणातील 'समाजाचे कुशल राहून' या शब्दसंहतीचे स्पष्टीकरण करणे जरूर आहे. कारण समाजाच्या कुशलाच्या नावाखाली व्यक्तिस्वातंत्र्याची पार गळचेपी करणारे तत्त्वज्ञान आज जगाच्या फार मोठ्या भागावर आधिपत्य गाजवीत आहे. समाजास जीविशरीराची उपमा देऊन त्यावरून समाज व व्यक्ती यांचा परस्परसंबंधाविषयी अनेक भ्रामक आणि चुकीचे निष्कर्ष काढण्याचा राज्यशास्त्रज्ञांचा, प्राचीन काळापासून परिपाठ आहे. त्यातील हेत्वाभास व धोके आगरकरांनी फार मार्मिकपणे विशद केले आहेत. ते म्हणतात, 'मनुष्याचे स्वच्छंदी वर्तन दोन प्रकारांनी विघातक होण्याचा संभव असतो; एक दुसऱ्याला आणि दुसरे त्याचे त्याला. जर कोणत्याही व्यक्तीची वागणूक त्याची त्याला किंवा दुसऱ्याला अपायकारक होण्याचा संभव नसेल तर त्याला ती हवी तशी करू देण्यास प्रत्यवाय कशासाठी करावा हे समजत नाही.' (३३-३४) पण हे वर्तनतत्त्व व्यवहारास लावू लागले असता फार अडचणी येतात. कारण जरी प्राण्याच्या शरीरातील अवयवांप्रमाणे समाजाचे अवयवही निरनिराळे असतात, व त्यांना वेगवेगळी कामे लागतात, तरी हे अवयव परस्परावलंबी असल्यामुळे त्यांना एकमेकांस साह्यही करावे लागते. तसे न झाल्यास, ज्याप्रमाणे शरीरातील चैतन्यतत्त्वाचा लय होऊन सर्व अवयवांचा नाश होईल, त्याप्रमाणे समाजाचीही वाताहत होऊन प्रत्येक व्यक्तीस आपल्या चरितार्थासाठी आणि संरक्षणासाठी खुद्द स्वत:वर अवलंबून राहावे लागेल. परंतु हे साम्य येथेच संपते. आगरकर म्हणतात, 'व्यक्तींच्या शरीरातील अवयवांत व समाजाच्या शरीरातील अवयवांत एक मोठा भेद आहे; तो हा की, ज्याप्रमाणे समाजाच्या प्रत्येक अवयवास ज्ञानसंवेदन, इच्छा इत्यादि मनोधर्म पृथकत्वाने असल्यामुळे सुखदु:खाचा अनुभव प्रत्येकास होत असून, ते संपादण्याविषयी किंवा टाळण्याविषयी प्रत्येकाचा प्रयत्न निरंतर चालू असतो, त्याप्रमाणे व्यक्तीच्या शरीरातील प्रत्येक अवयवाची स्थिती नाही. त्यापैकी प्रत्येकास मन नाही. त्या सर्वांचे व्यापार नीट चालणे ही गोष्ट ज्या एका व्यक्तीचे ते अवयव आहेत; त्या व्यक्तीस कल्याणकारक आहे. समाज हा काल्पनिक पुरुष

आहे. समाजाचे कल्याण म्हणजे या काल्पनिक पुरुषांचे कल्याण नव्हे, तर त्याच्या अवयवांचे कल्याण होय. व्यक्तीची तशी गोष्ट नाही. व्यक्तीच्या अवयवांस स्वतंत्र मन नसल्यामुळे व्यक्तीचे जे कल्याण तेच त्यांचे कल्याण होय. व्यक्तिशरीर आणि समाजशरीर यातील या महत्त्वाच्या भेदामुळे त्याविषयी विचार करताना व लिहिताना ही गोष्ट नेहमी डोळ्यापुढे ठेवावी लागते की, व्यक्तीच्या अवयवांच्या हितासाठी जे नियम घालावयाचे असतात; व समाजाच्या हितासाठी जे नियम करावयाचे ते वास्तविक पाहता, समाजाच्या अवयवांच्या हितासाठी असतात. तेव्हा व्यक्तींच्या हिताकडे दुर्लक्ष झाले तरी हरकत नाही, समाजाचे हित साधले म्हणजे झाले, असे बोलणे म्हणजे असंबद्ध प्रलाप करण्यासारखे होय; कारण व्यक्तीच्या हिताहून निराळे असे समाजाचे हित नाही. तथापि अशा अर्थाची वाक्ये नेहमी उच्चारण्यात येतात, व ती चांगल्या चांगल्या लोकांच्या तोंडून येतात.... त्यांचा खरा भावार्थ असा असतो की, समाज म्हणजे त्यातील बहुतेक किंवा निदान प्रमुख लोक. अशा अर्थानुरोधाने ज्या समाजात वर्तन होत असते, त्यात एका पक्षाकडे संपत्ती आणि सत्ता, व दुसऱ्याकडे दारिद्र्य आणि दास्य, अशी वाटणी झालेली असते. अशा समाजातील सामान्य लोकांस शुद्ध वन्यावस्थेतील सुखाहून अधिक सुख होत असेल असे जरी मानिता आले, तरी त्यात त्यांचे पूर्ण समाधान होण्यासारखे ते नसलेच पाहिजे हे उघड आहे.' (३४-३५)

आगरकरांच्या सुधारणाविचारास व्यक्तिस्वातंत्र्य व समता ही दोन तत्त्वे आधारभूत आहेत हे वरील उताऱ्यावरून स्पष्ट होते. या तत्त्वांनुसार प्रत्येक मनुष्याला आपल्या इच्छेप्रमाणे आपले जीवन घडविण्याचे स्वातंत्र्य असणे अवश्य आहे. आगरकर म्हणतात : 'सर्व मानवप्राणी जन्मत: सारख्या योग्यतेचे अधिकारी असून त्यांचे हक्कही एकसारखे असतात; व ती योग्यता व ते हक्क त्यांच्याकडे राहणे हे केवळ त्यांच्या कमीअधिक बुद्धिविकासावर व उद्योगशीलतेवर अवलंबून आहे.'[८] या तत्त्वानुसार समाजाची रचना करावयाची म्हणजे समाजव्यवस्थेत आमूलाग्र बदल करणे भाग पडते. वर्तमान व्यवस्थेत व्यक्तिस्वातंत्र्य व समता या दोन्ही तत्त्वांना फार मोठ्या प्रमाणात हरताळ फासला गेला आहे. स्त्रीपुरुष विषमता, जातिभेद, अस्पृश्यतापालन, इत्यादि अनेक आचार याची साक्ष देतात. समाजाच्या प्रथमावस्थेत जे सामर्थ्यवान होते ते सत्ताधीश बनणे व दुर्बलांना त्यांचे दास्य पत्करावे लागणे स्वाभाविक होते. त्या स्थितीत जीवनातील विविध व्यवहार बलात्काराने होत असत. अशा समाजात त्याच्या सर्व अवयवांना सुखाचा सारखा

---

८. 'आणखी एक मुद्दा.'

वाटा मिळणे अशक्य असते. परंतु जो जो मनुष्याची सुधारणा होत जाते, तो तो त्यांच्या अन्योन्यव्यवहारातील बलात्काराचे तत्त्व लयास जाऊन त्याच्या जागी संमतितत्त्व प्रस्थापित होते; व या कारणास्तव येथून पुढे राजा व प्रजा, कुलाधिपती व कुलावयव, पति व पत्नी, मातापितरे व अपत्ये, स्वामी आणि सेवक, गुरु आणि शिष्य, विक्रेता आणि ग्राहक यांतील व्यवहार आणि संबंध, उत्तरोत्तर बलात्काराने न होता, संमतिपूर्वक होत जाणार आहेत.' (३३) असे झाले तरच सर्वांस सारखे- निदान बरेच सारखे- सुख मिळणे शक्य होईल.

परंतु संमतितत्त्व प्रस्थापित होण्यास फार काळ लागतो व मोठी यातायात पडते. कारण त्याकरिता संमति देणारा आणि संमति मागणारा यांचा दर्जा समान असावा लागतो. समतेशिवाय संमतीला अर्थ नाही. उदा. कोणतीही गोष्ट पतीने पत्नीच्या संमतीने करणे याचा अर्थ म्हणजे ती संमती देण्याचे किंवा नाकारण्याचे स्वातंत्र्य पत्नीला असणे अवश्य आहे. सध्या पतीकडून पत्नीला असे स्वातंत्र्य मिळणे दुरापास्त आहे. आगरकर म्हणतात : 'संपत्ती, अधिकार व विद्या ही ज्यांस प्राप्त होतात त्यांस ती आपणच बळकावून बसावे, असे वाटू लागते! तसे करणे आपला हक्क आहे; तसे करण्यात आपले व दुसऱ्याचे परमहित आहे; अशीच व्यवस्था असावी असा परमेश्वराचा किंवा सृष्टीचा आद्य हेतू होता किंवा आहे, असा तर्कवाद मोठमोठे विद्वान, धनिक व अधिकारी दिवसाढवळ्या बेलाशक करीत आले आहेत, व आणखी अनेक शतके करीत राहतील!' (१९७)

दुसरी अडचण ज्या घटकाला स्वातंत्र्य द्यावयाचे त्याच्याकडूनच निर्माण होते. एक तर स्वातंत्र्य म्हटले की त्याबरोबर जबाबदारी आली, व त्याकरिता वैचारिक श्रम करणे आले. पण शारीरिक श्रमापेक्षा मानसिक श्रमाचा मनुष्याला फार कंटाळा असतो. गुलामगिरी ही त्याच्या अगदी अंगवळणी पडून गेलेली असते. शेकडा नव्याण्णव लोक मळलेल्या वाटेने जाण्यातच आपले हित आहे असे मानतात. शिवाय त्यांच्यावर धर्म, रूढी, लोकापवाद यांचा जबरदस्त पगडा असतो. 'पूर्वापार चालत आलेल्या चालीत विचारदृष्ट्या कितीही विसंगतता दिसली तरी त्या सोडणे किती जिवावर येते, हे बालविवाह, केशवपन, सुतक इत्यादि प्ररूढ चालींचा विचार करता तेव्हाच लक्षात येणार आहे' (३१७)

वर प्रतिपादलेल्या विवेक, व्यक्तिस्वातंत्र्य, समता, बलात्कार विरुद्ध संमति-या तत्त्वांच्या आधारे आगरकरांनी आपल्या सर्व आचारविचारांचे कठोर परीक्षण केले. आपल्या समाजरचनेत त्यांना अनेक गंभीर दोष आढळले. ते त्यांनी निर्भयपणे लोकांपुढे मांडून त्यांतील अन्यायाची, निर्घृणतेची त्यांना जाणीव करून दिली; ते दोष दूर करून त्यांच्या जागी नवीन आचारविचार सुचविले, आणि

लोकांनी त्यांचा स्वीकार करावा यासाठी ते अविरत झटले.

आगरकरांचा सुधारणाविचार सर्वस्पर्शी होता. या विचाराची सुरुवात त्यांनी कुटुंबाच्या सुधारणेपासून केली. ते म्हणतात, ''समाजाचे मुख्य घटक कुटुंबे होत, व कुटुंबाचे मुख्य घटक स्त्रीपुरुष होत. तेव्हा कुटुंबांचा विचार करतांना प्रथम स्त्रीपुरुषांमधील संबंधाचा विचार केला पाहिजे.' (३७) हा विचार करू लागल्यावर आपल्याला असे दिसते की आपली समाजरचना पुरुषप्रधान असल्यामुळे स्त्रीवर अतिशय अन्याय करणारी आहे. तिची स्थिती गुलामापेक्षा विशेष चांगली आहे असे म्हणवत नाही. बलात्कारतत्त्वाचा अंमल कुटुंबात फार मोठ्या प्रमाणात अजूनही चालू आहे.

आगरकरांच्या काळी तर स्त्रीची स्थिती फारच शोचनीय होती. बालविवाह, आर्थिक पारतंत्र्य, शिक्षणाचा अभाव इत्यादींनी स्त्रीचे जीवन पूर्ण जखडून टाकले होते. त्यातही उच्चवर्णीय स्त्रीची अवस्था काही बाबतीत अधिकच दुर्धर होती. खालच्या वर्गात स्त्रीला मिळणाऱ्या घटस्फोट व पुनर्विवाह या सवलती उच्चवर्णीय स्त्रीला नव्हत्या. तिचा विवाह एकदाच होऊ शकत होता, व तोही अतिशय अल्पवयात, बारा वर्षे वयाच्या आत; पण पुरुषाला मात्र कोणत्याही वयात कितीदाही विवाह करण्याची मोकळीक होती. बालाजरठ विवाहामुळे असंख्य मुलींच्या कपाळी वैधव्य येणे अपरिहार्य असे, आणि ते एकदा आले की कायमचे राही; कारण पुनर्विवाहाचा स्त्रीला अधिकार नव्हता. त्यामुळे कित्येक मुलींना संसारसुखाचा स्पर्शही न होता आमरण वैधव्य भोगावे लागे. शिवाय विधवांचे केशवपन करण्यात येऊन त्यांना विद्रूप केले जाई, त्यांना अशुभ मानले जाई आणि उरलेले संबंध आयुष्य त्यांना आप्तांच्या संसारातील काबाडकष्ट उपसण्यात व्यतीत करावे लागे. तसेच अल्पवयी कन्यकांवर त्यांच्या प्रौढ नवऱ्यांकडून अकाली संभोगामुळे जायबंदी होण्याचे आणि क्वचित मृत्युमुखी पडण्याचे दुर्दैव ओढवे. स्त्रीची ही सारी भयानक दुरवस्था आगरकरांना आपल्या भोवती प्रत्यही दिसत होती. तिच्या दुःखाची आच ते प्रत्यक्ष अनुभवीत होते. त्यामुळे साहजिकच त्यांचे लक्ष प्रथम प्रामुख्याने या प्रश्नाकडे वळले. बालविवाह, घटस्फोट, पुनर्विवाह, केशवपन या प्रश्नांवर त्यांनी प्रखर शस्त्र उगारले. या सुधारणा करण्यासाठी कायद्याचीही मदत घ्यावी असे त्यांचे मत होते. कायद्याने सुधारणा करण्याच्या याच प्रश्नावरून त्यांचा लो. टिळकांशी संघर्ष झाला, तेव्हा या चालीतील अन्याय व क्रौर्य वेशीवर टांगण्याकरिता आगरकरांनी **सुधारकाचे** अंकचे अंक खर्ची घातले. स्त्रीची शतकानुशतके होत आलेली दुर्दशा, अवहेलना आणि विटंबना पाहून ते विलक्षण व्याकुळ होत, संतप्त होत व मग त्यांच्या लेखणीतून एकच

वेळी करुण व रौद्र उद्‌गार बाहेर पडत. कायद्याने बालविवाहाचा प्रतिबंध केल्यास आईबापांच्या स्वातंत्र्याचा उच्छेद होतो असे म्हणणाऱ्या लोकांवर ते त्वेषाने तुटून पडतात : 'वाहवा! मूर्ख आईबापांनी कधी अज्ञानाने, कधी लोकापवादभयाने व कधी लोभाने आपल्या अल्पवयस्क मुलांचे आमरण नुकसान करावे, आणि ते करण्याचा हक्क त्यांच्याकडे राहू देण्याबद्दल सुशिक्षित म्हणवून घेणाऱ्या ''थंड्या'' सुधारकांनी अखिल वातावरण आपल्या आक्रोशाने भरून सोडावे, याहून अधिक विस्मयजनक देखाव्याची कल्पना करणे देखील कठीण आहे! दुसऱ्यास कुरूप करण्याचा हक्क! पोटच्या पोरीचे कुंकू पुसण्याचा अधिकार! मुलाच्या बायकोस नापितापुढे बसविण्याचे स्वातंत्र्य! असले हक्क, असले अधिकार, असले स्वातंत्र्य राखण्याबद्दल अकांडतांडव करणाऱ्यास हक्क, अधिकार व स्वातंत्र्य यांचा अर्थ व उपयोग मुळीच समजत नाही, आणि यासंबंधाने यांचे बोल स्वातंत्र्याच्या शुद्ध वल्गना होत, असे म्हणणे भाग आहे.' (९५) बालाजरठविवाहाने विषण्ण होऊन ते लिहितात : 'एखादी जाईची कळी निवडुंगावर, किंवा सोनचाफ्याचे फूल कोरांटीवर आणून टाकण्यात कांय शहाणपण व भूषण असेल ते असो.' (८१) संमतिवयाच्या बिलाच्या निमित्ताने ब्रिटिश सरकारला आपल्या धर्माचारात हात घालू देणे बरोबर नाही असे म्हणणाऱ्या लोकांना ते संतापून उपहासाने विचारतात, 'भेकड, प्रतिष्ठाखोर हिंदु लोकांनो, ज्या वेळेस पोर्तुगीज लोकांनी ख्रिस्ती धर्म स्थापण्यासाठी कोकणपट्टीत तुमचे अनन्वित हाल केले, त्यावेळेस तुमचा धर्माभिमान कोठे गेला होता? विषयलंपट, निःशक्त वाचाळ बाबूंनो, जेव्हा महंदमदीयांनी हिंदुस्थानच्या एका टोकापासून दुसऱ्या टोकापर्यंत साऱ्या हिंदु लोकांस धर्मवेडाने जर्जर करून सोडले....तेव्हा धर्मरक्षणासाठी आताप्रमाणे तुम्ही नुसता आरडा तरी करावयाचा होता!.... आणि आता दयावंत ब्रिटिश सरकार केवळ परोपकारबुद्धीने आपल्या लहान पोरींवर जुलूम करून नका, येवढे अदबीने सांगत असता त्यावर तुम्ही आपले धर्मास्त्र सोडता, आणि कामाच्या झपाट्यात निराश्रित कुमारिकांची अंगे विदारण्याचा हक्क आमच्या धर्माने आम्हांस दिला आहे, व जर सरकार तो घेण्याचा प्रयत्न करील तर त्याला आमच्या असंतोषाचे फळ भोगावे लागणार, अशी धमकी घालता! धिक्कार असो तुम्हाला, तुमच्या धर्माला, आणि तुमच्या हक्काला!!!' (१३६)

आगरकरांच्या स्त्रीसुधारणेचा आवाका फार मोठा होता. संपूर्ण स्त्रीवर्गाच्या पुरुषार्थाला कोणतीही आडकाठी असणे त्यांना मान्य नव्हते. पुरुषांना जे जे स्वातंत्र्य, हक्क आणि अधिकार आहेत; ते सर्व स्त्रियांना दिले पाहिजेत असे त्यांचे म्हणणे होते. पुरुषांना जे शिक्षण आपण देतो हे सर्व शिक्षण स्त्रियांनाही

द्यावे, आणि तेही एकत्र द्यावे, असा त्यांचा आग्रह होता. आज शिक्षणाभावी स्त्रियांच्या बुद्धीची नासाडी होत आहे, त्यामुळे त्यांचे जसे नुकसान होते तसेच समाजाचेही होत आहे. स्त्रीला कोणताही व्यवसाय करण्याचे स्वातंत्र्य दिले पाहिजे असे ते म्हणत. त्यामुळे 'कित्येक पुरुषांना घरी बसून मुले खेळविण्याचे, लुगडी धुण्याचे, भांडी घासण्याचे, स्वयंपाक करण्याचे, दळणकांडण करण्याचे काम करावे' (२०१) लागले तरी त्याला आगरकरांची तयारी होती. ते म्हणत की, 'स्त्रीला मुले होतात म्हणून प्रपंचातील हलकी कामेही तिनेच केली पाहिजेत असे नाही' तसेच 'सध्या स्त्रियांना जीं इतकी मुलें होतात ती त्यांच्या संतोषाने होतात असे आम्हांस वाटत नाही. यासंबंधाने पुरुषांकडून स्त्रियांवर जुलूम होतो असा आमचा समज आहे.... स्त्रियांप्रमाणे त्यांनाही कधी कधी प्रसूतिवैराग्य होण्याचा संभव असता, तर उभयतांच्या संयमाने बराच भूभार कमी होता.... विवाहाच्या कामी स्त्रीपुरुषांची संमति जितकी अवश्य आहे तितकीच संमति विवाहाच्या अमलातही दृष्टीस पडू लागली पाहिजे. तसे होऊ लागेल तेव्हाच स्त्रियांची पुष्कळ विपत्ति टळेल.' (२०१-२०२) याप्रमाणे स्त्रीशिक्षण, अर्थार्जन, स्वयंवर, घटस्फोट, पुनर्विवाह, संततिनियमन, इत्यादी सर्व सुधारणांचा आगरकरांनी पुरस्कार केला आहे. पुरुष म्हणून त्यांनी हातचे काहीही राखून ठेवले नाही.

हे हक्क फक्त उच्चवर्णीय स्त्रियांनाच नव्हेत, तर सर्व स्त्रियांना मिळाले पाहिजेत असे त्यांनी प्रतिपादले आहे. उदा. ब्राह्मण स्त्रीवर जसे केशवपन, पुनर्विवाहबंदी, इत्यादि जुलूम होत होते, त्याचप्रमाणे मराठा स्त्रीस गोषात ठेवल्यामुळे तिच्यावर अनेक बंधने घातली गेली होती. म्हणून जेव्हा सयाजीराव गायकवाड महाराजांनी स्त्रीशिक्षणाविषयी आगरकरांना प्रश्न विचारला, तेव्हा त्यासंबंधात ते लिहितात : 'श्री. सयाजीराव महाराज गायकवाड मुलांच्या शिक्षणाप्रमाणेच मुलींच्या प्राथमिक शिक्षणाबद्दलही सक्तींचा कायदा करतील, तर उच्च कुलातल्या मराठ्यांनी आपल्या स्त्रियांस आजपर्यंत गोषात कोंडून घातल्यामुळे जी अपकीर्ति संपादली आहे तिचे परिमार्जन होऊन प्रख्यात लोकशास्त्यांच्या नाममालिकेत त्यांचे नाव चिरस्थाई होऊन बसेल.' (१९६)

आगरकरांचा सुधारणाविचार समाजाचे सर्व जीवन व्यापून टाकणारा होता. तुम्हाला 'समाजात सुधारणा हव्या तरी किती?' ह्या एका सोलापूरकर 'अपरिचित' मित्राने विचारलेल्या प्रश्नाला दिलेल्या उत्तरात ते म्हणतात : 'त्याच्या [सुधारकाच्या] सुधारणाबुभुक्षेस मर्यादाच नाही, असे म्हटले तरी चालेल!... मनुष्याच्या स्थितीत पूर्णता येणे बहुध अशक्य आहे; पण ती येईतोपर्यंत सुधारकाच्या मनाची शांती व्हावयाची नाही! सध्या आपल्या देशात ज्या सुधारणांची वाटाघाट चालली आहे

त्या अमलात आल्यावर जातिभेद मोडणे, धर्मसुधारणा करणे, मदिरा व मांस यांचे सेवन बंद होणे, वगैरे अनेक गोष्टींकडे लोकांचे लक्ष लागले पाहिजे. सर्वांत सार्वजनिक शिक्षणाची फार आवश्यकता आहे. हिंदुस्थानातील एकूण एक प्रौढ स्त्री-पुरुषास लिहिता वाचता आले पाहिजे; तसेच प्रत्येक व्यक्तीस आपला चरितार्थ चालविण्यासारखा एखादा तरी धंदा येत असला पाहिजे... इतकेच नाही तर सहजगत्या उदरपोषण करता येऊन दिवसाचा काही वेळ आत्मचिंतनाकडे, आवडत्या शास्त्राच्या अभ्यासाकडे, मनास रुचेल ती कर्मणूक करण्याकडे किंवा विश्रांतीकडे लावता आला पाहिजे.' (१६०-६१)

स्त्रीपुरुषविषमतेप्रमाणेच जातिभेद आणि तदंतर्गत अस्पृश्यता अतिशय अन्याय्य असून ती आमच्या समाजोन्नतीच्या मार्गातील फार मोठा अडथळा आहे हे आगरकरांनी वारंवार सांगितले आहे. या व्यवस्थेत मनुष्याला शिक्षण, व्यवसाय, प्रतिष्ठा इत्यादी गोष्टी विशिष्ट जातीत जन्म मिळाला, तरच प्राप्त होत होत्या. त्यामुळे आपल्या योग्यतेप्रमाणे पुरुषार्थ गाजविण्याची माणसाला मोकळीक नव्हती. विशिष्ट जातीत जन्मणे हे माणसाच्या हातात नसते; पण अशा सर्वस्वी यादृच्छिक घटनेने माणसाचे भवितव्य निश्चित केले जात होते. जातीच्या आधारानेच तो उच्च किंवा नीच ठरविला जात होता. आजही ही स्थिती बऱ्याच प्रमाणात कायम आहे. आगरकर म्हणतात, 'ब्राह्मणांनी विद्या संपादावी, क्षत्रियांनी राज्य करावे, वैश्यांनी व्यापार करावा, आणि शूद्रांनी कनिष्ठ प्रतीची सेवा करावी, ही आमची पूर्वीची व्यवस्था. (१९७) अशा व्यवस्थेत साहजिकच सर्वांत जास्त झळ पोहोचते ती अस्पृश्य मानल्या गेलेल्या वर्गाला. समाजाची घाण उपसून त्यांचे आरोग्य सांभाळणाऱ्या वर्गाबद्दल कृतज्ञ राहावयाचे सोडून आम्ही त्यांनाच अस्पर्श्य मानले व वाळीत टाकले. आगरकरांनी या अस्पृश्यतापालनातील क्रौर्य, अन्याय, मौर्ख्य, विचारशून्यता अतिशय भेदकपणे दाखविली आहेत, आणि जातिभेदानिर्मूलनाखेरीज आमच्यात खरे ऐक्य होणे शक्य नाही व त्यामुळे आमचा राजकीय लढाही यशस्वी होणार नाही, तसेच तो न्याय्य व सुसंगतही ठरणार नाही हे वारंवार बजावले आहे. ''महारांची सावली पडली असताही विटाळ मानणारे लोक कितीही लांब जिभा करून 'आमचा रंग काळा असला व तुमचा रंग गोरा असला म्हणून काय झाले? रंगावर काही मनुष्याची पात्रापात्रता ठरत नाही' वगैरे गोष्टी प्रतिपादू लागले, तथापि त्यांच्या शब्दास जोर येण्याचा संभव नाही, व त्याचा परिणामही होणे नाही. त्या शब्दांस जोर येऊन, इतरांनी ते ऐकलेच पाहिजेत अशी खरोखर इच्छा असल्यास, 'ब्राह्मणोऽस्य मुखमासीत्' हे पक्षपाती शास्त्र झुगारून देऊन, आपल्या मांडीला मांडी भिडवून शाळांतून

बसण्यास महारास मोकळीस दिली पाहिजे'' (३८३)

अस्पृश्यांशी होणारा आपला व्यवहार किती भयंकर आणि निंद्य आहे हे दाखविताना ते म्हणतात : 'जोड्यांचा आमचा सकाळसंध्याकाळ नित्य सहवास असतो! पण चमत्कार हा की, हा सर्वोपयोगी पदार्थ तयार करणारे चर्मकार अपवित्रेची खाण होऊन बसले आहेत! त्यांच्या हातांतील जोडे घेताना 'अरे दुरून टाक, दूर हो, विटाळ करशील,' अशी एकच ओरड करून दिली पाहिजे! मेलेल्या किंवा मारलेल्या जनावराच्या कातड्यापेक्षा जिवंत मनुष्य विशेष अस्पर्श्य काय! पण धर्मासंबंधात विचार करतो कोण?'' (३३) कोणी असे म्हणतील की, महार, ढोर वगैरे जातींचे लोक निंद्य आहार व आचार करतात, त्यामुळे त्यांना अस्पृर्श्य मानणे स्वाभाविक आहे. त्यावर आगरकर म्हणतात की या आक्षेपावर फार सोपे उत्तर आहे. 'क्षणभर अशी कल्पना करा की, ढोर, भंगी, महार, धेड व चांभार यांनी आपापले धंदे काही वेळ न करण्याचा कट केला, तर स्वत:स उच्च मानून घेणाऱ्यांची काय अवस्था होईल? .... समाजाच्या विलक्षण रहाटीमुळे उच्चनीचत्व अस्तित्वात येऊन तदनुसार जो व्यवसायविभाग सहजगत्या झाला आहे, त्यास ईश्वरकृत व सनातन मानून उच्च वर्गात जन्मास आलेल्या लोकांनी नीच वर्गात जन्माला, आलेल्या लोकांस अपवित्र व अस्पृर्श्य मानणे, याहून मनुष्याच्या विचारीपणास लांछनास्पद अशी दुसरी गोष्ट नाही. ...ज्यांचा धर्म व आचार हिंदु, जे अनादि कालापासून हिंदुस्थानचे रहिवासी, ज्यांच्या हातून गोवध होत नाही, ज्यांना मदिरापानादि मनुष्यतेचा भ्रंश करणाऱ्या व्यसनांचा म्हणण्यासारखा नाद नाही, अशा हिंदूंचा आम्ही तिरस्कार करतो, त्यांना स्पर्श करण्यास भितो, आणि त्यांहून अनेक कारणांमुळे अस्पर्श्य अशा परकीयांस दृढालिंगन देतो, हा केवढा प्रमाद होय!' (६४-६५)

अस्पृश्यतेच्या रूढीमुळे आपल्या धर्मावर व देशावर येऊं घातलेल्या संकटाचा इशाराही आगरकरांनी देऊन ठेवला होता. ख्रिस्ती मिशनऱ्यांनी चालविलेल्या अस्पृश्यांच्या धर्मांतराच्या संकटाची भयावहता दाखविताना ते म्हणतात 'आम्ही चालू हिंदू धर्मावर कितीही तीक्ष्ण प्रहार केले; तथापि आमचा देश ख्रिस्ती व्हावा ही नुसती कल्पनाही आम्हास सहन होणारी नाही. आमच्यातील अतिशूद्र लोकांस आम्ही अगदी दूर टाकल्यामुळे त्यांची एकसारखी ख्रिस्ती धर्माकडे धाव चालू आहे, ही गोष्ट आम्हास अत्यंत उद्वेगजनक आहे, व या लोकांस आम्ही जवळ घेऊ लागून त्यांचा तिकडील ओघ परत फिरेल तो सुदिन असे आम्हास वाटत आहे!' ते पुढे म्हणतात, 'ब्राह्मणेतरांच्या हातचा चहा पिण्यात आम्हांस दोष वाटत नाही. इतकेच नाही, तर आमच्या नीच मानलेल्या महारांची

स्थिती सुधारून त्यांची व वेदशास्त्रसंपन्न ब्राह्मणांची एक पंगत झालेली जर आम्हांस पाहता येती, तर आम्ही स्वत:स मोठे कृतार्थ मानले असते ही गोष्ट आमच्या बांधवांपासून आम्ही चोरून ठेवीत नाही.'[९] यावरून अस्पृश्यता निर्मूलनाची त्यांची मागणी गुळमुळीत आणि वरवरची नसून नि:संदिग्ध व मूलगामी स्वरूपाची होती हे स्पष्ट होते.

अस्पृश्यांप्रमाणे श्रमजीवी वर्गावरील अन्यायही त्यांच्या नजरेतून सुटला नाही. या संबंधात त्यांनी मांडलेला पुढील विचार मूलगामी स्वरूपाचा आहे. ते म्हणतात, 'विचार करणारे, उपभोग घेणारे व काम करणारे असे; जे सांप्रत काली प्रत्येक देशात तीन ठळक वर्ग दृष्टीस पडतात,ते कायमचे नव्हते. हळूहळू प्रत्येक व्यक्तीस विचार, उपभोग आणि काम ही समप्रमाणाने करावी लागून साऱ्यांच्या सुखानुभवाची इयत्ता सारखी होत जाणार आहे; व जो जो ती तशी होत जाईल, तो तो खरी उन्नती होऊ लागली असे म्हणता येऊ लागेल.' (४७)

कोणत्याही अन्यायाला वाचा फोडताना आगरकर त्याची मूलगामी कारणमीमांसा करीत आणि तो दूर करण्याचे उपायही सुचवीत. ह्याचे एक उदाहरण म्हणजे रेल्वे कंपन्यावरील त्यांचे लेख. जी. आय. पी. आणि एस. एम. या दोन रेल्वे कंपन्यांतील युरोपियन आणि नेटिव्ह नोकरांच्या पगारांत, कामात आणि सवलतीत असलेल्या विलक्षण पक्षपाताविषयीच्या लेखास 'यांना कोणी विचारता नाही काय?' असे खरमरीत शीर्षक ते देतात. त्यात ते म्हणतात. 'एकटा युरोपियन कधी कधी पन्नास नेटिवांचे अन्न गट्ट करून बसतो! व काम म्हणाल तर दोन नेटिवांइतके देखील होण्याची मारामार!' नेटिव्ह नोकरांच्या बाबतीत 'रेल्वेची नोकरी म्हणजे शुद्ध गुलामगिरी होऊन बसली आहे...नोकरी करणारांची शरीरे ओतीव लोखंडाची केली असली तरी ती सुद्धा चारसहा महिन्यात झिजून जाऊन मोडकळीस येतील असे वाटते! मग हाडामांसाच्या माणसांची कथा काय!' सरकार आणि रेल्वे कंपन्या यावरील दोन निबंधांत उतारू, व्यापारी व नोकरवर्ग यांची सर्व प्रकारे होणारी गैरसोय दाखवून ते म्हणतात की नेटिव्ह लोक बरेच कडवे असते तर युरोपिअन लोकांप्रमाणे त्यांचाही मानमरातब राहता. नेटिव्ह नोकरांची शोचनीय अवस्था दूर होण्याकरिता त्यांनी संघटना कशी करावी, आपल्या न्याय्य मागण्या मान्य होत नसतील तर कट (संप) कसा करावा, तो करताना मारामाऱ्या, धमक्या, यांपासून पूर्ण अलिप्त राहून आपला लढा कायदेशीर (कॉन्स्टिट्यूशनल)

---

९. 'इति श्रीचहाग्रामण्यप्रकरणं समाप्तम्।'

असण्याविषयी त्यांनी जागरूक कसे राहावे, आणखी कोणकोणती दक्षता घ्यावी हे सारे ते सविस्तर सांगतात. कोणत्याही क्षेत्रातील कामगारांना मार्गदर्शक ठरतील अशा मोलाच्या सूचना त्यांनी या निबंधातून दिल्या आहेत.

आपल्या अर्थकारणाचाही आगरकरांनी सांगोपांग विचार केला आहे. भारतातील वाढत्या दारिद्र्याबद्दल त्यांनी सरकारला तर धारेवरच धरलेच, पण त्याचबरोबर समाजालाही दारिद्र्य दूर करण्याचे उपाय सांगितले. ते म्हणतात की, 'व्यापारवृद्धि हा समाजोत्कर्षाचा एक मुख्य घटक आहे. मनुष्याच्या उद्योगांचे जे दोन मुख्य भेद आहेत, म्हणजे एक नियामक (उदा. राजे, मंत्री, लष्करी शिपाई, न्यायाधीश, शिक्षक इत्यादि) आणि दुसरा उत्पादक (उदा. शेतकरी, कोष्टी, सुतार गवंडी, कारागीर, धंदेवाले) यांपैकी ज्या देशात उत्पादक उद्योग करणाऱ्यांची संख्या मोठी असते, व केवळ नियामक उद्योग करणाऱ्यांची संख्या अगदी स्वल्प असते, तो देश सुखी असतो, व ज्या देशात याच्या उलट स्थिती असते, तेथे क्रांत्या होतात. १७८९ साली फ्रान्स देशात जी मोठी राज्यक्रांती झाली तिच्या अनेक कारणांपैकी फाजील अंमलदार हे एक मुख्य कारण होते असे ते म्हणतात. आपल्याकडील सुशिक्षित लोकांनी सगळा जीव सरकारी नोकरीवर ठेवल्यामुळे आपली किंमत फार कमी करून घेतली आहे. 'कोठे १०/१२ रुपयांची जागा रिकामी झाली की, तीबद्दल शेपन्नास मॅट्रिक्युलेशन पास झालेल्या उमेदवाराचे अर्ज! धिक् तुमची विद्या आणि तुमचे कर्तृत्व! कष्टाने संपादिलेल्या विद्येचा असा सवंग विक्रय करावयाचा काय? विद्यार्जनाने विकसित झालेली मने स्वतंत्र धंदे स्थापण्याकडे लावाल, तर तुम्हास अन्नाची किंवा मानाची काय वाण पडणार आहे? पण खांदा देऊन काम करण्याची व दुसऱ्याचे गुलाम न होता स्वतःच्या करामतीवर चरितार्थ संपादण्याची धमक आता कोठे राहिली आहे?' (६९-७०)

अर्थकारणावरील आगरकरांचे बरेच लेख मुख्यतः राजकीय स्वरूपाचे असल्यामुळे त्यांचा परामर्श त्यांच्या राजकीय सुधारणा विचारात घेऊ.

या विविध विषयांप्रमाणेच आगरकरांनी हिंदु-मुसलमानांच्या प्रश्नावरही फार परखड विचार मांडले आहेत. मुंबईत १८९३ साली हिंदू-मुसलमानांचा दंगा झाला आणि त्याचे पडसाद इतरत्र उमटून या दोन जमातींमधील तेढ वाढू लागली. तेव्हा त्या विषयावर अनेक निबंधांतून आगरकरांनी जे विचार प्रकट केले ते आजही लक्षात ठेवण्यासारखे आहेत. मुसलमानांना नेहमी झुकते माप देणाऱ्या ब्रिटिश राज्यकर्त्यांना ते निर्भयपणे बजावतात : 'राज्य काबीज करण्यात भेद करण्याने कदाचित फायदा होत असेल; (पण) संपादिलेल्या राज्याचे संरक्षण

होऊन सर्व प्रजा संतुष्ट राहण्यास नि:पक्षपाती न्यायासारखे दुसरे साधन नाही.'[१०] ज्या इंग्रजी अधिकाऱ्यांना मुसलमानांची विशेष कळकळ येत असेल त्यांनी त्यांना पाहिजे तर स्वत:चे पगार लावून द्यावे; पण गरीब हिंदूंवर त्यांचेसाठी विनाकारण इतराजी करू नये; कारण, हिंदू हा जरी पराकाष्ठेचा कृतज्ञ, राजनिष्ठ व शांतिप्रिय प्राणी आहे, तरी अन्यायाचा अतिरेक झाला असता त्याचे सुद्धा स्वस्वामित्व नाहीसे होणे हे अगदी स्वाभाविक आहे, हे असल्या अधिकाऱ्यांनी हमेशा ध्यानात ठेवले पाहिजे.'[११]

याच सुमारास इस्माइल खान नावाच्या एका गृहस्थाने लिहिलेले एक पत्र **लंडन टाइम्सने** प्रसिद्ध केले. त्यात तो लिहितो, 'मुसलमान लोक जरी संख्येने हिंदूंहून फार कमी आहेत, तथापि हिंदूंच्या बरोबरीने त्यांस सर्व हक्क मिळाल्यावाचून ते स्वस्थ बसणार नाहीत.....गत काली आमचे पूर्वज हिंदुस्थानावर आपला अंमल गाजवीत होते, हे आम्ही अद्याप विसरलो नाही; व ज्या राष्ट्रास आम्ही एकदा पादाक्रांत केले होते, त्या गर्विष्ठ व दुराग्रही राष्ट्रापुढे डोके वाकविण्याचे काम आमच्या हातून कालत्रयीही व्हावयाचे नाही.'[१२] या पत्रात इस्माइलखानाने दिलेल्या धमकीची खरपूस हजेरी घेऊन आगरकरांनी मुसलमानांना त्यांची जागा स्पष्ट शब्दांत दाखवून दिली आहे. ते लिहितात, 'इस्माइलखानाच्या पत्रास **लंडन टाइम्सने** जागा कशी दिली, याचाच आम्हास मोठा चमत्कार वाटतो. एखाद्या हिंदूने असे पत्र लिहिले असते तर ते खचित राजद्रोही ठरले असते. .... हिंदुस्थानचे राज्य इंग्रजांनी मुसलमानांपासून घेतले हे (इस्माइलखानाचे) म्हणणे बरोबर नाही. रजपूत, मराठे व शीख यांनी इंग्रजी होण्यापूर्वी मुसलमानांची बादशाही जमीनदोस्त केली होती..... आम्ही हिंदू लोकांस ठोकून काढून नाहीसे करू, असल्या शुष्क वल्गना करण्यात मुसलमानांनी कधीही समाधान मानू नये. ऐन सद्दीच्या दिवसांत जी गोष्ट करता आली नाही, ती आता साधण्याचा मुळीच संभव नाही.... मुसलमान लोकांचा खरा तरणोपाय हिंदू लोकांशी एकमत करण्यात आणि जोडीने ज्ञान, संपत्ति व राजकीय हक्क संपादण्यात आहे, असे आम्हास वाटते.'[१३] असे न केल्यास त्यांनी हे लक्षात ठेवावे की 'जेव्हा आम्ही हिंदू लोक ब्रिटिश पलटणीची परवा न करता ब्रिटिश लोकांच्या हातून आपले राज्य हिसकावून

---

१०. 'हिंदु व मुसलमान यांचे ऐक्य कशानें होईल?

११. 'रास्त गोष्टीस भितो कोण?'

१२. 'हिंदु व मुसलमान यांच्यांत तंटे कां होतात?'

१३. 'हें विचारीपणाचें कृत्य नव्हे.'

घेण्यास तयार होऊ तेव्हा त्याबरोबर त्यांना टेकू देणाऱ्या मुसलमान लोकांचाही समाचार आम्हांस सहज घेता येणार आहे!'[१४]

'अशाने निभाव कसा लागेल?' या निबंधात आगरकर हिंदू लोक आणि हिंदू धर्म यांच्या शांति व सहिष्णुता या अनन्यसाधारण गुणांचा गौरवपूर्ण उल्लेख करतात आणि त्यांचा जर कोणी अंत पाहील तर स्वधर्मरक्षणासाठी तेही प्रतिटोला हाणल्यावाचून राहणार नाहीत असा खणखणीत इशाराही देतात. ते म्हणतात, 'हिंदू लोक जात्या गरीब आहेत; ते आपण होऊन विनाकारण कोणाच्याही अंगावर तुटून पडावयाचे नाहीत; एका दृष्टीने त्यांच्या धर्मासारखा दुसरा धर्म नाही; व्यावृत्ति हा या धर्माचा प्रशंसनीय गुण होय; परधर्माच्या लोकांनी हिंदू व्हावे अशी या धर्माची बिलकुल इच्छा नाही. ... मुसलमानांपेक्षा किंवा ख्रिस्ती लोकांपेक्षा हिंदू लोकांच्या वृत्तीत जी शांति दिसते तिचे हेच कारण होय. ... तथापि जोपर्यंत दुसऱ्या लोकांची डोकी धर्मवेडांनी भणभणून गेली आहेत, तोपर्यंत त्यांच्याशी संबंध पडणाऱ्या लोकांतही धर्माभिमानाचे थोडेस वारे असले पाहिजे; नाहीतर त्यांच्या हातून स्वधर्माचे संरक्षण व्हावयाचे नाही. हिंदू लोकांचा धर्माभिमान इतक्यापुरता आहे, व तो श्लाघ्य आहे.'

वरील नि:संदिग्ध उद्‌गारांतून आगरकरांना हिंदुधर्माबद्दल असलेली गाढ आत्मीयता, रास्त अभिमान व त्याच्या संरक्षणाची तळमळ व्यक्त होते. त्यांच्यावर धर्मबुडवेपणाचा आरोप करणाऱ्यांनी हे उद्‌गार लक्षात घेण्यासारखे आहेत.

आगरकरांच्या सुधारणाविचाराचा परामर्श घेताना आपण प्रथम त्यांच्या राज्यशास्त्रीय विचाराकडे दृष्टिक्षेप टाकलाच आहे. विशेषत: स्वातंत्र्य, समता आणि संमतितत्त्व ही तत्त्वे मूलत: राज्यशास्त्रीयच आहेत; परंतु आगरकरांच्या दैनंदिन राजकारणविषयक विचारांचा परामर्श आपण अजून घेतला नाही. त्याकडे आपण वळू.

आगरकर म्हणजे सामाजिक सुधारणा असे समीकरण अनेकांच्या अंत:करणात ठाण मांडून बसले आहे. परंतु आगरकर जसे जहाल समाजसुधारक होते तसेच ते जहाल स्वराज्यवादीही होते ही गोष्ट बहुतेकांना अज्ञात आहे, असे म्हणावे लागते. आगरकरांच्या जहाल स्वराज्यनिष्ठेबद्दल वाटेल तितका पुरावा त्यांच्या निबंधातून देता येईल. पण तो देण्यापूर्वी खुद्द लोकमान्य टिळकांनी दिलेली पुढील साक्ष निर्णायक समजण्यास हरकत नसावी.

इ. स. १९१६ मध्ये आगरकरांच्या पहिल्या स्मृतिदिनानिमित्त **केसरीत**

---

१४. 'रास्त गोष्टीस भितो कोण?'

लिहिलेल्या लेखात आगरकरांना केवळ सामाजिक सुधारक म्हणणाऱ्यांना उद्देशून टिळक लिहितात : "जणू काय सुधारणेखेरीज आगरकरांनी काहीच कामगिरी केली नाही. ... आगरकरांची राजकीय मते काय होती याची यांनी चौकशी केली होती काय? १८८८ सालापर्यंत केसरीत जे राजकीय विषयावर लेख आले ते बहुतेक आगरकरांचे आहेत आणि त्यानंतर सुधारकांतही अशा प्रकारचे बरेच निबंध आले आहेत. या सर्वांचे सूक्ष्म निरीक्षण केले असतां असे दिसून येईल की, आगरकर हे पक्के स्वराज्यवादी होते. ... राजकीय व औद्यागिक अवनति पाहून त्यांचे चित्त केशवपनादि चालींच्या निरीक्षणांपेक्षांही अधिक संतप्त व दु:खित होत असे. ... जो तार्किकपणा समाजसुधारणेसंबंधाने त्यांच्या अंगी वसत होता तोच तार्किकपणा त्यांनी राजकीय बाबींवरील आपल्या लेखांतही पूर्णपणे उपयोगांत आणिला आहे. ... ज्यांना बाकीच्या बाबती पाहवयाच्या नव्हत्या त्यांना सगळा आगरकर नको होता. किंबहुना तो त्यांच्या पचनीही पडला नसता."[१५]

आगरकरांच्या निबंधाच्या आधारानेही हाच मुद्दा सिद्ध होतो. ब्रिटिश राज्यकर्त्यांच्या विकसित संस्कृतीबद्दल व तिच्यामुळे झालेल्या आपल्या प्रबोधनाबद्दल जरी त्यांना आदर व कौतुक असले, आणि त्यांच्या अमलांत सामाजिक सुधारणा करण्यास अनुकूल काल प्राप्त झाला आहे असेही ते मानीत असले, तरी त्याबरोबर आलेले देशाचे पारतंत्र्य त्यांना अतिशय दु:सह होत होते. इतके की, त्यापुढे प्रसंगी त्यांना सामाजिक सुधारणा कमी महत्त्वाची वाटे. 'फेरजमाबंदी आणि लष्करी खर्च' या निबंधात ते म्हणतात, "मागे एका प्रसंगी आ. मि. जस्टिस तेलंग यांनी अत्युत्कृष्ट रीतीने प्रतिपादन केल्याप्रमाणे सामाजिक सुधारणांपेक्षाही राजकीय सुधारणा विशेष आवश्यक आहेत, आणि म्हणून राजकीय सुधारणा सामाजिक सुधारणांच्या अगोदर झाल्या पाहिजेत. सुधारणांचा वास्तविक पाहाता असा क्रम असून आमचे सरकार त्याचा व्युत्क्रम करू पाहते, हे आश्चर्य नव्हे काय! ... विशिष्ट प्रकारच्या राजकीय व्यवस्था समाजाच्या अस्तित्वाला अत्यावश्यक आहेत; म्हणजे त्या नसल्या तर समाजाची वाताहत होते. सामाजिक सुधारणांची तशी गोष्ट नाही. त्या समाजास शोभा देतात, किंवा विशेष प्रकारचा आनंद उत्पन्न करतात. तेव्हा त्या मागून झाल्या तरी चालतील. जातिभेद, बालविवाह, असंमत वैधव्य, केशवपन वगैरे दुष्ट चालींपासून आम्हास पुष्कळ त्रास होत आहे; पण मिठावरील जबरदस्त कर, दर तीस वर्षांनी आमच्या जमिनीच्या बोकांडीस बसणारा रेव्हिन्यू सर्वेचा फेरा, व यमोदराप्रमाणे प्रतिवर्षी कोट्यवधी

---

१५. न. चिं. केळकर, **लो. टिळक यांचे चरित्र**, पृ. २०१-२.

रुपये भक्ष्यस्थानी पडले तरी फिरून आपले हापापल्यासारखे करणारे लष्करी खाते, इत्यादिकांपासून आम्हास जो त्रास होत आहे, त्यापुढे सामाजिक शोचनीय दुराचारांपासून होणारा त्रास काहीच नाही, असे म्हटले तरी चालेल. या घटकेस ज्या विधवा वैधव्यदु:ख भोगीत आहेत, किंवा येथून पुढे आणखी शेपन्नास वर्षांत ज्यांना ते भोगावे लागेल, त्या सर्वांचे दु:ख एके ठिकाणी केले तरी ते १८७५-७६-७७ सालच्या दुष्काळांत जी साठ लक्ष मनुष्ये अन्नान्न करून मेली, त्यांच्या दु:खाबरोबर येणार नाही अशी आमची खात्री आहे.''

पारतंत्र्यामुळे देशाचे सर्व बाजूंनी किती नुकसान होते हे आगरकरांनी वारंवार दाखविले आहे. परकीय अंमलामुळे आमच्या देशावर आलेली प्रेतकळा, आमच्यावर प्रत्यही ओढवणारे मानहानीचे प्रसंग, आगच्या द्रव्याला लागलेली कायमची ओहोटी, आमचा व्यापार, कला, सण, खेळ व इतर गुणांचा दिवसानुदिवस होत असलेला ऱ्हास, इत्यादि असंख्य दोष साधार दाखवून, ही दु:स्थिती दूर करण्यासाठी आपला राज्यकारभार आपल्या हाती घेण्याखेरीज आपला तरणोपाय नाही, असे त्यांनी वेळोवेळी स्पष्टपणे म्हटले आहे.

हिंदुस्थानचे वाढते दारिद्र्य आगरकरांना कमालीचे बोचत असे. ब्रिटिशांनी हिंदुस्थानची जी लूट चालविली होती तिच्यामुळे येथील लोक दिवसानुदिवस अधिकाधिक दरिद्री होत चालले असून त्यांचे राज्य कायम असेपर्यंत तिच्यापासून सुटका नाही हे त्यांना स्वच्छ दिसत होते. अर्थकारणावर आगरकरांनी जे अनेक लेख लिहिले त्यांपैकी बहुतेक इंग्रजांच्या आर्थिक धोरणाचा खरपूस समाचार घेणारे आहेत, हे 'इंग्रजी राज्याची उलट बाजू अथवा आमचे घोर दारिद्र्य', 'हिंदुस्थानास क्षय लागला!', 'इंग्लिश राज्यांत पोटभर अन्न मिळत नाही', 'हिंदुस्थानांतील अन्नान्न दशेचे परिणाम', 'भांडवल गेले व्यापार गेला' अशा नुसत्या शीर्षकांवरूनही दिसून येते. 'गुलामांचे राष्ट्र' या निबंधात ते लिहितात, ''या शंभर वर्षात हिंदुस्थानचे उत्पन्न सरासरीने चाळीस कोटी पडले असे धरिले आणि त्याचा फक्त अर्धा भाग प्रतिवर्षी इंग्लिश लोकांच्या खिशांत पडला असे मानिले, तरी एका शतकांत दोन निखर्व रुपये या देशातून परदेशात गेले असा हिशेब होतो. ...आणखी पाच पंचवीस वर्षे असाच क्रम चालू राहील तर हिंदुस्थानातील लोक एकमेकांस खाऊ लागतील, किंवा भुकेच्या दु:सह यातनांमुळेच बेफाम होऊन जाऊन ते आपल्या राज्यकर्त्यांचे जूं झुगारून देण्यास प्रवृत्त होतील, असे डोळ्यापुढे ढळढळीत दिसून आल्यावाचून राहील काय?'' (१६५-६६)

हिंदुस्थानातील ब्रिटिश अंमलदारांवर होणारा खर्च आणि विशेषत:

लष्करावर होणारा अवाढव्य खर्च यामुळे हिंदुस्थानातील लोक अक्षरश: नागविले जात होते. ब्रिटिश अंमलदार आणि येथील देशी प्रजा यांच्याबाबतीत राज्यकर्त्यांकडून होणारा विलक्षण पक्षपात किती क्रूर आहे याची जाणीव ते सरकारला निर्भयपणे सतत करून देत होते. उदाहरणार्थ, रुप्याचा भाव उतरल्यामुळे युरोपिअन अंमलदारांचे नुकसान होते म्हणून त्यांच्या पगाराची भरपाई करण्यासाठी दोन तीन कोटी रुपये उभे करण्याच्या हेतूने एखादा जबरदस्त कर हिंदी लोकांवर लादण्याचा विचार पुढे आला, तेव्हा आगरकरांनी 'राज्यकर्त्यांनो, "लोभमूलानि पापानि" हे वचन ध्यानात ठेवा', 'अतितृष्णा न कर्तव्या, चक्रं भ्रमति मस्तके', 'शेळी जाते जिवानिशी खाणारा म्हणतो वातड!', 'जावई पाहुणा आला म्हणून टोणगा पान्हवेल काय' असे अनेक अतिशय प्रखर व सडेतोड लेख लिहून तो विचार किती अन्याय्य आणि अनर्थावह होणार आहे हे स्पष्टपणे दाखवून दिले. 'कोणाच्याही सुखाचा तिसरा हिस्सा कमी होणे, आणि अन्नावाचून कोणालाही उपाशी मरावे लागणे यातील भेद तुम्हाला कळत नाही काय?' असे ते सरकारला ठणकावून विचारतात. 'हिंदुस्थानातील अर्ध्या लोकांस प्रतिदिवशी अर्धपोटी झोपावे लागते' ह्या डॉ हंटरसारख्या 'प्रमुख स्टॅटिस्टिकवाल्या' एका ब्रिटिश अधिकाऱ्याच्या अभिप्रायाचा हवाला देऊन आगरकर म्हणतात की, अशा स्थितीत राज्यकर्त्यांनी आगगाड्या, पोस्ट ऑफिसे, कॉलेजे, टोलेजंग इमारती, समर्थ फौजफाटा इत्यादि आमचे डोळे दिपवून टाकणाऱ्या अनेक सुखसोयींनी देश "कितीही नटवला असला तरी तो अंतर्यामी सुखी असेलच, असे खात्रीने म्हणवणार नाही. एखादे प्रसंगी मयासुराने निर्माण केलेल्या मायावी बाजारात खरेदी करून बनलेल्या गिऱ्हाइकाप्रमाणे आमची स्थिती होण्याचा संभव आहे!" (३१६)

राष्ट्रीय सभेसंबंधी आगरकरांनी जे विचार मांडले त्यांत त्यांचे राजकीय ध्येय स्पष्टपणे व्यक्त झाले आहे. 'अद्यापि राष्ट्रीय सभेचे काम झाले नाही' या निबंधात ते म्हणतात, 'आमच्या राष्ट्राला खरे राष्ट्रपण आणण्यासाठी आमच्या राष्ट्रसभेची स्थापना झाली आहे असे आम्ही समजतो. ... कोणत्याही राष्ट्राला राष्ट्रपण येणे म्हणजे त्यावर अम्मल करणाऱ्या सरकारचे नियंत्रण किंवा नियमन त्यांतील लोकांचे हाती येणे होय.'

राष्ट्रसभा मि. ए. ओ. ह्यूमसाहेबांनी अस्तित्वात आणली आणि आपले सामर्थ्यसर्वस्व खर्च करून तिचे हरएक प्रकारे सात वर्षे संरक्षण केले. त्यांनी हिंदुस्थानच्या भयप्रद दारिद्र्याबद्दल जेव्हा एक पत्रक काढले, तेव्हा त्यांच्यावर त्यांच्या जातभाईनी राजद्रोहाचा बडगा उचलला हे पाहून आमच्यातले शहाणेसुर्ते

म्हणविणारे काही लोकही त्यांच्यावर तुटून पडू लागले. तेव्हा संतप्त होऊन आगरकर उद्गारतात, 'खासा न्याय! खासे धैर्य! खासी देशभक्ती!. ...ह्यूमसाहेबांसारखी आमची आम्हास कळकळ असती तर राजद्रोहाचा किंवा दुसरा कसलाही आरोप आपणांवर आणून घेण्यास व त्याचे परिणाम साहण्यास आम्ही तयार झालो असतो.' (१६५-६६)

सिव्हिल सर्व्हिसची परीक्षा या देशात सुरू न करण्याची जी कारणे व्हाइसरॉय लॉर्ड लॅन्सडौनने दिली, ती पाहून आगरकर अत्यंत संतप्त व उद्विग्न होतात. या कारणांत एक कारण असे होते की, हिंदुस्थानची राज्यव्यवस्था सुरळीत चालण्यास युरोपियन अधिकाऱ्यांची जी संख्या राखणे अत्यंत अवश्य आहे, ती ही परीक्षा, या देशी सुरू केल्याने मुळीच राखता येणे शक्य नाही. दुसरे कारण परीक्षेवरच लायकी ठरविल्याने दुसरा असा एक अन्याय होण्याचा संभव आहे की, ज्यांना अधिकार गाजविण्याची पूर्वापार सवय झालेली आहे असे मुसलमान, शीख वगैरे लोक ही परीक्षेची कटकट त्यांच्याने उरकत नसल्याने मोठ्या जागांस नालायक ठरणार, व त्यांच्या अनेक गुणांस सरकार मुकणार. या कोटिक्रमास आगरकरांनी 'वेळ मोठी आणीबाणीची आहे, यावेळी स्वस्थ बसाल तर फसाल' या आपल्या झणझणीत लेखात खरमरीत उत्तर दिले आहे. ते विचारतात की, 'मुसलमान लोकांनी येथे मोठाले दिग्विजय केले आहेत म्हणून ते जर मोठ्या अधिकाराची कामे करण्यास लायक ठरतात, तर त्यास त्राहि त्राहि करावयास लावून अटकेपर्यंत आपला झेंडा नेणारे मराठे, त्या कामास नालायक का ठरावेत? मराठ्यांच्या पूर्वजांनीही बादशाही गाजविली नाही काय? पण या गोष्टी आता बोलून काय उपयोग? ''पंके निमग्ने करिणि भेको भवति मूर्धग:'' असो. अशा प्रकारे एका जातीस व्यर्थ महती देऊन दुसरीचा नाहक पाणउतारा करणे हे ''दुही माजवा आणि राज्य करा'' या मूर्ख तत्त्वाचा अवलंब करणारांस शोभो.'

आमच्या राज्यकर्त्यांची आमच्या बाबतीतील हीच पक्षपाती दृष्टी आमच्या व्यापारासंबंधीच्या त्यांच्या धोरणातही सतत दिसत होती. रुप्याची किंमत कमी झाल्यामुळे हिंदुस्थानच्या तिजोरीस आलेली साडेतीन कोटींची तूट भरून काढण्याकरिता परदेशातून येणाऱ्या मालावर पाच टक्के जकात बसविण्याचे, पण त्याला परदेशी कापडाचा अपवाद करण्याचे, घाटत होते. परंतु आयात व्यापारापैकी निम्मा भाग कापडाचा असल्यामुळे या जकातीमुळे सरकारला केवळ दीड कोटी रुपये उत्पन्न होणार होते. उरलेली तूट भरून काढण्याकरिता मग आमचा इन्कमटॅक्स वाढवावा व आधीच दरिद्री होत चाललेल्या जनतेस आणखी पिळून काढावे हा सरकारचा हेतू ओळखून आगरकर म्हणतात, 'ज्या गोष्टीचा

संबंध इंग्लंडच्या तिजोरीशी, तेथील व्यापाराशी किंवा इंग्रजांच्या अन्य हिताहिताशी पोचत असेल अशा बाबतीत इंग्लंडने हिंदुस्थानचे कल्याण केल्याचे व येथील लोकांस इंग्लंडपासून न्याय मिळाल्याचे क्वचितच उदाहरण दाखविता येईल.'[१६] वास्तविक कापडावर जकात बसविल्यास हिंदुस्थानची सर्व तूट भरून आली असती व मँचेस्टरवाल्यांचेही काडीइतके नुकसान होण्याचा संभव नव्हता. तरी सरकार हा विलक्षण अन्याय धडधडीत करीत होते आणि वर त्याचे मंडन करीत होते. हे पाहून आगरकर 'उघड अन्यायाचे नि:शंक मंडन' या जळजळीत लेखात म्हणतात की, 'आमच्या भावी सुस्थितीबद्दल आम्हास मोठी भीति उत्पन्न झाली आहे. माजी स्टेट सेक्रेटरी लॉर्ड किंबर्ले यांनी यासंबंधात हौस ऑफ लॉर्डस्‌मधे केलेल्या भाषणात स्पष्ट सांगितले की 'ग्रेट ब्रिटनने आपल्या स्वत:च्या हिताकडे दृष्टी देणे हे त्याचे प्रमुख कर्तव्य होय. ... तथापि अगदी आणीबाणीची वेळ येईल तर मात्र हिंदुस्थानचा तरणोपाय कशात आहे हे प्रथम पाहणे अवश्य होईल.' यावर आगरकर सरकारला 'हिंदुस्थानच्या प्राणांतसमयी तरी इंग्लंड त्यास अंतर देणार नाही, हे त्याचे महद्‌भाग्यच समजले पाहिजे' असा औपरोधिक टोमणा देतात व शेवटी बजावतात की, त्यांची ही अरेरावी सदैव चालणे सर्वथा अशक्य आहे. आज ना उद्या आपल्या या राजनीतीत त्यांना बदल करावाच लागेल.

राज्यकर्त्यांच्या अमर्याद स्वार्थाचे व जुलमाचे दुष्परिणाम किती भयानक होतात, हे इतिहासातील अनेक उदाहरणे देऊन आगरकरांनी दाखविले आहे. प्रजेच्या सामर्थ्यांबाहेर करवाढ करून ती वसूल करण्यास सरकारी अंमलदार जेव्हा जुलमाचा अतिरेक करतात तेव्हा सर्वत्र मारामाऱ्या सुरू होऊन अनवस्था कशी माजते, प्रजा एकदा बंड करून उठली की तिचा क्रोधाग्नी किती भडकतो हे सोदाहरण दाखवून सरकारला सावध करण्यास आगरकर मुळीच कचरत नाहीत. ते स्वच्छ शब्दांत सांगतात, 'प्रजा कितीही राजनिष्ठ असली तरी अचेतन वस्तूप्रमाणे पाहिजे तसली वागणूक ती हवा तेवढा वेळ सहन करील, असे समजणे हे शुद्ध मूर्खपण होय. ... सरकारी अंमलदारांचा जुलूम असह्य झाल्यामुळे लोकांनी हत्यारांस हात घालून छळ करणाऱ्या राजास आणि त्याच्या साथ्यांस कंठस्नान घातल्याची उदाहरणे पुष्कळ आहेत.'(३१३) ते पुढे म्हणतात, 'सारी प्रजा बेजार होऊन गेल्यावर काय प्रसंग गुदरतो याचे उदाहरण फ्रान्स देशात १७८९ साली जी प्रचंड राज्यक्रांती झाली ती देत आहे! शंभर वर्षांपूर्वी फ्रान्स

---

१६. 'हिंदुस्थानची तिजोरी आणि घाटत असलेला अन्याय.'

देशात लोकसंतापाग्नीचे जे भयंकर होमकुंड पेटले त्यात कित्येक शतकेपर्यंत अनाथ प्रजेवर जुलूम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या आणि सिंहासनस्थ राजाराणीच्या आहुत्या पडल्या!' (३१५)

परकीय राज्यकर्त्यांशी एवढ्या झुंजार वृत्तीने टक्कर घेणाऱ्या या व्यक्तीस नुसते जहाल राजकारणी नव्हे, तर ज्वलज्जहाल राजकारणी म्हणणेच सार्थ ठरणार नाही काय? आणि अशा व्यक्तीस आणखी आयुष्य लाभते तर १८९६ च्या भयानक दुष्काळातील सरकारची निर्घृण बेपर्वाई आणि १८९७ च्या प्लेगातील रँड साहेबांची उद्दाम अरेरावी पाहून तिने काय केले असते, हे सांगण्यास एखाद्या भविष्यवाद्याची आवश्यकता आहे काय?

४

समाजहितार्थ आपले सर्वस्व वेचणाऱ्या या विचारवंताबद्दल महाराष्ट्रात अनेक गैरसमज होते, आणि आजही आहेत, असे या लेखारंभी म्हटले आहे. आता त्या गैरसमजांचा क्रमशः परामर्श घेऊन हे विवेचन संपवू.

आगरकरांबद्दल जनतेत अप्रीती किंवा उदासीनता निर्माण होण्याचे प्रमुख कारण म्हणजे टिळकांसारख्या अखिल भारतीय कीर्तीच्या लोकमान्य नेत्यांशी झालेला त्यांचा मतभेद. आपल्या असामान्य कर्तृत्वाने भारतीय जनतेच्या हृदयसिंहासनावर विराजमान झालेल्या टिळकांसारख्या महान व्यक्तीशी आगकरांनी संघर्ष केला, त्यांच्यावर ते सर्व सामर्थ्यानिशी तुटून पडले, ही गोष्ट बहुसंख्य लोकांना धक्का देणारी वाटावी हे स्वाभाविक आहे. परंतु या दोघांतील मतभेदाची कारणमीमांसा निःपक्षपातीपणे केल्यास आगरकरांविषयी विरोधकांची अप्रीती सर्वस्वी निराधार आहे हे आपल्या लक्षात येईल.

टिळक-आगरकर यांच्याविषयी विचार करताना आपण हे ध्यानात बाळगले पाहिजे की, एकाच साली (१८५६) जन्मलेल्या या दोघा महापुरुषांपैकी आगरकर फक्त एकोणचाळीस वर्षे जगले, तर सुदैवाने टिळकांना आणखी पंचवीस वर्षे लाभली. टिळकांचे अखिल भारतीय नेतृत्व हे आगरकरांच्या मृत्यूनंतर त्यांना प्राप्त झाले. कोल्हापूरप्रकरणी टिळक प्रथम तुरुंगात गेले ते आगरकरांसह. त्यानंतर पहिला राजद्रोहाचा खटला झाला तो १८९७ मध्ये, म्हणजे आगरकरांच्या मृत्यूनंतर दोन वर्षांनी. यावेळी जर आगरकर हयात असते तर त्यांचे राजकीय विचार टिळकांपेक्षा कमी जहाल झाले असते म्हणण्यास, त्यांचे आपण जे एतद्विषयक विचार पाहिले त्यावरून कसलेही कारण दिसत नाही.

१८८१ ते १८९५ या पंधरा वर्षांत पहिली सात वर्षे या दोघांनी सहकार्याने महाराष्ट्रात एक इतिहासात घडवला. दोघेही स्वयंभू, मनस्वी, प्रखर तत्त्वनिष्ठ व

आपापल्या विचारसरणीबद्दल दृढविश्वास बाळगणारे, परंतु देशोद्धाराचे त्यांचे ध्येय जरी समान असले, तरी त्याविषयीच्या त्यांच्या संकल्पना भिन्न होत्या. त्यामुळे त्यांचे मतैक्य फार काळ टिकणे अशक्य होते. राजकीय स्वातंत्र्याचे महत्त्व दोघांना सारखेच वाटत होते. मतभेद होता तो सामाजिक व धार्मिक सुधारणा कोणत्या करावयाच्या, केव्हा करावयाच्या व कशा करावयाच्या यासंबंधात. टिळकांच्या मते आपली सर्व शक्ती प्रथम स्वातंत्र्यप्राप्तीच्या कामी लावली पाहिजे. सामाजिक व धार्मिक सुधारणांच्या मागे लागल्यास जनतेची मने दुखावतील व आपली शक्ती कमी होईल. त्या सुधारणा स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आपण सहज करू शकू. यावर आगरकर म्हणत की, राजकीय स्वातंत्र्य जाणे म्हणजे शरीरांतील चैतन्यसारतत्त्वच नाहीसे होणे होय, म्हणून राष्ट्रसभादि साधनांच्या द्वारे ते फिरून प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न आम्ही करीतच आहोत. परवशता ही अत्यंत शोच्य आहे हे निर्विवाद आहे. परंतु ती दूर करण्याचे कार्य करीत असताना सांप्रतकाळ सामाजिक सुधारणेस अनुकूल असल्यामुळे आम्ही स्वराज्यप्राप्तीच्या प्रयत्नाबरोबरच आमची सामाजिक व धार्मिक स्थितीही सुधारण्याचा प्रयत्न केला पाहिजे. आज आमचे राज्यकर्ते परके असल्यामुळे आमच्या राष्ट्रातील धार्मिक व सामाजिक दोष ते पाहू शकतात, एवढेच नव्हे तर, सतीच्या चालीसारखी अमानुष चाल लोकांच्या विरोधास न जुमानता त्यांनी कायद्याने बंदही केली आहे. तेव्हा राज्यकर्त्यांच्या या दृष्टीचा फायदा घेऊन राजकीय हक्कांबरोबरच आमचा धार्मिक व सामाजिक सुधारणांची मागणीही आम्ही शक्य तेवढी पुढे रेटली पाहिजे. स्वातंत्र्यप्राप्तीनंतर या सुधारणा कराव्या हे म्हणणे बरोबर नाही; कारण राजकीय स्वातंत्र्य असूनही सामाजिक व धार्मिक गोष्टींत अत्यंत तीव्र दास्यपाशाने सर्वप्रकारे जखडलेले असे अनेक समाज असतात. कारण स्वतंत्र देशांतील जे सरकारी अधिकारी असतात, ते नव्याण्णव वाटांनी जुन्या मतांना चिकटून असतात. तसे नसते तर प्रत्येक स्वतंत्र देशातील प्रसिद्ध आद्य सुधारकांचा इतका छळ का झाला असता? म्हणून इंग्रजांशी लढता लढताच आम्ही स्वत:शीही लढून सर्वांगीण सुधारणा केली पाहिजे. नाही तर मिळालेले स्वराज्य आम्ही टिकवू शकणार नाही, व ते टिकले तरीही त्यात सर्व प्रजेस न्याय व सुख मिळू शकणार नाही. कारण जोपर्यंत जाती-जातींतील श्रेष्ठ-कनिष्ठ भाव, स्त्रीपुरुषांतील विषमता यासारखे दोष कायम राहतील, तोपर्यंत सर्वांना न्याय मिळणे अशक्य आहे. सामाजिक किंवा धार्मिक सुधारणा करण्याची गरज नाही असे टिळकांनी केव्हाही व कोठेही म्हटले नाही हे खरे. परंतु त्यांना आगरकरांइतकी या सुधारणांची निकड वाटत नव्हती. तत्कालीन रूढींतील क्रौर्य तितके त्यांना झोंबत नव्हते, त्यांतील अमानुषता तेवढी असह्य होत नव्हती.

त्यामुळे त्यांनी कधी कायद्याच्या मदतीला हरकत घेऊन, कधी आईबापांना दु:ख होण्याचे निमित्त सांगून, कधी समाजाच्या रोषाची भीती दाखवून, तर कधी आपला धर्म व संस्कृती यांना धक्का पोचण्याची सबब सांगून, या सुधारणांना आडवळणाने सतत विरोधच केला. या संबंधात डॉ. य. दि. फडके यांनी दिलेले उदाहरण अतिशय बोलके आहे. ते म्हणतात, ''संमतिवयाच्या विधयेकामुळे 'आमच्या रूढीस व शास्त्रास धक्का बसतो हाच आमचा मुख्य मुद्दा' असल्याचे टिळकांनी केसरीतही लिहिले आहे.''[१७] डॉ. फडके पुढे लिहितात, 'संमतिवयाचे विधेयक मंजूर झाल्यानंतरही, त्याविरुद्ध सरळ व्हिक्टोरिया राणीकडे दाद मागण्याचाही टिळकांनी घाट घातला होता असे दिसते. त्यासाठी मुंबईला भरविलेल्या सभेत हिंदू पुढाऱ्यांप्रमाणेच मुसलमान मौलवींचीही भाषणे झाली. या निमित्ताने धर्माभिमानी हिंदु-मुसलमानांची संयुक्त आघाडी तयार करण्याचा टिळकांनी प्रयत्न केला.'[१८] स्त्रीला सर्व बाजूंनी दास्यात जखडून ठेवणाऱ्या मुसलमान धर्माशी संमतिवयाच्या विरोधकाला विरोध करताना त्यांनी हातमिळवणी केली, यावरून त्यांचा संस्कृतीचा अभिमान कोणत्या टोकाला जाऊ शकत होता हे दिसून येते. टिळक आगरकरांच्या या प्रकृतिभेदाचे वर्णन आचार्य जावडेकर यांनी पुढीलप्रमाणे केले आहे. 'लो. टिळकांनी. ... आपल्या संस्कृतीच्या अभिमानाच्याच परंपरागत पायावर जहाल राजकारणाचा पाया घातला. आगरकरांच्या जहाल राजकीय विचारांचा पाया केवळ जनतेचे वाढते दारिद्र्य आणि स्वातंत्र्याची, समतेची आणि सत्यनिष्ठेची सार्वत्रिक आकांक्षा हा होता.'[१९] टिळकांच्या या सांस्कृतिक पुनरुज्जीवनाच्या प्रयत्नास जरी तत्काळ मोठे यश मिळाले, तरी त्याचे दूरगामी परिणाम अतिशय घातक झाले असे दिसते. यासंबंधात आचार्य जावडेकरांचे विवेचन विचारार्ह आहे. ते म्हणतात : 'लोकमान्यांनी सांस्कृतिक पुनरुज्जीवनाच्या आधारावर जे राष्ट्रीयत्व निर्माण केले, त्यामुळे त्यांच्या हयातीत महाराष्ट्रातील ब्राह्मणेतर जनतेत फारशी राजकीय जागृती झाली नव्हती व त्यांच्या मृत्यूनंतरच्या परिस्थितीत याच सांस्कृतिक राष्ट्रीयत्वाचा आधार घेऊन त्यांचे अनुयायी म्हणविणारे काही लोक पुढे राष्ट्रसभेला विरोध करू लागले, व आमची विशिष्ट संस्कृती रक्षण होत नसेल तर ते स्वराज्य आम्हास नको, म्हणून परकीय सत्तेशी सहकार्यही करू लागले! यावरून स्वसंस्कृतीचा अभिमान हा नेहमी प्रखर राष्ट्रीय

---

१७. **शोध : बाळगोपाळांचा**, पृ. ६८.

१८. **तत्रैव**, पृ. ७०.

१९. **आधुनिक भारत** (आवृत्ती तिसरी, १९६८), पृ. २२९.

राजकारणास पोषक होईल, असे म्हणता येत नाही!'[२०]

या संबंधात आगरकर म्हणत की, आपल्या धर्मांतील व संस्कृतीतील हितावह भाग घेणे जसे आवश्यक, तसेच अहितकर भाग टाकून देणेही तितकेच आवश्यक आहे. 'भारतीय आर्यत्व न सांडता' प्रगत देशांतील व संस्कृतींतील यशस्वी तत्त्वांचा स्वीकार जर आपण केला नाही, तर देश राजकीय दृष्ट्या स्वतंत्र झाला तरी खऱ्या अर्थाने आपण स्वतंत्र होणार नाही.

धार्मिक व सामाजिक सुधारणांच्या बाबतीत टिळकांचे आणखी असे म्हणणे होते की इंग्रजी शिक्षण मिळालेले बहुतेक सुशिक्षित लोक सामाजिक प्रश्नांविषयी विचार करू लागले आहेत व उत्तरोत्तर त्यांच्या विचारांचा परिणाम त्यांच्या आचरणावर होईलच. व्यापारधंदा, सरकारी नोकऱ्या, आगगाडीचा प्रवास इत्यादि कारणांनी जातिबंध आपल्या आपण शिथिल होऊ लागले आहेत, ते वाईट आहेत असे म्हणून एकमेकांस दुखविण्याची गरज नाही. शास्त्रज्ञानाच्या प्रसाराबरोबर धर्मसंबंधी वेडेपणाच्या समजुती लयास जातील. सबब त्यावरच टीका करण्याची गरज नाही. यावर आगरकर म्हणत की, प्रवाहपतित होऊन केलेले वर्तनांतर कधीही फलदायी होणे शक्य नाही.

या दोन मतांपैकी कोणाचे मत अचूक ठरले हे पाहण्यापूर्वी, प्रथम आगरकरांच्या कार्याबद्दल जो दुसरा एक गैरसमज आहे तो लक्षात घ्यावा लागेल. यासंबंधी बहुतेकांचे मत असे आहे की बालविवाह, केशवपन, पुनर्विवाह आदि ज्या सुधारणांसाठी आगरकर झगडले, त्या सर्व आता झाल्या असल्यामुळे आज आगरकर संपले आहेत. परंतु हा समज निखालस चुकीचा आहे. आगरकरांना अभिप्रेत असलेल्या सुधारणांचा आवाका केवढा प्रचंड होता हे आपण वर पाहिलेच आहे. त्यांच्या जवळपासही आपण अजून गेलो नाही. ज्या काही सुधारणा झालेल्या आज आपणास दिसत आहेत त्यांचा समाजाला अपेक्षित इष्ट लाभ झालेला नाही, कारण आगरकरांच्या पद्धतीप्रमाणे आपण त्या केल्या नाहीत. बालविवाहाचेच उदाहरण घ्या. आगरकरांनी स्पष्ट सांगितले होते की 'बालविवाहाचे खंडन म्हणजे स्वयंवराचे मंडन. ...जी स्वयंवरे नाहीत त्या सर्वांस आम्ही बालविवाहच समजतो! ज्याचे त्याने लग्न करणे म्हणजे स्वयंवर! एकाचे दुसऱ्याने करणे म्हणजे बालविवाह!' (२८४) हीच दृष्टी स्त्रीविषयक सर्व सुधारणांच्या बाबतीत बाळगण्यास त्यांनी सांगितले होते. उदा. स्त्रीला शिक्षण द्यावयाचे ते स्त्री-पुरुष समानतेच्या तत्त्वाचा अंगीकार करून द्यावयाचे. स्त्री हा समाजाचा एक स्वतंत्र

---

२०. तत्रैव, पृ. २३०.

घटक आहे हे लक्षात घेऊन तिच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास करण्याकरता तिला शिकवले पाहिजे असे त्यांचे म्हणणे होते. परंतु आम्ही ह्या सुधारणा केल्या, त्या सुशिक्षित वराकडून प्रौढ व शिक्षित वधूची मागणी होऊ लागली म्हणून केल्या. म्हणजे पुरुषाचे साधन म्हणूनच स्त्रीकडे पाहिले गेले. त्यामुळे आज जरी स्त्रियांना पुरुषांच्या बरोबरीने शिक्षण दिले जात आहे व त्यांना सर्व व्यवसायांत प्रवेश मिळत आहे, तरी त्यांचे समाजातील स्थान फारसे बदलले नाही. वरसंशोधन, हुंडा, मानपान इत्यादि स्त्रीचे दुय्यम स्थान दर्शविणाऱ्या रूढी अजूनही कायम आहेत. एवढेच नव्हे तर त्या वाढत आहेत. अर्थार्जन करणाऱ्या स्त्रीला स्वत:च्या पैशाचा आपल्या इच्छेनुसार विनियोग करण्याचे स्वातंत्र्य असल्याचे दिसत नाही. सासरच्या छळापायी स्त्रियांनी स्वत:स जाळून घेतल्याच्या किंवा त्यांना जाळल्याच्या बातम्या आपण प्रत्यक्ष वाचतो. तेव्हा स्त्रियांची स्थिती पूर्वीइतकीच दुर्धर आहे असे म्हणावे लागते. आगरकरांच्या म्हणण्याप्रमाणे व्यक्तिस्वातंत्र्याच्या तत्त्वास अनुसरून जर आम्ही हेतुपुरस्सर ह्या सुधारणा केल्या असल्या, तर त्यायोगे स्त्रीचे मन स्वतंत्र झाले असते, तिला स्वतंत्र व्यक्तिमत्त्व लाभले असते व त्यामुळे स्वतंत्रपणे जगण्यास आवश्यक असे सामर्थ्य व धैर्य तिच्या अंगी आले असते. परंतु या सुधारणा काळाच्या ओघात आपोआप झाल्या व परिस्थितिशरण होऊन आम्ही त्या स्वीकारल्या, म्हणून शंभर वर्षानंतरही आज स्त्रीची दुरवस्था कायम आहे. जातिभेदनिर्मूलनाच्या बाबतीतही हीच परिस्थिती आहे. जातिभेदातील अन्याय व अनिष्टता लक्षात घेऊन आपण ही सुधारणा केली नाही, तर टिळकांच्या अपेक्षेप्रमाणे व्यापार, प्रवास व नोकरीच्या निमित्ताने विविध जातींशी संपर्क आल्यामुळे जातिभेदाची बंधने आपोआप शिथिल झाली. पण त्यामुळेच आज संधी मिळेल तेथे प्रत्येक जात आपापला सवता सुभा निर्माण करून आपले स्वतंत्र बळ वाढवीत आहे व त्यामुळे राष्ट्राच्या ऐक्यास धोका निर्माण स्वतंत्र अस्पृश्यतानिर्मूलनाच्या बाबतीत तर मोठे अपयश आले आहे. मीनाक्षीपुरमचा राष्ट्राला हादरा देणारा धर्मांतराचा प्रसंग; त्या अपयशाचा ज्वलंत पुरावा आहे. याबाबतीत आगरकरांनी इशारा देऊन ठेवला होता हे आपण पाहिलेच आहे. त्यांनी अतिशय तळमळीने सांगितले होते की, अस्पृश्यतेच्या रूढीतील विलक्षण अविचार, अन्याय, क्रौर्य, अमानुषता ही सर्वथैव असमर्थनीय असल्यामुळे आपण तिचा समजून उमजून व मनापासून त्याग केला पाहिजे. पण आपण तसे न केल्यामुळे आज अस्पृश्यतेची मगरमिठी आपल्या मनावर पूर्वीइतकीच पक्की बसलेली आहे. सारांश, आगरकरांना अभिप्रेत असलेल्या फार थोड्या सुधारणा झाल्या आहेत, व त्याही अगदी वरवरच्या स्वरूपात झाल्या आहेत. त्यामुळे

आगरकरांचे कार्य इतिहासजमा झाले आहे हे म्हणणे आत्मवंचक व दिशाभूल करणारे आहे. आपण आजही आगरकरांच्या विचारांच्या शंभर वर्षे मागे आहोत. यासंबंधी टिळक-आगरकरांच्या कार्याचा अतिशय बारकाईने व तटस्थपणे शोध घेणारे डॉ. य. दि. फडके यांचे पुढील विधान चिंत्य आहे. ते म्हणतात, 'पूर्वगौरवावर आधारलेली राष्ट्रीय अस्मिता चेतवून स्वराज्यप्राप्तीसाठी जनआंदोलन संघटित करण्यात टिळकांनी आपले उभे आयुष्य वेचले, पण स्वराज्य मिळाल्यानंतर येणाऱ्या काळाचा वेध घ्यावा असे भूतकाळात रमणाऱ्या टिळकांना कधीच वाटलेले दिसत नाही. याउलट टिळकांसारखेच पक्के स्वराज्यवादी असलेले आगरकर मात्र या भविष्याची नुसती चाहूल लागूनही बेचैन झालेले दिसतात. म्हणूनच स्वराज्यप्राप्तीबरोबर टिळकांच्या ऐतिहासिक कार्याची सांगता झाली असे म्हणता येते, पण जातीजातींमधील स्त्रीपुरुषांमधील विषमता जोपर्यंत कायम आहे तोपर्यंत आगरकरांचा विचार इतिहासजमा झाला असे म्हणता येणार नाही.' [२१]

आगरकरांवर घेतला जाणारा दुसरा आक्षेप म्हणजे त्यांनी पुरस्कारलेले तत्त्वज्ञान भारतीय नव्हते; हा. त्यांनी ते पाश्चात्यांकडून उसने घेतले होते. याबद्दल त्यांना अनेक भारतीयांनी दोष दिला आहे, आणि त्यांची परभृत आणि परप्रत्ययनेय अशी संभावना केली आहे. परंतु हा आक्षेप वस्तुतः अगदी विपर्यस्त आहे. या आक्षेपानुसार आपण आपल्या पूर्वजांचे विचार जसेच्या तसे स्वीकारले, त्यांची कसलीही चिकित्सा केली नाही, तरी ते दूषणास्पद नाही, उलट ते भूषणावह आहे, स्वाभिमानाचे व देशाभिमानाचे द्योतक आहे. पण परकीयांचे विचार कितीही चांगले असले तरी ते स्वीकारणे दूषणास्पद आहे. यांत असे गृहीत धरले आहे की विचारांच्या क्षेत्रात ते सयुक्तिक आहेत की अयुक्तिक आहेत, समंजस आहेत की असमजंस आहेत, हा प्रश्न अगदी गौण आहे. महत्त्वाचा प्रश्न आहे तो ते विचार कोठे उत्पन्न झाले हा. आणि म्हणून टिळकांनी गीतारहस्यात आपल्या पूर्वजांच्या विचारांचा अनुवाद केला, त्यांचेच मंडन केले, म्हणून ते अनुकरणकार, परभृत ठरत नाहीत. परंतु आगरकरांनी पाश्चात्यांच्या विचारांचा स्वीकार केला म्हणून ते देशाभिमानशून्य आणि अनुकरणकार ठरतात. पण शांतपणे विचार केल्यास हे मत क्षणभरही टिकणे शक्य नाही. कारण कोणत्याही विचाराचा स्वीकार किंवा त्याग करावयाचा तो; तो विचार बरोबर आहे किंवा नाही, त्याच्या बाजूने पुरेशी प्रमाणे आहेत की नाहीत, या कसोटीने ठरविला पाहिजे. एखादा विचार

---

२१. **शोध : बाळ-गोपाळांचा**, पृ. ७९.

केवळ आपला आहे म्हणून तो आपण स्वीकारला पाहिजे हा आग्रह अगदी असंमजसपणाचा आहे हे कोणासही कबूल करावे लागेल. तेव्हा कोणत्याही विचाराचा पुरस्कार करताना तो कोठे निर्माण झाला याचा विचार करणे गौण आहे. त्याची साधक बाधक प्रमाणे पाहून, तो जर खरा किंवा युक्त असण्याचा संभव असेल, तरच तो स्वीकारला पाहिजे. आगरकरांनी असेच केले होते.

आगरकर स्वतंत्र तत्त्वज्ञ नव्हते हे एका अर्थी खरे आहे. आपले विचार त्यांनी कौंत (Comte), मिल आणि स्पेन्सर यांच्या तत्त्वज्ञानातून काही प्रमाणात उचलले हेही खरे आहे. पण स्वकीयांची थोरवी गाण्याच्या हजारो वर्षांच्या रूढीने त्यांच्या काळातील बहुतेक विचारवंत बद्ध असताना, त्यांनी स्वकीयांच्या विरोधास न जुमानता परकीयांचे विचार स्वीकारले; यात त्यांची स्वतंत्र व निर्भय वृत्तीच दिसून येते. त्यातही परकीयांच्या विचारांपैकी कोणते विचार त्यांनी स्वीकारले हेही त्यांच्या बुद्धिमत्तेचे आणि स्वतंत्र प्रज्ञेचे द्योतक आहे. त्यावेळी इंग्लंडमध्ये फक्त मिल, स्पेन्सर यांचेच तत्त्वज्ञान प्रचलित होते असे नव्हे, धार्मिक तत्त्वज्ञानही बरेच होते. हेगेलच्या तत्त्वज्ञानाचाही मोठा बोलबाला होता. पण आगरकरांनी नेमके विवेकवादी, लोकशाहीवादी, व्यक्तिस्वातंत्र्यवादी असेच तत्त्वज्ञान उचलले व त्याला आपल्या देशाच्या परिस्थितीला अनुरूप असे वळण दिले. यावरून त्यांची स्वतंत्र विचार करण्याची वृत्तीच सिद्ध होते. वास्तविक टिळकांनीही लोकशाहीवादी राजकीय तत्त्वज्ञान पाश्चात्यांकडूनच घेतले. तसेच महात्मा गांधींनाही सत्याग्रहाचे तत्त्वज्ञान टॉलस्टॉय, रस्किन आणि थोरो यांच्या तत्त्वज्ञानांतून स्फुरले. पण या दोघांना कोणी अनुकरणकार किंवा परभृत म्हणत नाही. आता हे खरे आहे की टिळक आणि गांधीजी आपल्याला रामायण, महाभारत आणि गीता यांतून स्फूर्ति मिळाली असे सांगतात, आणि आगरकर मात्र कोणत्याही भारतीय विचारवंताला आपल्या विचारांचे मूळ मानीत नव्हते. पण हा स्वभावधर्माचाही परिणाम आहेच. टिळक आणि गांधीजी अतिशय धार्मिक वृत्तीचे होते, तर आगरकर प्रथमपासूनच धार्मिक प्रभावापासून पूर्णपणे मुक्त होते!

आगरकरांवर केला जाणारा आणखी एक गंभीर आरोप म्हणजे ते धर्मबुडवे, भारतीयत्वाविषयी कसलाही अभिमान नसलेले, भारतीय संस्कृतीचे द्वेष्टे, आंग्लाळलेले व स्वजनद्रोही होते. या आरोपात आक्षेपकांचे आगरकरांचे जीवन व त्यांचे कार्य याबद्दलचे गाढ अज्ञानच दिसून येते. भारताच्या उन्नतीसाठीच तर त्यांनी आपले उभे आयुष्य वेचले आणि लोकांच्या छळाला किंवा रोषाला न

भिता विवेकी जीवनाचे माहात्म्य त्यांना पटविण्याचा अविरत प्रयत्न केला. त्यांनी हिंदुधर्मातील असंख्य दोषस्थळे निर्भीडपणे आणि कठोरपणे दाखविल्यामुळे हिंदुधर्माचे त्यांना काही सोयरसुतक नव्हते असा अनेकांचा समज झाला. परंतु बाह्यत: विध्वंसक दिसणारे हे कार्य, वस्तुत: विधायक स्वरूपाचे-हिंदुधर्मातील दोषस्थळे दूर करून त्याला शुद्ध स्वरूप देण्याचे-होते हे लक्षात घेणे जरूर आहे. आपल्या धर्मांच्या आणि संस्कृतीच्या अत्यंत अन्याय्य, क्रूर आणि अमानुष आज्ञांचे लोकांकडून शतकानुशतके निमूटपणे होत असलेले पालन पाहून आगरकर कमालीचे अस्वस्थ होत. धर्मपाशांनी चोहोकडून पूर्ण जखडले गेल्यामुळे हीनदीन जिणे जगणाऱ्या आपल्या लोकांची त्यांना विलक्षण चिंता वाटे. आपली बुद्धी गहाण टाकल्यामुळे त्यांना ही दशा आली आहे असे त्यांना ते समजावीत, त्यासाठी त्या धर्माज्ञांतील विसंगती, अन्याय, असमंजसपणा स्पष्ट करून दाखवीत आणि धर्माच्या आज्ञा कोठवर पाळाव्यात याचा आम्ही विचार केला पाहिजे, असे त्यांना शिकवित. ते म्हणत, 'हिंदुधर्मविचारांत आणि सामाजिक आचारांत जेवढे काही खरोखर निर्दोष आणि हितावह आहे त्याला कशाचीही भीती नाही.' (१२८) पण जे काही सदोष व अहितकारक आहे त्याचा आपण निर्धाराने त्याग केला पाहिजे, आणि त्याच्या जागी पाश्चात्य संस्कृतीतील हितकर मूल्यांचा स्वीकार करण्यास तयार असले पाहिजे. नाहीतर जीवनकलहात आमचा निभाव लागणे अशक्य आहे. जर आपण नवीन गोष्टींचे चिंतन आणि चर्चा करणार नाही तर रूढ विचारातले प्रमाद दूर होणार कसे?

हे प्रमाद दूर करण्यासाठीच त्यांनी आपल्या धर्मातील दोषस्थळांवर प्रखर हल्ले केले. या हल्ल्यांमुळे धर्मग्लानी येण्याचे भय आहे असे म्हणणाऱ्यांविषयी ते लिहितात, 'यांच्या धर्मग्लानीच्या बऱ्याच भागास आम्ही धर्मग्लानी न समजता धर्मोत्कर्ष समजतो! मूर्तिपूजा अजीबात नाहीशी होणे, यज्ञयागाचे थोतांड क्रमाक्रमाने शिथिल होत जाणे, वर्णसंकर होऊन पाहिजे त्याला पाहिजे त्याशी अन्नोदकव्यवहार करण्याची किंवा लग्न लावण्याची सदर परवानगी असणे, पाहिजे त्याने पाहिजे त्या शास्त्रांचा किंवा धर्मग्रंथांचा अभ्यास करणे, स्त्री-पुरुषांनी हव्या त्या वयापर्यंत किंवा मुळीच अविवाहित राहणे. स्त्रियांस हवी ती विद्या संपादू देणे किंवा हवा तो धंदा करू देणे, ज्याचे त्याने आपल्या तब्येतीप्रमाणे लग्न करणे, अशौचादि कोणत्या प्रकारच्या कारणाने कोणासही कुरूपता न येणे, और्ध्वदैहिकादि गलिच्छ व अमंगल संस्कार बंद पडणे- वगैरे गोष्टी प्रचारात आल्यास कोणत्याही प्रकारची धर्मग्लानी होणार आहे असे आम्हांस वाटत नाही. अशा प्रकारच्या आचारांनी हिताहून अहितच अधिकच होत आहे, असा

आमचा समज आहे.'[२२]

वस्तुत: आगरकर निधर्मी म्हणजे कोणताही धर्म न मानणारे होते. असे असताना ते हिंदु धर्माचा कैवार घेत ही गोष्ट सकृद्दर्शनी विसंगत दिसते. परंतु एका व्यापक-निधर्मी-अर्थाने आगरकर हिंदूच होते असे म्हणणे योग्य होईल. ज्या समाजात ते जन्मले आणि वाढले तो समाज हिंदू होता, त्यामुळे त्यांनी अनायासे आत्मसात केलेला जीवनप्रकारही हिंदूच होता. त्या जीवनप्रकारांत त्यांना अनेक दोषस्थळे दिसली, व ती त्यांनी आपल्या स्वत:च्या जीवनातून काढून टाकली, तरी त्यांचा बाकीचा एकूण व्यवहार-पोषाख; आहार, सण इत्यादि-हिंदूंचाच होता. शिवाय ते ज्या समाजात वाढले त्यातील लोकांविषयी त्यांना अतिशय आत्मीयता वाटत होती, आणि त्यांच्या कल्याणाकरिताच ते सतत झटत होते. म्हणून इतर धर्मीयांनी हिंदू धर्माला नावे ठेवली, त्यावर हल्ला केला किंवा हिंदूचे धर्मांतर करण्याचा प्रयत्न केला तर ते त्यांच्यावर तुटून पडत, व त्यांना बजावीत की तुमच्या धर्मात आमच्या धर्माहून काही कमी दोष नाहीत, उलट जास्तच आहेत.

हिंदुधर्माच्या श्रेष्ठत्वाबद्दल त्यांना वाटणारा अभिमान आणि हिंदुधर्मरक्षणाची त्यांनी दिलेली हाक, हिंदु-मुसलमानांवरील त्यांच्या लेखांत स्पष्टपणे प्रगट झाली असल्याचे आपण वर पाहिलेच आहे. अस्पृश्यांच्या धर्मांतराने त्यांना वाटणारी चिंताही त्यांच्या धर्मरक्षणाच्या तळीमळीची द्योतक आहे. आपल्या धर्माची व संस्कृतीची प्राचीनता आणि त्यांनी केलेली प्रगती दाखविण्याकरिता त्यांनी 'भारतीय कलांचे पुराणत्व' ही दीर्घ लेखमाला लिहिली. तिच्यात ते म्हणतात, 'महंमदीय लढवय्यांप्रमाणे धर्मवेडाने युरोप व आशिया खंडांतील मोठमोठे देश आम्ही उध्वस्त केले नाहीत, व राज्यलोभाने लाखो लोकांचा प्राणसंहार करून आपली रुधिरभक्ति, क्रूरनिष्ठुरता जगाच्या इतिहासात अमर केली नाही ही गोष्ट खरी आहे. पण नीति, औदार्य, अनुकंपा, आप्तमित्रांचा परामर्ष वगैरे मानसिक गुणांचा; किंवा काव्य, चित्र, गान, वादन इत्यादि ललितकलांचा; अथवा दुर्गरचना, गृहरचना, मूर्तिघटना, पाषानखनन इत्यादि शिल्पकलांचा येथे अभ्युदय होऊन त्यांची इतकी अभिवृद्धी झाली होती की त्यासंबंधाने आजमितीस सुद्धा आम्हांस कोणापुढेही खाली पाहण्याची अवश्यकता नाही.' (३२३)

पण त्याचबरोबर एवढा उज्ज्वल वारसा लाभलेले आम्ही गेली दोन हजार वर्षे गतानुगतिक झाल्यामुळे आज आमची झालेली दुर्दशाही त्यांना पाहावत नव्हती. 'आमचे दोष आम्हास कधी दिसू लागलीत?' अशी त्यांना तळमळ

---

२२. 'बंधने कोण व कोणती घालणार?'

लागून राहिली होती. पण त्याचा फायदा घेऊन जर परकीय लोक आमच्यावर भलतेसलते आरोप करू लागले तर ते त्यांचा खरपूस समाचार घेत. मि. ॲशबर्नर नावाच्या एका इंग्रजाने आमच्या हतभाग्य हिंदू विधवांवर त्या 'सनदी स्वेच्छाचारिणी' आहेत असा असभ्य, खोडसाळ व असत्यप्रचुर आरोप केला तेव्हा आगरकरांनी त्याला सुनावले की, 'ज्या देशात पतिव्रतापदप्राप्त्यर्थ लक्षावधि तरुण स्त्रियांनी पति-चितेवर आपणांस जिवंत जाळून घेण्याचे लोकोत्तर धैर्य दाखविले, ... त्या देशातील स्त्रियांस 'chartered libertines' (सनदी स्वेच्छाचारिणी) हा किताब देणाराने आपण काय म्हणतो याचा त्रिवार विचार करावयास पाहिजे होता!' कर्नल मन्रो या त्यांच्याच एका विद्वानाने हिंदु स्त्रियांना दिलेले पुढील प्रशस्तिपत्र उद्धृत करून ते त्यांना नामोहरम करतात : 'कोणत्याही देशातील स्त्रियांस, व इंग्लंडच्याही स्त्रियांस, त्यांचे वर्तन ब्राह्मणी किंवा वरिष्ठ हिंदू स्त्रियांहून कमी शुद्ध नाही, असा दाखला मिळणे म्हणजे आपली मोठी वाखाणणी झाली, असे मानण्यास हरकत नाही.' (४०१) तसेच कॅ. ऑगस्टस वुइलर्ड या लष्करी अधिकाऱ्याने आमच्या संगीताच्या चिजांवरून आमच्या स्त्रियांच्या नीतिमत्तेबद्दल अकलेचे तारे तोडले, तेव्हा 'आणखी एक शहाण्याचा कांदा' अशी त्यांची संभावना करून आगरकरांनी त्याला ठणकावले की, 'कोणत्याही देशातील लोकांनी दुसऱ्या देशांतील लोकांस व्यभिचारी ठरविण्याचे धाडस करू नये, म्हणून आम्ही इंग्लिश लोकांच्या व्यभिचाराविषयी काही एक म्हणत नाही; तथापि जर ते आपण होऊन तो दोष आमच्या स्त्रियांवर आणू लागतील, तर तुमच्या मडमांनी आमच्या स्त्रियांचे तीर्थ घेऊन त्या पापापासून मुक्त व्हावे, इतक्या त्या पवित्र आहेत, असे म्हणण्यास आम्ही कधीही सोडणार नाही! हिंदुस्थानातील स्त्रियांच्या पातिव्रत्याइतके शुद्ध पातिव्रत्य बहुधा दुसऱ्या कोणत्याही देशात सापडणार नाही.' (४०६-७)

आगरकरांवर स्वजनद्रोहाचा केला जाणारा आरोप तर फारच असजंसम व विपर्यस्त आहे. त्यांचा सारा आटापिटा केवळ स्वजनहितासाठीच होता. म्हणून तर त्यांनी साऱ्यांच्या तीव्र विरोधाचे हलाहल पचवले. आता हे खरे आहे की अतिशय वेडगळ व क्रूर आचारविचारांचे मंडन करणाऱ्यांवर ते तुटून पडत. कारण या आचारविचारांतील दोषांकडे डोळेझाक करणे त्यांना आत्मघातकीपणाचे वाटत होते. परंतु सामान्य लोकांना त्यांनी कधीही दोष दिला नाही. ते म्हणत की त्यांच्याकडून या गोष्टी अज्ञानाने होत आहेत. म्हणून त्यांच्यावर रागावणे बरोबर नाही. तसेच वृद्धांनाही त्यांनी कधी दोष दिला नाही. उलट त्यांच्या स्थितिप्रियतेचीही समाजाला आवश्यकता आहे हे सांगताना ते म्हणतात की, वृद्ध,

तस्मात् सुशिक्षित बांधवहो, तुम्हांस अशी प्रार्थना आहे की, वर जें म्हटलें आहे तें तुम्हास मान्य असेल तर तुम्हीं कालावर व वस्तुस्थितीवर अवलंबणें पुरे करून, ज्या सुधारणा तुम्हांस अत्यंत अवश्यक अशा वाटत आहेत त्या करण्याविषयीं बुद्धिपूर्वक प्रयत्न करण्यास लागलें पाहिजे. त्या आवश्यक सुधारणांपैकी कांही अशा आहेत की त्या वृद्ध लोकांच्या हातून होण्याचा संभव नाही इतकेंच नाहीं, तर त्यांपैकी पुष्कळांस त्यांची संमतीही मिळण्याची आशा नाहीं. उदाहरणार्थ पुनर्विवाह व ऋतूत्तर कन्याप्रदान. तसेंच, कित्येक तरुण सुशिक्षितांस या दोन गोष्टी व अशाच प्रकारच्या इतर गोष्टी कितीही चांगल्या वाटूं लागल्या असल्या, व त्यांची आवश्यकता भासूं लागली असली, तरी त्या करण्यास प्रवृत्त होण्यास त्यांची छाती होणार नाहीं. केवळ सगळेच असे असतील असें आमचें म्हणणें नाहीं. एखाद्याचें धैर्य, निश्चय, व कार्यनिष्ठा असामान्य असल्यास, तो लोकमताची किंवा अगदी जवळच्या आप्तांचीही पर्वा न करतां, आपल्या मनास जी गोष्ट प्रशस्त वाटली ती करण्यास प्रवृत्त होईल. पण असे लोक फार विरळ असतात. अशांची संख्या वाढेल तितकी वाढणें इष्ट आहे, आणि तिच्या कमीअधिक वाढीवर समाजाची सुधारणा शीघ्र होणें किंवा न होणें हें अवलंबून आहे. तथापि सध्याचे जग सामान्य विचाराच्या, सामान्य धैर्याच्या, व सामान्य समजुतीच्या लोकांचे झालेलें आहे. वृद्धतरुणांच्या आचारविचारांत कालमानानें व शिक्षणभेदाने थोडाबहुत फरक होतो, पण त्यामुळें त्यांत जमीनअस्मानाचें अंतर पडतें असें नाहीं, व असें होणें इष्टही नाहीं; कारण असें होऊं लागेल तर कोणत्याही घरी कोणासही सुखाचा लवलेश मिळेनासा होऊन साऱ्या समाजांत अहोरात्र चलबिचल माजून राहील, कोणाचा धाक कोणावर चालणार नाहीं, व सगळ्याच प्रकारच्या सुधारणास प्रचंड व्यत्यय येईल. सुधारणा करण्याची इच्छा जशी तरुणांस असते तशी वृद्धांस असत नाहीं. समाजाच्या असलेल्या स्थितींचे संरक्षण करण्याविषयी वृद्ध लोक अत्यंत उत्कंठ असतात. त्याचें पाऊल पुढें पडावें, अशी तरुणांस आकांक्षा असते. हे समाजनौकेचे भरताड होत; तरुण शिडें होत! पहिल्याशिवाय समाजांत स्थिरता राहणार नाहीं; दुसऱ्याशिवाय त्याला गति येणार नाही ! तेव्हां ज्यांच्या मनांत समाजाचें कल्याण व्हावें असें असेल, ते या दोहोंचे फारकत व्हावें असें कधींही चिंतणार नाहींत. दोहोंचाही उपयोग आहे; व दोघांनाही आपापला कार्यभाग उरकण्याची मोकळीक पाहिजे. प्रत्येक गोष्टींत बाबानें बेट्याला आपलें वळण गिरविण्यास लावणें हें जसें वाईट, तसें आपली प्रत्येक गोष्ट बाबा ऐकून घेत नाहींत म्हणून बेट्याला त्याचा विषाद येणें हेंही वाईट. दोघांच्या संमतीनें जेवढें चालेल तेवढें हवेच आहे; पण ज्या गोष्टीत दोघांचे ऐक्य होण्याचा संभव

नसेल त्या ज्याच्या त्यास आपल्या मनाप्रमाणें करावयास सांपडल्या तरच घरांत व बाहेर शांतता आणि समाधान राहण्याचा संभव आहे. आज ज्यांचे अर्धे अधिक वय होऊन गेलें आहे; वागण्याची पूर्व पद्धत ज्यांच्या अंगी खिळून जाऊन स्वभावतुल्य झाली आहे; अनेक वर्षांच्या विश्वासामुळें व तदनुसार आचरणामुळें ज्यांच्या धर्मविषयक व नीतिविषयक कल्पना वज्रलेप झाल्या आहेत; जुनाट झालेल्या झाडाप्रमाणें ज्यांची मनें किंवा शरीरें वळण्याची आशा उरली नाहीं; अशांनीं आम्ही ज्या गोष्टी पुढे सांगणार आहों, त्यात पडावें, अशी आमची इच्छा नाहीं, व तुम्ही त्यांत पडा, असें आम्ही त्यांस म्हणणारही नाही. जे आज अपत्यवंत आहेत, ते आपल्या अपत्यांची व्यवस्था कशीही लावोत; त्याबद्दल आम्ही कुरकुर करणार नाहीं. पण ज्यांच्यावर अद्यापि संसाराचा भार पडलेला नाहीं; ज्यांच्याकडे पितृत्वाचा अधिकार अद्यापि आलेला नाहीं; नवीन ज्ञान संपादण्याचें व विचार कायम करण्याचें ज्याचें वय अद्यापि गेलें नाहीं; ज्यांच्या ईर्षेला पराभव ठाऊक नाहीं; ज्यांची हिंमत कशानेंही खचलेली नाहीं; जगाच्या दु:खमय अनुभवामुळें ज्यांच्या अंत:करणांत अनौदार्य, संशय, परदु:खपराङ्मुखता आणि परहितौदासीन्य यांचा प्रादुर्भाव झाला नाहीं — अशा विद्यालयीन व इतरस्थ तरुण सुशिक्षितांनीं आम्ही जी कल्पना सुचवीत आहों तिचा विचार करून तो अमलात आणण्याविषयी मंडळी स्थापावी, अशी आमची त्यांस प्रार्थना आहे.

आम्हांमधील बालविवाहाची चाल इतर सर्व वाईट चालीपेक्षा आम्हांस विशेष विघातक होत आहे, हें अलीकडे सर्व समंजस लोकांस कबूल झालें असून, ती बंद व्हावी अशी इच्छा बरीच पसरली आहे, असे म्हणण्यास हरकत नाहीं; पण ती बंद करण्याचा उपाय मात्र आमच्याकडून झाला नाही; व जोपर्यंत तो करण्याचें काम अनपत्यवान तरुण सुशिक्षित लोक आपल्या अंगावर घेणार नाहीत तोपर्यंत त्याची योजना मनापासून कोणीही करणार नाहीं, असे आम्हांस वाटते. ही गोष्ट तरुणांनी मनावर घेतली असतां आजपासून पंचवीस वर्षांच्या आंत हा रोग येथे कधीं होता किंवा नव्हता, अशा रीतीने त्याची त्यांस वाट लाविता येईल! तेव्हां असा हा रामबाण असावा तरी काय हे जाणण्याची वाचकांस मोठी उत्कंठा झाली असेल यांत संशय नाही; पण स्थलसंकोचामुळे ती आज पुरविता येत नाहीं हें पाहून फार दिलगिरी वाटते; तथापि, ज्यांनी इतके दिवस दम काढला त्यांना आणखी आठ दिवस तो सहज काढता येईल, असे समजून फार खेद न करतां सध्या रजा घेतों!

तरुण सुशिक्षितांनी जो विषय आपल्या हातीं घ्यावा म्हणून आज आम्ही प्रत्यक्षपणें सुचविणार आहों, त्याची गेल्या दोन लेखांत जितकी प्रस्तावना

करावयाला पाहिजे होती तितकी केली आहे. आज आम्हांस ज्या सुधारणा करणें अवश्य आहे, त्यांपैकी बहुतेक जुन्या पिढीच्या लोकांकडून होण्यासारख्या कां नाहींत याचें दिग्दर्शन मागे केलें आहे; तें वाचकांच्या स्मरणांत असेलच. या घटकेस हिंदुस्थानांत नव्या व जुन्या कल्पनांचा ज्या प्रकारचा झगडा सुरू आहे तशा प्रकारचा झगडा येथें पूर्वी कधीही झाला नसेल. आजपर्यंत हिंदुस्थानावर ज्यांनी स्वाऱ्या केल्या, किंवा येथें आपली राज्यें स्थापिली त्यांच्या आणि आम्हां एतद्देशीय हिंदूंच्या राजकीय आणि सामाजिक विचारांत विशेष अंतर नसल्यामुळें हिंदूंनीं आपल्या जिंकणारांपासून अवश्य शिकले पाहिजे असें विशेष कांही नव्हतें. किंबहुना हिंदू लोकांपाशीच आपल्या परकी राज्यकर्त्यांस शिकविण्यासारख्या कांही गोष्टी होत्या. यामुळें आजपर्यंत ज्यांनी हिंदुस्थानास जिंकून त्यांत आपली सत्ता स्थापिली, त्यांनी हिंदूंचा शारीरिक किंवा बाह्य पराभव केला इतकेच म्हटलें पाहिजे. पण इंग्रजांनी आम्हांवर जें राज्य स्थापिलें आहे त्याची अगदी निराळी गोष्ट आहे. या राज्यामुळे आमच्या स्थितींत पराकाष्ठेंचा बदल होत आहे. प्रथम प्रथम या स्थित्यंतराचें स्वरूप आमच्या लक्षात बरोबर आलें नाहीं. पण अलीकडे पाचपंचवीस वर्षांत पाश्चिमात्य शिक्षणाचा प्रसार झाल्यापासून जेवढे म्हणून त्याच्या पाशांत सांपडले आहेत, त्यांची स्थिति विलक्षण होऊन गेली आहे; व उत्तरोत्तर या शिक्षणाचा परिणाम बहुतेकांवर होणार हें स्पष्ट दिसत आहे. पुष्कळांचे असें म्हणणें आहे कीं, पाश्चिमात्य शिक्षण फार थोड्यांस प्राप्त झालें असल्यामुळें, त्यानें हिंदू लोकांच्या स्थितीत विशेष फेरफार झाला आहे, असें म्हणतां येणार नाहीं. पण आमच्या मतें असें समजणारांची चूक आहे. केवळ शाळांच्या द्वारें पाश्चिमात्य विचारांचा प्रसार होऊन त्यामुळें आमचें जें स्थित्यंतर होत आहे तेवढ्याचाच विचार केला तर तें विशेष विस्तृत नाहीं, हें कबूल करावें लागेल. पण शाळांशिवाय ज्या दुसऱ्या अनेक द्वारांनी हिंदू समाजांतील प्रत्येक वर्गातल्या लोकांवर परिणाम घडत आहेत त्यांचा नीट विचार केला तर असें दिसून येईल कीं, ज्याच्या आचारांत व विचारात पाश्चिमात्य कल्पनांनी थोडाबहुत तरी फेरफार झाला नाहीं, असा एक वर्गही नाहीं, शाळाखात्याशिवाय इतर खात्यांचा संबंध प्रत्येक दिवशीं प्रत्येक वर्गांतील वयांत आलेल्या मनुष्यांशी येऊन पोंचत आहे, व तदनुषंगानें त्यांस आपल्या वागणुकींत प्रतिदिवशीं कमी अधिक फेरफार करावा लागत आहे. मोजणीखाते, जमीनजमाबंदीखातें, न्यायखातें, पब्लिक वर्क्सखातें, वैद्यकखातें, लष्करी खातें, स्यानिटरी खातें, अबकारी खातें, इत्यादिकांनी आमच्या इकडील शेतकऱ्यांवर, कारागिरांवर, व्यापाऱ्यांवर, सावकारांवर, वाण्याउमद्यांवर, व सामान्य मजुरांवर केवढे परिणाम घडत आहेत. या खात्यांशी लोकांचा जो

व्यवहार होतो तो सरकारानें घालून दिलेल्या नियमांप्रमाणेंच व्हावा लागतो. त्यामुळें त्या नियमांचें वळण त्यास नकळत लागत चाललें आहे; व तें नकळत लागत आहे म्हणून मुळींच लागत नाहीं असें म्हणणें बरोबर नाहीं. याशिवाय तारायंत्र, आगगाडी, पोष्टखातें, सेव्हिंग्स ब्यांक्स, पोस्टल ब्यांक्स, वगैरे ज्या गोष्टी सरकारनें किंवा खाजगी मंडळयांनी व्यापाराच्या सोईसाठी व इतर सोईसाठी स्थापिल्या आहेत, त्यांचा लोकांच्या धर्मविचारांवर, नीतिविचारांवर व नित्याचरणांवर केवढा परिणाम होत आहे, याचा तो लक्षपूर्वक विचार करील त्याला आणखी शेंपन्नास वर्षे असाच क्रम चालला तर हिंदुस्थानच्या पहिल्या स्थितीचा मागमूस नाहींसा होण्याइतकें त्याचें स्थित्यंतर होणार आहे, असें कबूल करावें लागेल. तात्पर्य काय कीं, जिकडे पहावें तिकडे पाश्चिमात्य कल्पनांनी व आचारांनी आम्हांस वेढल्यासारखें झालें आहे व त्यांच्या पेंचांतून आम्हांस निसटून जातां येईल, असं वाटत नाहीं! पण निसटून जाण्याचा तरी प्रयत्न करण्याची काय गरज आहे?ज्या युरोपीय कल्पनांचा प्रघात इकडे पडत आहे त्यांपैकी जेवढ्या अहितकारक असतील तेवढ्या वर्ज्य करून बाकीच्याचा अंगीकार करण्यास काय हरकत आहे? दुसऱ्या विषयाविषयीं लिहीत असता असें दाखविलें आहे कीं, युरोपांत आज जी सुधारणा दृष्टीस पडत आहे ती मागील अनेक सुधारणांचे सार आहे, व ज्या राष्ट्रांस जीवनार्थकलहांत टिकावयाचें असेल, त्यांना त्या सुधारणेचा स्वीकार केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. हें खरें असेल तर ती सुधारणा आपल्या घरी चालून आली असून आपण तिचा निषेध करणें, म्हणजे आपल्या हातानें जाणूनबुजून आपलें नुकसान करून घेण्यासारखें होय. निदान आमची तरी अशी समजूत आहे कीं, इंग्रजांच्या राज्यामुळें ज्या गोष्टी येथे प्रस्थापित झाल्या आहेत व होऊं पहात आहेत त्यांपैकी बहुतेक स्वीकरणीय व अनुकरणीय आहेत. सबब त्यांचा येथें जो आपोआप प्रसार होत आहे त्यास विरुद्ध जाणें हें तर इष्ट नाहींच; पण ज्यांना त्यांचे चांगुलपणा समजण्यासारखे शिक्षण मिळालें आहे, त्यांनी बुद्धिपुरःसर त्यांचा स्वीकार व प्रसार केला पाहिजे. असें केलें तरच त्या लौकर मूळ धरतील आणि त्यांच्या फलांचा लाभ थोड्या वर्षांत आम्हांस होऊं लागून जीवनार्थकलहांत हार न जाण्याची आशा आम्हांस करतां येऊ लागेल. हें बुद्धिपुरःसर सुधारणा करण्याचें काम तरुण सुशिक्षितांशिवाय इतरांच्यानें होण्यासारखें नाहीं, म्हणून इतकां वेळ त्यांची विनवणी चालविली आहे.

तरुण सुशिक्षित मित्रहो, 'शरीर धड तर मन धड' (A sound mind in a good body) अशी जी इंग्रजी भाषेंत सुप्रसिद्ध म्हण आहे; ती तुम्हां सर्वांच्या ऐकण्यांत आलीच असेल. ज्याप्रमाणें जोरदार वृक्ष निपजण्यास मूळ अंकुर जोरदार

पाहिजे, त्याप्रमाणें देशांत सुदृढ स्त्रीपुरुषें निपजण्यास, सुदृढ मुलें होण्यास वैद्यशास्त्रांत जो खऱ्या विवाहाचा काल सांगितला त्याचें कोणाकडूनही उल्लंघन होतां कामा नये. या कालांचे उल्लंघन आम्हांकडून अनेक वर्षें होत असल्यामुळें आमची प्रजा क्षीण, अल्पायुषी, श्रम करण्यास नादान, उत्साहशून्य, व भेकड अशी होत आहे. आमच्या शरीरसामर्थ्याचा लोप होत असल्यामुळे आमचें मानसिक सामर्थ्यही नाहीसें होत आहे. याशिवाय बालविवाहापासून आम्हांवर जी इतर अरिष्टें गुदरत आहेत, त्यांचा येथें अगदी अल्प उल्लेख करण्यासाठी जागा नाहीं. बालविवाह बंद झाल्यास, आज प्रत्येक घरीं ज्या एकदोन हतभाग्य बालविधवा दृष्टीस पडतात, त्या दृष्टीस पडेनाशा होतील; पुरुषांच्या अंगी अधिक पौरुष दृष्टीस पडू लागेल; तरुणांस अधिक उद्योग करण्याची हिंमत येईल, व धाडसाची कामें अंगावर घेण्याची छाती होऊ लागेल; ज्याला त्याला आपापल्या मनाप्रमाणें आपली बायको पसंत करण्याची सवड मिळूं लागल्यामुळें, स्त्रीपुरुषांच्या सुखाची वृद्धि होऊन संसारयात्रा अधिक रमणीय होईल. विवाहापूर्वी मुलींस ज्ञान संपादण्यास अधिक फुरसत मिळाल्यामुळे पुढें त्यांच्याकडून अपत्यसंवर्धनाचे व प्रपंच चालविण्याचें काम चांगल्या रीतीने होऊं लागेल. पण हें सर्व होण्यास बालविवाहाची चाल बंद झाली पाहिजे, व ती बंद होणें किंवा न होणें सर्वथैव तुमच्याकडे आहे.

या कामासाठी सर्व सुशिक्षित तरुणांनी **महाराष्ट्रबालविवाहनिषेधक** नावांची मंडळी स्थापावी, अशी आमची सूचना आहे. आज जे अशा मंडळीचे सभासद होण्यास तयार असतील त्यांनी एकत्र जमून "आम्ही आपले, आपल्या मुलांचे, व ज्या मुलींचें व मुलांचे पालकत्व आमच्याकडे येईल त्यांचे, अल्पवयांत विवाह करणार नाही" अशा शपथा घ्याव्या. जर अशा मंडळीस खरोखरीच कांही सुधारणा व्हावी अशी उत्कट इच्छा असेल तर मुलींचे लग्न बारा वर्षे झाल्यावर व मुलांचे लग्न अठरा वर्षे झाल्यावर करावयाचे, असा निर्बंध कायद्यानें करून घेतला पाहिजे. जो अशा मंडळीचा सभासद झाला; त्यानें तींत नवीन तरुण लोक आणण्याचा होईल तितका प्रयत्न केला पाहिजे. असा क्रम कांही वर्षे चालला तरी **बालविवाहनिषेधक** मंडळीच्या सभासदांची संख्या दोन हजारांवर सहज जाईल; व इतकी मंडळी समान उद्देशानें एका कामांत निगडित झाली म्हणजे तिला दुसऱ्या सुधारणाही झपाट्यानें करतां येतील. प्रत्येक सभासदानें वर्षाची रुपया दीड रुपया वर्गणी देण्यास तयार झालें पाहिजे. या वर्गणीपासून जो फंड उभारला जाईल त्याच्या मदतीनें अनेक आवश्यक व उपयुक्त गोष्टी करतां येतील. अलीकडे पांचचार ठिकाणी अशा प्रकारच्या मंडळ्या स्थापित झाल्या आहेत, व

अशा प्रकारची मंडळी स्थापावयाची झाली म्हणजे काय काय करावें लागतें, अशाविषयीं राजे, सर टी. माधवरावसारख्यांनी पुष्कळ शोध करून टिप्पणें प्रसिद्ध केलीं आहेत; तेव्हां अशा मंडळांचे नियम वगैरे कसे असावे, याविषयी येथें विशेष लिहिण्याची गरज नाहीं. अगोदर अशी मंडळी स्थापण्याविषयी व कायदेशीर बंधनें करून घेण्याविषयीं कांहीचा निर्धार झाला पाहिजे. तो एकदां झाला, म्हणजे पुढचा मार्ग सोपा आहे. आम्हांस अशी आशा आहे कीं, कॉलेजांतील विद्यार्थ्यांनी हें काम आपल्या हातीं घेतल्यास त्यांस ताबडतोब यश येणार आहे. ज्यांच्या अंगी विचारशक्ति आणि उत्साह यांचा संगम झालेला असतो. त्यांना कोणतीही सुधारणा करण्यास अवघड जात नाही. सबब येथील डेक्कन कॉलेजांतील, फर्ग्युसन कॉलेजांतील, व सायन्स कॉलेजांतील, त्याप्रमाणेंच मुंबई येथील एल्फिन्स्टन, फ्री चर्च वगैरे सर्व कॉलेजांतील सुशिक्षित, सुजाण, सुविचारी व प्रौढ विद्यार्थ्यास आमची अशी विनंती आहे की, त्यांनी या स्वहितकर व राष्ट्रहितकर कार्यांत पुढारीपण घ्यावें. पुढील देशस्थिती सर्वांशी त्यांच्या हाती आहे. वरील विद्यालयांत सध्या असणाऱ्या विद्यार्थ्यांनी या कामास प्रारंभ केल्यास, त्यांच्या पाठीमागून त्यांच्या जागीं येणारे विद्यार्थी त्यांचे अनुकरण करतील, येवढेंच नाही, तर कॉलेजांतील विद्यार्थी अशा कामांत पडल्यास त्याचा परिणाम शाळांतील प्रौढ मुलांवरही होऊं लागेल, व या रीतीनें धाग्याशीं धागा लागून जाऊन अल्पकाळात सुंदर सुधारणापट तयार होईल, आणि ज्यांना तो वापरण्यास सांपडेल, त्यांची अनेक प्रकारची आपदा नाहींशी होईल. इतकेंच नाहीं; तर त्यास अननुभूतपूर्व अशा अनेक संसारसुखांचा उपभोग मिळूं लागेल.

✷

# सोंवळयाची मीमांसा

**ऐसे कैसें रे सोंवळे । शिवतां होतसे ओवळें।।**

**—रामदास**

या प्रांतांत व बंगाल प्रांतांत मत्स्याशन करणाऱ्या कांही वरिष्ठ जाती आहेत, त्यांच्या सोंवळयाची एक मौज सांगतात. ती अशीं की, क्षारोदकांत वाढणारी ही भाजी त्यांनी घरीं आणिली आणि ती धुऊन व चिरून पाकसिद्धीसाठीं एखाद्या पातेल्यांत व्यवस्थेने ठेऊन दिली आणि मग ती तिला एखादें आंगरखा घातलेलें पोर शिवलें, कीं ती विटाळून जाऊन पोक्त स्त्रियांच्या व पुरुषांच्या आहारास अयोग्य होते! असें झाल्यावर तिची वाट लावण्याचें काम घरांतील नोकरांवर किंवा सोंवळे नेसूं न लागलेल्या बाळंतिणीवर आणि लहान मुलींवर अथवा मुंज न झालेल्या मुलांवर येऊन पडतें! हा आचार खरोखरीच कोठें रूढ असल्यास, तो पाहून आम्हां महाराष्ट्रीय ब्राह्मणांस त्याच्या वैलक्षण्याबद्दल हसूं आल्यावांचून रहाणार नाही. पण आमच्यांत जे विचारी असतील त्यांनीं हीं गोष्ट ऐकून आपलें हसू आवरण्याचा प्रयत्न केला पाहिजे. कारण या आचारांत जितकी हास्यास्पदता आहे तितकी, किंबहुना तीहून कांकणभर अधिक, हास्यास्पदता आम्हां महाराष्ट्रीय ब्राह्मणांत रूढ असलेल्या अनेक आचारांत आहे. तेव्हां नकट्यांनी नकट्यांस हंसत सुटण्यांत काय अर्थ आहे? विचारी पुरुषांनी ही गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजें कीं, जे आचार चमत्कारिक धर्मकल्पनांवर बसविलेले असतात, ते विवेकाच्या कसाला लावून पहाण्यांत कांही अर्थ नाहीं. जे लोक तसल्या आचारांचे अनुसरण करीत असतात त्यांच्या मनांत त्यांच्या औचित्याचा विचार कधींच येत नाहीं. पूर्वापार चालत आलेल्या गाढ विश्वासशृंखलांनी निगडित होऊन गेल्यामुळें, मागून आलेलें लोण डोळे मिटून पुढल्यांस नेऊन पोचविणें, येवढेंच ते आपलें कर्तव्य समजतात. धर्ममंदिराची रचाई श्रद्धेच्या किंवा विश्वासाच्या पायावर झालेली आहे, असें हिंदू धार्मिकांचेंच म्हणणें आहे असें नाही. पृथ्वीवरील कोणत्याही प्रकारच्या धार्मिकांस विश्वासाशिवाय त्राता नाहीं व थारा नाहीं. या संबंधानें बुद्धिवादांचे नांव काढलें कीं त्यांच्या अंगावर काटा उभा रहातो! एखाद्या दिवाळखोर कर्जबाजाऱ्यास

ज्याप्रमाणें आपल्या प्राप्तीचा आंकडा आपल्या खर्चाच्या आंकड्याशी ताडून पाहण्याचें धैर्य होत नाही, किंवा, ज्यांची जीविताशा फार प्रबल झाली आहे, त्यांना आपल्या रोगाची चिकित्सा सुप्रसिद्ध भिषग्वर्याकडून करवत नाहीं, त्याप्रमाणें श्रद्धाळू धार्मिकांस आपल्या धर्मसमजुती व त्यांवर अवलंबणारे आचार यांस बुद्धिवादाच्या प्रखर मुशीत घालण्याची छाती होत नाहीं. या तीव्र धगीचा खरपूस ताव देण्यास तयार होण्यांत त्यांची धडगत दिसत नाही! त्यांना अशी भीति वाटते कीं, ते हिणकस ठरल्यास, पुढें काय करावें? आम्हांस असें वाटतें कीं, असलें भित्रेपण फार दिवस चालावयाचे नाहीं. विवेक पूर्ण जागृत झाला नव्हता तोंपर्यंत विश्वासानें किंवा श्रद्धेनें प्रत्येक गोष्टींत आपला अंमल चालविला, यांत कांही वावगें झालें नाही. जसा लोकांस तसा मनास कोणी राजा असणें बरें, त्याप्रमाणें वर्तनाचें नियमन करणारें असें कोणतेंच तत्त्व नसण्यापेक्षां विश्वासासारखें एखादें स्खलनशील तत्त्व असणें देखील इष्ट आहे. पण हें कोठपर्यंत? अधिक चांगले तत्त्व अस्तित्वांत आलें नाहीं तोपर्यंत. तें आलें कीं जुन्या प्रमादी तत्त्वानें आपली राजचिन्हें श्रेष्ठ तत्त्वाच्या स्वाधीन केली पाहिजेत. हें सरळ अधिकारांतर येथून पुढें विश्वास आणि विवेक यांच्या दरम्यान होणार आहे, व तसें होण्यांतच मनुष्यतेस प्राप्त होण्यासारखें ऐहिक व पारमार्थिक सुख लौकर प्राप्त होऊं लागणार आहे, अशी आमची समजूत आहे. व ती तशी असल्यामुळें विश्वासावलंबी कल्पनांस आणि आचारांस विवेकाची आंच देऊन झाळून पहाणें, हें **सुधारकाच्या** अनेक कर्तव्यांपैकी एक कर्तव्य होऊन बसतें; आणि तें त्यांने अगदींच बजावले नाहीं तर त्याच्या नांवास अयथार्थत्व येईल, असें वाटून प्रस्तुतचा कांहीं अंशी अप्रिय असा विषय हातीं घेतला आहे.

सोंवळ्या-ओंवळ्याचा विधिनिषेध ब्राह्मणेतर जातींत नाहीं, तेव्हां आजचा विषय कांहीं अंशी एकदेशीय आहे, असें म्हटलें पाहिजे. अर्थात् 'ब्राह्मण' शब्दांत ब्राह्मण व शूद्र यांच्या दरम्यान जितक्या पोटजाती आहेत, व ज्यांनी ही कटकट आपल्या पाठीमागें लावून घेतली आहे, त्या सर्वांचा समावेश केला पाहिजे, हें उघड आहे. या विषयाच्या संबंधानें एका विचारी व सुशिक्षित गृहस्थाशीं बोलत असतां, त्यानें असें म्हणून दाखविलें कीं, आम्हा ब्राह्मणांच्या घरांत गैरसोय होण्यास मुख्य दोन कारणें होतात. एक जुन्या व निरुपयोगी वस्तु पिढ्यान्‌पिढ्या पोटाशीं धरून ठेवण्याची हौस; व दुसरें, सोंवळ्या-ओंवळ्यांची रिपरीप! पहिल्या गोष्टीमुळें घरांत जागेची अडचण होऊन त्रास होतो; दुसरींमुळें बायकांची व पुरुषांची कामें निरर्थक वाढून कालहानि होते, व दुखण्याबाण्यांत कधीं कधीं फारच वाईट परिणाम होतात. ज्या गृहस्थानें आमच्या सोंवळ्या-ओंवळ्याविषयीं असें

मत दिलें त्यानें तें देतांना अर्थात् त्याच्या उपयोगीपणावर विशेष नजर दिली होती, हें सांगायला पाहिजे असें नाहीं. सोंवळें किंवा शुचिता आणि ओंवळें किंवा अमंगलता यांपैकी पहिला गुण संग्रहणीय व दुसरा त्याज्य आहे, हें कोणाही समंजस मनुष्यास कबूल केलें पाहिजे, व शुचितेची हिंदुस्थानांतील सर्व वर्गांत जितकी वृद्धि होईल तितकी होणें इष्ट आहे. पण ह्या शुचितेचें आम्हीं जें प्रस्थ करून ठेवलें आहे, त्या अर्थाची शुचिता आदरणीय आहे किंवा नाहीं, व तिच्यापासून फायदा आहे किंवा नाहीं हें बरेच विचारणीय आहे. ब्राह्मण लोकांचे स्वयंपाकघर व स्वयंपाकाची भांडीं; जेवणाचीं ताटें व पाणी पिण्याची भांडीं; मुखमार्जन व स्नानविधि; झाडणें-सारवणें; वगैरे गोष्टींत जी बरीच स्वच्छता दिसून येते, ती इतर वर्गांनी अनुकरण करण्यासारखी आहे; आणि ही नको असें म्हणणें म्हणजे महिषीवृत्तीविषयीं प्रेम प्रकटित करण्यासारखें होय. तेव्हा ज्या सोंवळयाचा स्वच्छतेशी संबंध आहे, तें सोंवळें रक्षणीय आहे. तसेंच जें ओंवळें म्हणजे अमंगलता; तें त्याज्य आहे. पण यापलीकडे सोंवळया-ओंवळयाचा बडेजाव करणें व तें धर्मांची एक प्रचंड बाब करून ठेवणें म्हणजे व्यवहारांत नसत्या अडचणी उपस्थित करणें आणि वर्गांवर्गांत सलोखा न होण्यासारखी अट घालून ठेवण्यासारखें होय. या अर्थाच्या सोंवळयाचे मंडन विवेकदृष्ट्या करतां येणें अत्यंत दुर्घट आहे. केवळ दीर्घकालीन आग्रहाशिवाय त्याचा पाठपुरावा करतां येणार नाहीं. त्याला विवेकाची कातरी लाविली कीं त्याच्या चिंधड्या होतात! शिवाय, फार दिवसांच्या सलगीमुळें आम्हांस उघडपणें जरी त्याचा अनादर करवेनासा झाला आहे, तरी जेथें जेथें म्हणून त्याकडून व्यवहारांस अडचण येते, तेथें तेथें आम्ही त्याला कांहीं तरी शास्त्रार्थ काढून धाब्यावर बसवून ठेवतों! या संबंधानें आम्हांत व पूर्वपद्धतीच्या लोकांत वादस्थल म्हणून येंवढेंच आहे कीं, जेथें फार मोठी नड येईल तेथेंच सोंवळयाचा बंध ढिला करावा असें ते म्हणतात; आमचें असें म्हणणें आहे की, ज्या गोष्टींत तो रक्षणीय असेल तेवढ्याशिवाय अन्य गोष्टींत आपण त्याची पर्वा करूं नये. जेवढें आवश्यक सोवळें तेवढें ठेवावें असें आमचें म्हणणें आहे; जेवढ्यानें व्यवहार अत्यंत दुर्घट होतो तेवढेंच सोंवळे काढून टाकावें, असें पूर्वपद्धतीच्या लोकांचे म्हणणें आहे. हा मतभेद दिसण्यांत थोडा दिसतो, पण प्रत्येक पक्ष आपापल्या मताप्रमाणें आचरण करूं लागेल, तर त्यांत जमीनअस्मानाचें अंतर पडेल. आमच्या समजुतीप्रमाणें खरकटें आणि निर्लेप ओंवळयातलीं धोतरें आणि मुकटे; लुगड्याला कुणब्याचा स्पर्श आणि पांढऱ्या कपड्याला कुणब्याचा स्पर्श; हरणाचें कातडें आणि इतर जनावराचें कातडें- यांतील भेदाभेद उरत नाही. पूर्वपद्धतीच्या लोकांस हें आमचें म्हणणें बिलकुल

असलेला खर्च कायम ठेऊन शाळा व कॉलेजें चालविण्याची जबाबदारी सरकार लोकांवर टाकतें, आणि त्यांची देखरेख फक्त आपणांकडे ठेवतें, तर 'तुम्ही सर्वथैव वावगी गोष्ट करता,' असें आम्हांस म्हणतां न येतें. पण सध्यां सरकारानें जो क्रम आरंभिला आहे तो आमच्या मतें फारच दूषणीय आहे. ज्याप्रमाणें व्यसनी लोक आपल्या व्यसनांत तदनभिज्ञास घेरावयाचें असतां कांहीं दिवस आपली पदरमोड करून त्यास आपल्या व्यसनाची चटक लावतात, व ती त्याच्या अंगी पक्की खिळली असें दिसून येऊं लागले म्हणजे आपला हात आखडून धरतात इतकेंच नाहीं, तर आपल्या खर्चाचा बोजाही त्यावर लादूं लागतात, तसा प्रकार या विद्याव्यसनाच्या संबंधानें सरकारानें आरंभिला आहे. प्रथम मोठ्या खर्चाचीं शाळाखातीं प्रत्येक इलाख्यांत स्थापलीं; कनिष्ठ, मध्यम व वरिष्ठ प्रतीच्या शाळा घातल्या; त्यांत लोकांनीं आपलीं मुलें धाडावीं म्हणून कोठें त्यांस अगदीं फुकट व कोठें क्षुल्लक फीवर शिकविण्याचा प्रघात घातला; पगारी विद्यार्थ्यांच्या जागा निर्माण केल्या; बक्षिसें लाविलीं; परीक्षा घेण्यासाठीं युनिव्हर्सिट्या स्थापिल्या; ठिकठिकाणीं लहान लहान पुस्तकालयें केलीं;- याप्रमाणें लोकशिक्षणाची लोकांस गोडी लागण्यास्तव होण्यासारखे सारे उपाय करून ते त्याचा आस्वाद चाखूं लागताहेत नाहीं तो त्यांतून आमचें सुधारलेलें सरकार आपलें अंग सर्वांशीं काढूं पहात आहे. इतकेंच नाहीं, तर त्याकडे होत असलेला बराच खर्चही कमी करूं पहात आहे, हें आमचें केवढें दुर्भाग्य होय! व यामुळें सरकारास तरी केवढा धोका बसण्याचा संभव आहे? वाचकहो, ही सर्व चलबिचल ब्रह्मदेशांत चालूं असलेल्या लढाईमुळें व वायव्यप्रांतावर अफगाणिस्थानाच्या बाजूनें परचक्र येऊं नये, म्हणून ब्रिटिश सैन्य वाढविण्यांत आल्यामुळें जो खर्च वाढला आहे, त्यामुळें होत आहे, असें समजणें जरूर आहे. कोणत्याही खात्याचा खर्च कमी न करतां वरील गोष्टी करतां याव्या, म्हणून लॉर्ड **डफरीन** यांनीं **इन्कमट्याक्स** (प्राप्तीवरील कर) पुन: बसविला, मिठावरील कर वाढविला, व दुष्काळनिवारणार्थ बसविलेल्या कराचें सारें उत्पन्न वरील कृत्याकडे लावून दिलें, तरी त्यांचा खर्च भागत नसल्यामुळें, ही काटकसरीची धाड शाळाखात्यावर येऊं पहात आहे, हें उघड आहे. ब्रह्मदेशावर स्वारी करून तो खालसा करण्याचा निश्चय झाला, तेव्हां सरकारानें जे लेख प्रसिद्ध केले त्यांत असें दाखविण्याचा प्रयत्न केला होता कीं, ब्रह्मदेश जिंकण्यास व खालसा करण्यास फार झाले तर तीस लाख रुपये लागतील! पण तो एकदां खालसा होऊन ब्रिटिश राज्याचा घटकावयव झाला, म्हणजे त्यासंबंधानें हिंदुस्थानावर खर्चाचा भार पडणार नाहीं, इतकेंच नाहीं, तर उलट हिंदुस्थानच्या खजिन्यास ब्रह्मदेशापासून मदत होऊं लागेल! ही गोष्ट घडून

येण्याची आशा आतां उरली नाहीं! ब्रह्मदेशाशीं आरंभिलेला संग्राम, वायव्यदिशेचा बंदोबस्त, आणि रुप्याचा उतरलेला भाव- यांमुळें हिंदुस्थानचा खर्च सहा कोटींनीं वाढला आहे. पैकीं सुमारें तीन-साडेतीन कोटी रुपये **इन्कमटॅक्स**, मिठावरील वाढलेला कर, व इतर किरकोळ बाबी यांतून भागविला जात आहे. बाकी उरलेले दोन अडीच कोटी रुपये कोठून काढावे, अशी पंचाईत पडल्यामुळें, प्रत्येक इलाख्यावर नवीन खंडणी बसवावी असा बेत करून, हिंदुस्थान सरकारानें मुंबई सरकारास असें पत्र लिहिलें आहे कीं, चालूं वर्षांत "तुम्हांकडून मुख्य सरकारास एकोणीस लाख रुपये मिळाले पाहिजेत. हे उभे करण्यासाठीं तुम्ही पाहिजे ती काटकसर करा, नवीन कर बसवा, शाळांची फी वाढवा; सारांश, तुम्हांस वाटेल तें करा; पण तुमच्याकडून एकोणीस लाखांची कुमक झालीच पाहिजे! व तेथून पुढें इलाख्याच्या उत्पन्नाचा विवक्षित भाग तुम्हांकडे ठेऊन बाकीचें सारें उत्पन्न मुख्य सरकार आपले ताब्यांत घेईल; व तुमच्याकडे जो भाग ठेवायाचा, तो कमी अधिक करण्याचा अधिकारही मुख्य सरकाराकडे राहील. **इंपीरीअल** उत्पन्न व **इंपीरीअल** खर्च आणि प्रांतिक उत्पन्न व प्रांतिक खर्च- असा विभाग करणें बरोबर नाहीं. कसेंही झालें तरी ज्या गोष्टींबद्दल मुख्य सरकार जबाबदार आहे त्यांचा खर्च कसा तरी भागविलाच पाहिजे. त्याअर्थी तो खर्च भागविल्यानंतर उरेल तेवढा पैसा प्रांतिक खर्चाकडे लावणें योग्य आहे. ज्या प्रांतिक सरकारांस आपापल्या प्रांतांत विशेष सुधारणा करावीशी वाटत असेल, त्यांनीं ती करण्यास्तव हवे तितके पैसे उत्पन्न करावे. पण त्या सर्वांनीं ही गोष्ट लक्षांत धरावी कीं, मुख्य सरकारास लागेल तेवढा पैसा पुरविणें, हें त्यांचें मुख्य कर्तव्य आहे. हिंदुस्थानामुळें इंग्लंडांत होणारा सात आठ कोटींचा खर्च, सैन्याचा खर्च, मोठमोठ्या व्यापारी कंपन्यांस जें व्याज पोहोंचविण्याचा सरकारानें पत्कर घेतला आहे त्याचा खर्च, आणि अशाच प्रकारचे इतर खर्च मुख्य सरकाराकडून होतात; आणि ते केल्याशिवाय राज्यशकट सुरळित चालण्याचा संभव नाहीं. सबब हे खर्च भागविल्यावर जेवढी शिल्लक उरेल तेवढीच प्रांतिक सरकारांच्या ताब्यांत ठेवता येणार आहे." या नवीन तत्वाचा अर्थ असा होतो कीं, मुख्य सरकारानें पाहिजे तसा खर्च करावा; तो पुरविण्याचा मक्ता प्रांतिक सरकारांनीं आपणांकडे घ्यावा; आणि तो निभण्यास्तव लोकांवर हवे तेवढे कर बसवून त्यांस असंतुष्ट करण्याचें अपयश; मुख्य सरकाराकडे न जाऊं देता आपल्याकडे घेण्यास तयार असावें! या अनियंत्रित व अप्रशस्त व्यवस्थेचा अथवा अव्यवस्थेचा आरंभ झाला नाहीं, तोंच प्रांतिक सरकारांवर खर्चाच्या जबरदस्त गोण्या पडूं लागून अत्युपयोगी खात्यांचा खर्च कमी करण्यास सुरवात झाली आहे. दुर्दैवानें ही

व्यवस्था कायम होईल तर पुढें काय काय प्रकार पहावे लागतील, त्यांची आज कल्पना सुद्धां करवत नाहीं! राज्यविस्तार शक्तीबाहेर गेला, आणि उत्पन्नाचा बहुतेक भाग लष्करी खात्याकडे अडला जाऊन, न्याय, लोकशिक्षण वगैरे अत्यावश्यक कामांकडे दुर्लक्ष होऊं लागलें म्हणजे राज्यास उतरती कळा लागल्याचीं चिन्हे दिसूं लागलीं असें आजपर्यंतच्या इतिहासावरून सिद्ध झालें आहे. अलीकडे सर्व सुधारलेल्या राष्ट्रांत लोकशिक्षणाविषयीं पराकाष्ठेची आस्था दाखविली जाऊन, त्याच्यासाठीं अधिकाधिक खर्च करण्याची प्रवृत्ति पडूं लागली आहे. कनिष्ठ प्रतीचें शिक्षण तर सर्वांस फुकटच मिळावें, म्हणजे त्याचा सारा खर्च सरकारी उत्पन्नांतून व्हावा, असा वाद चालू आहे, आणि तो करणारांची संख्या दिवसेंदिवस वाढत आहे. ज्या देशांतील बहुतेक लोकांस लिहितां वाचतां येत आहे, त्या देशांत त्या संबंधानें अशा हालचाली सुरूं आहेत. आमच्या देशांत दाट अज्ञानतिमीर जिकडे तिकडे पसरलें आहे. कॉंग्रेस ही लोकांची प्रतिनिधीसभा नव्हें, असें प्रतिपादणाऱ्यांचा मुख्य मुद्दा असा आहे कीं, ज्या देशांतील शेंकडा पंचाण्णव लोकांस लिहितां वाचतां येत नाहीं, त्यांना कॉंग्रेससारख्या सभांचें महत्त्व समजण्याचा मुळीच संभव नाहीं; म्हणून लोकांत शिक्षणाचा बराच प्रसार होईतोंपर्यंत असल्या कॉंग्रेसांपासून फायदा न होतां नुकसान होण्याचा संभव आहे. तसेच प्रांतिक कौन्सिलांत व गव्हर्नर-जनरलांच्या कौन्सिलांत लोकनियुक्त सभासद असूं नयेत, असें ज्यांचें म्हणणें आहे तेही तसें न करण्यास लोकांचें अज्ञान हेंच कारण दाखवितात. असें असून गरीब बिचाऱ्या शाळाखात्याचा खर्च अविचारानें कमी करणें हें अगदीं उचित नाहीं. या खात्याचा खर्च कमी करणें म्हणजे उत्पन्नाचा झरा बंद करण्यासारखें होय, याचा सरकारानें नीट विचार करावा. काटकसर करणें जरूर असेल तर ती दुसऱ्या खात्यांत करावी. ती शाळाखात्यांत केल्यानें लोकांचें आणि सरकाराचें पुढें पराकाष्ठेचें नुकसान होणार आहे. यासंबंधाची ओरड थेट पार्लमेंटपर्यंत पोंचवून सरकारी उत्पन्नाचा विवक्षित भाग लोकशिक्षणाकडे अव्याहत लाविला जाईल, असें पार्लमेंटानें हिंदुस्थान सरकाराकडून बंधन करून घेतले पाहिजे.

*

# देवता

"व्याघ्रादि हिंस्त्र पशूंस देवतांची कल्पना आहे किंवा नाहीं हें सांगवत नाहीं. पण असलीच तर त्यांच्या देवता पर्वतांच्या गुहांत दिवसां पडून राहणाऱ्या, रात्रीं भक्ष्य मिळविण्यासाठीं गोठ्यांवर, मेंढवाड्यांवर, व कळपांतून चुकून मागें राहिलेल्या व इकडे तिकडे भटकणाऱ्या गैरसावध हरणावर व गाईम्हशींवर हल्ला करणाऱ्या, तीव्र दाढांच्या, प्रचंड सामर्थ्यांच्या, व प्रखरनखायुधाच्या स्वप्रतिमा असतील," असें एका ग्रीस देशांतील मूर्तिपूजेचा तिरस्कार करणाऱ्या ग्रीक तत्त्ववेत्त्यांचे म्हणणें आहे. प्रस्तुत लेखांत या तत्त्ववेत्त्याप्रमाणें या देशांतील विचित्र मूर्तिपूजेवर टीका करण्याचा इरादा नाहीं. मनुष्यास देवतांच्या कल्पना प्रथम कशा सुचूं लागतात; पुढें त्यांची अभिवृद्धि कशीं होत जाते; आणि अखेरीस त्यांचा लय कसा होतों, हें मात्र येथें सांगावयाचें आहे. ज्याप्रमाणें व्यक्तिमात्रास बाल्यावस्थेंत कित्येक विलक्षण कल्पना खऱ्या भासत असून, पुढें जसा त्यांचा लोप होत जातो, त्याप्रमाणें मनुष्यजातीच्या बाल्यावस्थेंत कित्येक विलक्षण कल्पनांचा उद्भव होऊन, पुढें ज्याप्रमाणें तींत ज्ञान आणि अनुभव यांची वृद्धि होत जाते, त्याप्रमाणें त्या मागें पडत जाऊन त्यांच्या ठिकाणीं शुद्धतर कल्पनांचा संभव होतो. तात्पर्य, मनुष्यांच्या विवक्षित स्थितींत त्याला विवक्षित कल्पना सुचल्या पाहिजेत, हें तत्त्वदृष्ट्या कबूल करणें भाग आहे. आणि म्हणून जे एका स्थितींतून पार पडून दुसऱ्या स्थितींत गेले असतील, त्यांनीं आपल्या पहिल्या स्थितींत असलेल्या व्यक्तीस मूढ म्हणणें किंवा त्यांच्या कल्पनांची विटंबना करणें बरोबर नाहीं. एखाद्या वाटोळ्या दगडास शेंदूर फासून त्यापुढें बकरीं मारणें; किंवा संगमरवरी पाषाणाची सुंदर मनुष्याकृति करून तिला पीतांबर नेसविणें; दागिने घालणें, पंच पक्वान्नांचे प्रतिदिवशीं नैवेद्य दाखविणें; व रात्रीं निजण्यासाठीं शय्या करून ठेवणें; अथवा ज्या मंदिरांत कोणत्याही प्रकारचा प्रत्यक्ष प्रार्थनाविषय पुढें ठेवण्यांत येत नाहीं अशा मंदिरांत मांड्या घालून किंवा गुडघे टेंकून आणि डोळे मिटून साक्षात् किंवा परंपरेनें निर्विकार व निर्गूढ अशा परब्रह्माची उपासना व चिंतन करणें; अथवा कोणत्याही मंदिरांत पाय न ठेवतां घरच्या घरीं एकांत स्थानीं विचारमग्न होऊन, विश्वाचा अफाट पसारा आणि आपले संकुचित बुद्धिसामर्थ्य,

हीं पुढें उभीं राहणें आणि आपणास विश्वाच्या दृश्य स्वरूपापलीकडे कधींही जातां येण्याचा संभव नाहीं, विश्वाचें आदिकारण कांही तरी असलें पाहिजे अशी खात्री झाली तरी जोंपर्यंत ज्ञानप्राप्ति इंद्रियावलंबी आहे तोंपर्यंत त्यांच्या द्वारें जेवढें व जसलें ज्ञान मिळेल तेवढ्यांतच समाधान करून घेतलें पाहिजे; त्यापलीकडे भरारी मारणें, व मला जगदादिकारणांचें खरें ज्ञान झालें आहे, असें म्हणणें हा बुद्धीचा भ्रम किंवा आग्रह आहे असें वाटणें;- हे सारे निरनिराळ्या स्थितींत मनुष्यांच्या हातून घडणारे धर्माचार आणि त्याला सुचणारे धर्मविचार आहेत. कोणतीही लहान-मोठी जड वस्तु, वनस्पति, प्राणि, किंवा निराकार देवता यांपैकीं कोणाचेंही पूजन मनुष्य करीत असला तरी त्याच्या सर्व प्रकारच्या पूजनांत एक गोष्ट साधारण असते ती ही कीं, ज्या वस्तूची तो पूजा करीत असतो, ती वस्तु निदान त्यावेळीं तरी त्यास आपणाहून विशेष प्रबळ आणि आपलें हित किंवा अहित करण्यास समर्थ अशी आहे, असें तो मानीत असतो, यांत शंका नाहीं.कोणत्याही वस्तूस देवता कल्पून तिचें पूजन करण्यांत, तिनें केलेल्या उपकाराबद्दल आभार प्रदर्शित करावे, असा एक हेतु असावा, व अमुक अपकार करूं नये, अशासाठी तिची प्रार्थना करावी, असा दुसरा हेतु असावा. याहून कोणत्याही पूजकास आपल्या उपासनेचा आधारभूत तिसरा हेतु दाखवितां येईल असें वाटत नाहीं. सारांश, 'देवता' आणि 'पूजा' या शब्दांबरोबर एका बाजूस सामर्थ्याधिक्य आणि दुसऱ्या बाजूस बलहीनता; एका पक्षीं मनोरथ परिपूर्ण करण्याची शक्ति आणि दुसऱ्या पक्षीं उपकार करून घेण्याचें आणि अपकार टाळण्याचें औत्सुक्य दिसून येतात. हा सिद्धांत ज्यांनीं या संबंधानें विशेष विचार केला नसेल त्यांस सहसा मान्य होण्यासारखा नाहीं. तथापि तो खरा आहे, अशी खात्री पुढील विस्तृत विवेचनावरून झाल्याशिवाय राहणार नाही.

देवता अनेक प्रकारच्या आहेत. जळीं, काष्ठीं, व पाषाणीं देवता भरल्या आहेत. जिवंत झाडांत व जनावरांच्या शरीरांत अनेक देवतांचा संचार होत आहे. सारांश, अशी कोणतीही वस्तु नाहीं कीं जी देवता होऊं शकणार नाहीं, किंवा जिला कोणींतरी देवता करून सोडिलेलें नाहीं. सृष्टींतील सचेतन व अचेतन पदार्थांचे ठाईं प्रबल पुरुषांचे गुण कल्पून त्यांस देवता मानूं लागणें, हा देवतोत्पत्तीचा एक प्रकार; व प्रबल पुरुषांसच जिवंतपणीं आणि मरणोत्तर देव कल्पून त्यांचें पूजार्चन करणें हा देवतोत्पत्तीचा दुसरा प्रकार. नद्या, पर्वत, ग्रह, तारे, धान्यें, हत्यारें, वगैरेंची पूजा; तसेंच बेल, वड, उंबर, तुळस यांची पूजा; पुनः गाय, बैल, साप, हनुमंत, व गरुड यांची पूजा या देवतोत्पत्तीच्या पहिल्या प्रकारांत येतात; राम, कृष्ण, गणपति, ज्ञानदेव, देव मामलेदार, अक्कलकोटचे

स्वामी, यांच्या पूजा देवतोत्पत्तीच्या दुसऱ्या प्रकारांत येतात. या दोन देवतोत्पत्ती एका पाठीमागून एक होतात, असा नियम नाहीं; त्या समकालीनही असतात. त्यांत मुख्य भेद हा आहे कीं, पहिल्या प्रकारच्या देवतोत्पत्तींत मनुष्यांच्या गुणाचा आरोप मनुष्येतर वस्तूंवर होत असतो; दुसऱ्या प्रकारच्या देवतोत्पत्तींत मनुष्यच देव बनून जातो! प्रस्तुत निबंधांत मनुष्यास देव बनविण्याची प्रवृत्ति कशी पडते, हें सांगावयाचें आहे. हें सांगतांना हिंदुस्थानांतील लोकांशिवाय इतर लोकांचीं उदाहरणेंही देण्यांत येणार आहेत. त्यांवरून असें दिसून येईल कीं, धर्मसंबंधानें आमच्या लोकांत जशा विचित्र कल्पना आहेत, तशा इतर लोकांतही आहेत; व ज्याप्रमाणें उत्तरोत्तर आमच्या धर्मकल्पना शुद्ध होत गेल्या त्याप्रमाणें इतरांच्याही होत गेल्या व चालल्या आहेत.

प्रथम ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे, कीं मनुष्य आपल्या वन्यावस्थेंत किंवा प्रथमावस्थेंत बऱ्याच अंशीं अप्रबुद्ध प्रशूसारखा असतो. ज्याप्रमाणें परिचयांत नसलेली एखादी विलक्षण वस्तू या पशूंनीं पाहिली म्हणजे ते बुजतात, आणि घाबरून जातात, त्याप्रमाणेंच असाधारण वस्तूच्या दर्शनानें वन्य मनुष्याची स्थिति होते. त्याला ती वस्तू अमानुष किंवा दैविक वाटूं लागते. रानटी लोक आपल्याहून बुद्धीनें, चातुर्यानें, व बलानें श्रेष्ठ अशा मनुष्यासच देव म्हणतात असें नाहीं; अपरिचित पण विलक्षण निर्जीव वस्तूसही देव मानणें ही त्यांच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति असते. उत्तर अमेरिकेंतील इंडियन लोकांनीं कांहीं विलक्षण वस्तु किंवा पुरुष पाहिला, कीं तिला किंवा त्याला ते देव किंवा पिशाच्च म्हणतात! बेचुआना जातीच्या लोकांनीं जहाज कधी पाहिलें नसल्यामुळें, जेव्हां त्यांपैकीं दोघांस कांहीं इंग्रजांनीं आपल्या गलबतावर नेलें, तेव्हां ते आश्चर्यानें थक्क होऊन असें म्हणूं लागले कीं, 'ही वस्तु मनुष्यकृत नसावी, ही स्वयंभू असावी, ही खचित देव आहे!' रानटी लोकांत 'देव' ही संज्ञा त्यांस न समजणाऱ्या वस्तूस, व ज्या पुरुषाच्या शक्तीचा त्यांस तर्क होऊं शकत नाहीं अशा पुरुषास, लावण्यांत येते. **फिजियन** लोकांचा आणि **युरोपिअन** लोकांचा प्रथम समागम झाला तेव्हां **फिजियन** लोक छापण्याच्या यंत्रांस आणि तीं चालविणाऱ्या युरोपिअन लोकांस देव म्हणूं लागले! राजाला देव म्हणणें हा प्रघात सर्वत्र अवगत आहेच. **शिवाजी** शिवावतार होता, असें मानणारे गृहस्थ आपणांस या क्षणीं पाहिजे तितके सांपडतील! **मालगासकी** लोकांस जी नवीन व उपयोगी गोष्ट दिसेल तीस ते देव म्हणतात. रेशीम, तांदूळ, नाणीं, गडगडाट, वीज, भूकंप हे सारे त्यांचे देव होत! पूर्वज व नुकताच मेलेला राजा हेही त्याच कोटींत येतात! पोथ्यांना नमस्कार घालण्याचा मक्ता आमच्याकडेच आहे असें नाहीं; हे लोकही पुस्तकांस देवाप्रमाणें भजतात! मखमालीस हे लोक ईशतनय मानतात! याप्रमाणें असाधारण वस्तूस व मनुष्यास देव मानणाऱ्या लोकांचीं अनेक उदाहरणें देतां येतील, पण तसें करण्यास

येथें जागा नाहीं. ज्यांना तीं हवीं असतील त्यांनीं प्रसिद्ध इंग्लिश तत्त्ववेत्ता जो हर्बर्ट स्पेन्सर त्याचा **प्रिन्सिपल्स ऑफ सोशिऑलाजी** नामक ग्रंथ पहावा. या तत्त्ववेत्त्याच्या इतर ग्रंथांप्रमाणें हा ग्रंथही विद्वत्तेची आणि विचाराची अनुपम खाण आहे; व **सुधारकांच्या** द्वारे त्याची ओळख आमच्या लोकांस करून द्यावी, असा आमचा मानस आहे. प्रस्तुत निबंध वरील ग्रंथाच्या एका अध्यायाच्या आधारानें लिहिण्यास आरंभ केला आहे.

असो! वर जीं उदाहरणें दिलीं आहेत त्यांवरून काय दिसून येईल कीं, रानटी लोक आपल्याहून श्रेष्ठ असा मनुष्य दिसला कीं त्याला देव म्हणूं लागतात. हें श्रेष्ठत्व अगदीं स्वल्प असलें तरी चालतें. **तोडा** जातीच्या लोकांत बहुश: गवळ्यांकडें उपाध्यायत्व किंवा धर्माधिकारित्व असतें; तेव्हां अर्थातच ते आपणांस देव समजतात. जर यांपैकीं एखाद्या पवित्र गवळ्यास कोणी असें विचारील कीं, "कांहो, उपाध्यायबोवा, तुम्ही सूर्याची पूजा करीत असतां काय?" तर त्यावर तो छातीला हात लाऊन असें उत्तर देईल कीं, "अस्मादिक त्या सूर्याची पूजा कशासाठीं करतील? इतर गरीब लोकांनीं पाहिजे तर ती करावी. सूर्यासारखेच आम्हीही देव आहों; व सूर्याप्रमाणें इतरांनी आमची पूजा केली पाहिजे!" तेव्हां 'ब्राह्मणं कुलदैवतं' या सूत्रांत ब्राह्मणाच्या जागी 'दोहक' असा शब्द घातल्यास, तें सूत्र **तोडा** लोकांस अत्यंत स्वीकरणीय होईल असें वाटतें. मध्य अमेरिकेंतील टालटिक प्रांतांतल्या इंडियन लोकांविषयी **मॉंटगोमरी** असें लिहितों कीं, हे लोक आपल्या देव मानलेल्या वृद्ध मनुष्यावर एका तऱ्हेचा पोषाख चढवून, त्याची एका खोपट्यांत स्थापना करतात, व त्या ठिकाणीं जाऊन ते त्याची पूजा करतात. आपापल्या शेतांतील फळें वगैरे नैवेद्य म्हणून त्याला अर्पितात; आणि त्याच्या समोर आपल्या पूर्व संप्रदायाप्रमाणें एका प्रकारचे धर्मविधि करतात!

यावरून काय झालें कीं, अज्ञानावस्थेंत मनुष्यास आपल्यापेक्षां किंचित् श्रेष्ठ अशा व्यक्तीविषयीं येवढी भीति उत्पन्न होऊन त्याची पूजा आरंभावी असें वाटूं लागलें. तर तो मेला असतां त्याचें पिशाच्च अधिक भीतिप्रद वाटून त्याला देऊळ बांधावें, प्रति दिवशीं, प्रति मासीं, किंवा प्रति वर्षीं त्याला देणें द्यावें, आणि जेणेंकरून त्याची मर्जी आपणावर सुप्रसन्न राहील, अशा प्रकारचे उपाय करावे असें वाटणें, हें किती साहजिक आहे बरें? आपणांमध्ये जो प्रचंड श्राद्धविधि माजला आहे त्याचें सर्व बीज या वृत्तींतच आहे. गतासु झालेल्या आप्तांच्या पिशाचांनीं आपणांवर कुपित न होतां, आपली कृपादृष्टि सदैव चालू ठेवावी, आणि पोराबाळांस त्रास देऊं नये, हें सारें श्राद्धविधीच्या आणि पितृतर्पणाच्या बऱ्याच भागाचें गुह्य आहे. तेव्हां आजच्या निबंधापासून ही गोष्ट लक्षांत ठेवायाची कीं, देवतात्वाचें पहिलें पितृकत्व श्रेष्ठ मनुष्याकडे येते; म्हणजे श्रेष्ठ मनुष्य देवता बनतो.

*

# देवतोत्पत्ति

तेविसाव्या अंकांत ;प्रबल मनुष्य हयातींत असतां व मरणोत्तर देवतात्वाप्रत कसा पावतो, हें दाखविलें आहे. आज सामान्य प्रबल मनुष्याशिवाय दुसऱ्या कोणत्या प्रकारचे पुरुष जिवंत असतां व मेल्यावर देवाप्रमाणें गणले जातात, हें दाखवावयाचें आहे.

हा किंवा अशा प्रकारचे दुसरे लेख वाचतांना वाचकांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे कीं, आजमितीस सुधारलेल्या राष्ट्रांतील अत्यंत बुद्धिवान् व सुशिक्षित मनुष्यांमध्यें परमेश्वराविषयीं जी कल्पना दृढ होऊन बसली आहे, ती मनुष्यांच्या सर्व प्रकारच्या स्थितींत त्यांना असते, किंवा होती, असें सिद्ध करून देण्यास पुरावा नाहीं. उलट ही कल्पना हळूं हळूं अस्तित्वांत आली आहे, असें दाखविण्यास पुष्कळ प्रमाणें आहेत. जो अनादि, जो अनंत, जो सृष्टीचें आदिकारण, जो सर्वगामी व सर्वज्ञ, जो निर्गुण व निराकार, ज्याच्या इच्छामात्रेंकरून कोट्यवधि ब्रह्मांडे उत्पन्न होतात आणि लयास जातात; जो सर्व सूक्ष्म वस्तूंहून सूक्ष्म व स्थूल वस्तूंहून स्थूल; जो अग्नीनें दग्ध होत नाहीं, शस्त्रानें तुटत नाहीं, वायूनें शोषत नाहीं आणि बुद्धीस ज्याचें खरें स्वरूप गम्य होण्याचा संभव नाहीं- अशा एका सृष्टिचालक जगदात्म्याची कल्पना; मनुष्यास फार काळानें व पुष्कळ विचारानंतर प्राप्त झाली आहे. व अजूनही ज्या देशांत व ज्या लोकांत जगदादिकारणाचें अशा प्रकारचें स्वरूप गाह्य झालें आहे, त्या देशांत व त्या लोकांतही अशा देवास देवाधिदेव किंवा अशा ईशास परमेश मानण्याचा प्रघात आहे. तात्पर्य काय कीं, जे आपणास एकेश्वरवादी म्हणवितात, त्यांच्या मनांतून सुद्धां अनेक देवतांची कल्पना अद्यापि समूळ नाहींशी झालेली नाहीं. विचारदृष्ट्या ज्यांना अशा प्रकारचें एकेश्वरी मत पसंत झालें आहे, पण देशांतील अनेक देवतांवरील ज्यांचा भरंवसा उडालेला नाहीं, व मूर्तिपूजेचें वैरूप्य ज्यांच्या मनांत पूर्णपणे बिंबलेलें नाहीं, ते असें म्हणतात कीं, ज्या अनेक देवतांचें सामान्य लोक पूजार्चन व उपासना करतात; त्या देवता मुख्य देवाच्या किंवा परमेश्वराच्या विभूति किंवा अंश होत. ज्याप्रमाणें नद्यांचें उदक परंपरेनें समुद्रांत जाऊन मिळतें, त्याप्रमाणें या अनेक देवतांची उपासना मुख्य देवाप्रत जाऊन पोहोंचते- किंबहुना

चंचल मनास स्थैर्य उत्पन्न करण्यासाठी निर्गुण परमेश्वराचीं हीं सगुण रूपें कल्पून त्यांची आराधना करण्याचा प्रघात पडला आहे. ही व्यवस्था मूढ जनासाठीं आहे; पण ज्या अर्थी तींत दूषणीय असें कांहीं नाहीं, त्या अर्थी विद्वानानीं सुद्धां तिचें अवलंबन करण्यास कांहीं हरकत नाहीं. त्यांनी तसें न केले तरी चालणार आहे; कारण खऱ्या ईशस्वरूपाचें ज्ञान त्यांना झालेलें असतें. पण तसें असलें तरी मूर्तिपूजेनें त्यांस कोणत्याही प्रकारचा कमीपणा येतो असें नाही. बुद्धि प्रसन्न असेल तेव्हा निर्गुण परमेश्वराची आराधना करावी; कोणत्याही कारणानें ती व्यग्र झाली असेल तेव्हां, किंवा सामान्य लोकांस उदाहरण घालून द्यावयाचें असेल तेव्हां, निर्गुण परमेश्वराची एखादी सगुण मूर्ति पुढें ठेऊन तिची उपासना करावी. या प्रकारें विद्वानांनीं द्विप्रकारक उपासनाक्रम ठेविला असतां, अविद्वानांस चांगलें वळण लागत राहून विद्वानांची धर्मश्रद्धाही क्षीण होण्याचा संभव राहणार नाहीं. अशा प्रकारचें मूर्तिपूजेचे मंडन अनेकांस नापसंत होऊन, त्यांनी थेट निराकार परमेश्वराशिवाय दुसऱ्या कोणासही भजावयाचें नाहीं, व अन्य देवतांच्या अंगी देवतात्व मानायाचें नाहीं, असा निर्धार करून तद्नुरूप धर्मस्थापना करण्याचा यत्न केला आहे; पण अद्यापि तो कोणत्याही देशांत पूर्णपणे तडीस गेलेला नाहीं, असें मानण्यास अनेक आधार आहेत. खिस्ती धर्मांत मुसलमानी धर्मांत, बौद्ध धर्मात, सारांश एकेश्वरी मतापर्यंत जाऊन धडकलेल्या कोणत्याही प्राचीन किंवा अर्वाचीन लोकांच्या धर्मांत कशा तरी प्रकारची मूर्तिपूजा अद्यापि थोडीबहुत तरी दृष्टीस पडते! तात्पर्य काय कीं, पुष्कळांचा विचार जरी निराकार परमेश्वरापर्यंत जाऊन पोहोंचला आहे, तरी तो अद्यापि हवा तितका दृढ झाला नसल्यामुळें, त्यांच्या धर्माचारांतून मूर्तिपूजा पुरतेपणीं निघत नाहीं! यावरून काय सिद्ध होतें कीं, मनुष्यास साकार देवाची कल्पना आधीं सुचते, आणि निराकार देवाची कल्पना मागून येते; अगोदर पुष्कळ देवतांवर विश्वास असतो, पुढें तो एकीवर गोळा होतो; प्रथम जड पूजाद्रव्यांनींच देवता प्रसन्न करून घेतां येतील असें वाटत असतें, पुढें मानसिक पूजा पुरे आहे असें वाटूं लागते. सारांश, अनेकत्वानंतर एकत्वाची, स्थूलानंतर सूक्ष्माची, जडानंतर चिद्रूपाची, साकारानंतर निराकाराची, इंद्रियगोचरानंतर अतींद्रिय ज्ञानाची, व्यक्तानंतर अव्यक्ताची, व गम्यानंतर अगम्याची कल्पना, मनुष्यांच्या अधिकाधिक विकास पावत जाणाऱ्या बुद्धीस येणें, हेंच अत्यंत स्वाभाविक आहे. ज्याप्रमाणें लहानमोठ्या भोंकांच्या चाळणी घेऊन धान्य पुन: पुन: चाळलें असतां अगदीं निवडक दाणे मात्र शेवटच्या चाळणींत राहतात; किंवा सोन्यारुप्याची अगदीं बारीक तार काढावयाची असली तर ती एकाहून एक लहान अशा भोंकांतून निघते, त्याप्रमाणें मनुष्याच्या विचाररूप

चाळणींत तेहतीस कोटी देव आणि त्यांविषयी अगणित कल्पना हजारों वर्षे चाळण्यास घातल्या असल्यामुळें, त्याचा अखेर परिणाम असा झाला आहे कीं, तेहतीस कोटी देवता आणि त्या संख्येच्या वर्गाइतक्या त्याविषयीं कल्पना; यापैकी फक्त एकीशिवाय बाकीच्या साऱ्या चाळांत सांपडून गेल्या आहेत! ज्या एकीची अशी दुर्दशा झाली नाहीं ती निर्गुणनिराकारादि विशेषणांनीं वर वर्णिलेली परमेश्वराची कल्पना होय. विचारवृद्धीबरोबर मनुष्यांच्या धर्मकल्पना जशा बदलत जातात तशा त्यांच्या अन्यविषयक कल्पनाही फिरत जातात. पदार्थविज्ञान, रसायन, वैद्यक, वनस्पतिशारीरक, प्राणिशारीरक, न्याय वगैरे सर्व शास्त्रांत असेच फेरफार होत गेले आहेत. मनुष्यांची विचारशक्ति विशेष विकास पावलेली नसते तोंपर्यंत त्यांस कार्यकारणांचा बिनचूक निश्चय करतां येत नाहीं. कोणत्याही दोन संलग्न किंवा पूर्वोत्तर गोष्टींपैकीं पहिलीस दुसरींच कारण आणि दुसरींस पहिलीचें कार्य, असें मानण्याची त्यांची स्वाभाविक प्रवृत्ति असते. पालींचे कुचकुचणें, घुबडांचें रडणें, मांजरांचे आडवें येणें, विधवांचे दर्शन होणें, ताऱ्यांचे पडणें, चंद्राभोवतीं खळें होणें, इंद्रधनुष्य दिसणें वगैरे गोष्टींचें अनिष्टत्व, आणि स्वप्नांत साप दिसणें, सवत्स स्त्री, किंवा गाय समोर येणें, भारद्वाजांचें दर्शन होणें, व्यक्तिभेदाप्रमाणें उजवा किंवा डावा डोळा लवणें, कोणाचें आकस्मिक येणें आणि त्याचवेळीं येणाराचें नांव निघत असणें वगैरे गोष्टींचे इष्टत्व- ही मोठ्या विचारानें स्थापित झालीं आहेत, असें कोणासही म्हणता येणार नाहीं तथापि सर्व ठिकाणच्या अज्ञान लोकांत अशा प्रकारचे चांगलेवाईट ग्रह विशेष स्थितींत होत असतात, आणि अनेक वर्षे त्यांचा अंमल चालत असतो. अशा प्रकारचे खोटें कार्य- कारणसंबंध नाहींसे होऊन त्यांच्या जागीं खरे संबंध स्थापित होणें हें ज्ञानवृद्धीचें फल होय. न्यूटननें यच्चावत् परमाणूंस लागणारा गुरुत्वाकर्षणाचा धर्म स्थापित केल्याबरोबर सर्व ज्योति:शास्त्रावर एकदम उजेड पडल्यासारखा झाला. घन, द्रव, आणि वायु या तीन स्थिति प्रत्येक जड पदार्थास भार आणि शीतोष्ण यांच्या साहाय्यानें आणिता येणार आहेत, येवढा सिद्धांत प्रस्थापित झाल्यापासून पदार्थविज्ञानांत केवढी क्रांति झाली आहे? रसशोषक असे एक प्रकारचे अत्यंत सूक्ष्म कोष प्रत्येक वनस्पतीचे व प्राण्याचे आद्य घटक आहेत, असें दिसून आल्यापासून वनस्पतिशारीरकांत व प्राणिशारीरकांत केवढा फेरफार झाला आहे! आपल्या जुन्या वैद्यांनीं सर्व रोगांचीं कारणें त्रिदोषांपासून उत्पन्न होतात, असें सिद्ध करण्याचा केलेला प्रयत्नही अशा प्रकारचाच होता. या सर्व उदाहरणांवरून काय दिसतें कीं, प्रत्येक शास्त्रांत कारणें निश्चित करून त्यांची संख्या होईल तितकी कमी करावी, व त्यांपासून पुढील सर्व कार्यें ठरीव नियमाप्रमाणें घडून येतात, असें स्थापित

करावें- अशा व्यासंगांत मनुष्याची बुद्धि आज हजारों वर्षें गढून गेली आहे; आणि या परिश्रमाचें फळ जसें इतर विषयांत तसें धर्मविषयांतही तिला आलें आहे. ज्याप्रमाणें अलीकडे जड सृष्टीच्या शास्त्रीय विचारांत गुरुत्वाकर्षण ठाम होऊन गेलें आहे, त्याप्रमाणें धर्मविचारांत सर्वशक्तिमान् व सर्वज्ञ अशा एका परमेश्वराची कल्पना दृढ होऊन गेली आहे किंवा जात आहे.

यावरून असें दिसून येईल कीं, अनादि कालापासून मनुष्यमात्रास अशा प्रकारच्या ईशशक्तीचें यथार्थ ज्ञान आहे, असें जें अनेक श्रद्धाळूंचें फार जुनें व आग्रहाचें म्हणणें आहे, तें साधार नाहीं. मनुष्यांनीं निरनिराळ्या स्थितींत अनेक प्रकारच्या देवतांवर भरवंसा ठेविला आहे, आणि सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् परमेश्वराची जी कल्पना त्यांनीं केली आहे, ती अखेरची आहे. ही कल्पना त्यांच्या मनांत येण्यापूर्वी ज्या अनेक देवतांस ते भजत होते, त्यांपैकीं काहींची कल्पना त्यांना पराक्रमी पुरुषांपासून करतां आली. या पराक्रमी पुरुषांत पूर्वकालीं राजे लोक विशेष पराक्रमी असत. रानटी लोकांचें धुरीणत्व किंवा नृपतित्व; ज्याच्या अंगीं असाधारण धैर्य, निश्चय, चातुर्य, व कष्टालुत्व असतें त्यासच प्राप्त होऊं शकतें. यामुळें, व एकदां राज्यपद प्राप्त होऊन बरीच सत्ती हातीं आल्यामुळें, अशा स्थितींतला राजा इतरांपेक्षां हरएक गुणांनीं फारच मोठा दिसूं लागतो. असें होऊन एकदां एकाक पक्षास प्रतिष्ठा मिरविण्याची, आणि दुसऱ्या पक्षास लीनतेनें वागण्याची, खोड लागली म्हणजे पहिला पक्ष कोणत्या गुणास हक्क सांगेल, व दुसरा कोणत्या प्रकारच्या दास्याचरणास तयार होईल, हें सांगतां येणार नाहीं. अज्ञान, अविचारी, व भेकड लोकांनीं राजास मातापितरांहून अधिक मान द्यावा यांत कांहींच नवल नाहीं. आजमितीस युरोपांतील सुधारलेल्या कांहीं देशांत असा प्रकार घडत आहे. राजास मातापितरांइतका मान देणें हें अज्ञान लोकांच्या राजनिष्ठेचे अगदीं पहिले कलम होय! यापुढें त्यांची मजल फार जाते. अज्ञान लोक आणि स्वार्थसाधू स्तुतिपाठक, राजासारख्या अद्वितीय व्यक्तीची स्तुति करूं लागले म्हणजे कोठपर्यंत जातील, हें सहसा सांगतां येणार नाहीं. हे लोक राजास देवाचा अंश, देवाचा मुलगा, देवाचा लाडका आप्त, देवाचा पिता, आणि साक्षात् देव करून टाकतात! राजा पाऊस पाडतो, राजा विजा चमकवितो, राजा समुद्र आटवितो, राजा चंद्रसूर्यास ग्रहण लावतो, राजा रोगांच्या साथी आणतो आणि त्या नाहींशा करतो; राजा सांगेल तें केले पाहिजे व मागेल तें दिलें पाहिजे; राजाबरोबर सती जाणें यांतच जीवितसाफल्य व परमार्थसाधन आहे; राजासाठीं आत्महत्या करून घेतली असतां देवयोनि प्राप्त होऊन स्वर्गलोकीं देवसमुदायांत देवांगनांबरोबर निरंतर विवाह करतां येतो, व अमृतसेवनानें अमरत्व संपादितां

येतें- अशा प्रकारच्या विलक्षण कल्पना अल्प काळांत रूढ होऊन जातात! ते जिवंतपणीं राजास नवस करूं लागतात; त्याच्या दर्शनास येऊं लागतात; रोग दूर होण्यासाठीं त्याच्या पादांघ्रिस्पर्शाविषयीं आतुर होतात; त्याला कौल लावतात; त्याला देवऋषी समजतात; आणि त्यांचें स्नानोदक तीर्थ समजून शुद्ध होण्यासाठी तें प्राशन करण्याविषयीं उत्कंठ होतात! जिवंत राजाविषयीं अशा कल्पना झाल्या असल्या, आणि त्यांतल्या त्यांत तो बराच पराक्रमी असला म्हणजे मग तो मेल्यावर त्याला किती भ्यावें, त्याविषयीं आपली दृढ निष्ठा प्रदर्शित करण्याबद्दल काय करावे, आणि त्याला किती भजावें असें मुग्ध लोकांस होऊन जाते! त्यांच्या समजुतीप्रमाणें जो जिवंतपणींच देव असतो, तो मरणोत्तर महादेव होतो! मग काय विचारतां? जिवंत राजापेक्षा मेलेल्या राजाची विशेष आराधना करण्याचा प्रघात पडूं लागतो! वरिष्ठ योनीप्रत राजांची देवळें बांधलींच पाहिजेत; प्रत्येक दिवशीं त्यांची पूजा करून त्यांस नैवेद्य अर्पण केलेच पाहिजेत; कोणतेंही महत्कृत्य करणें झालें कीं, त्यांचे स्मरण केलेंच पाहिजे; विवाहादि मंगलकार्ये निर्विघ्नपणें तडीस जाण्यासाठीं त्यांची प्रार्थना करून त्यांस खुष राखण्यासाठी आपल्या समजुतीप्रमाणें मनुष्याचें, जनावराचें, शिजविलेल्या अन्नाचें, किंवा कोरड्या धान्याचें आणि नारळाचे तरी बळी दिलेच पाहिजेत; सारांश, कोणतेंही महत्कृत्य करावयाचें झालें, तरी अशा रीतीनें अस्तित्वांत आलेल्या देवांचें साहाय्य मागितल्याशिवाय व त्यांची प्रार्थना केल्याशिवाय तें करू लागण्याचा संभव नाहींसा होतो! पुढें जों जों श्रद्धा अधिकाधिक होत जातें; तों तों बारिक सारिक गोष्टींतही देवाचें स्मरण व चिंतन करण्याचा प्रघात पडूं लागतो. निजताना, उठतांना, बसतांना, जेवतांना, ढेकर आली असतां; शिंक आली असतां, जांभई आली असतां, पागोंटे पडलें तर, कांस सुटली तर, ठेंच लागली तर, मुलें उपजल्यावर, स्त्रिया उपवर झाल्यावर, लहान किंवा थोर पुरुष अथवा स्त्री मेल्यावर, शेताची कापणी करणें झाल्यास, मुलास पाटीवर बसविणें झाल्यास, घरांतून बाहेर पडावयाचें असल्यास- सारांश कांहींहीं झालें असतां किंवा करावयाचें असतां खऱ्या भाविकाला देवास नमस्कार करून त्याची कृपा संपादिल्याखेरीज पाऊल टाकण्याची सोय नाहींशी होते! अशा प्रकारच्या देवांच्या प्रकृतींत आणि मनुष्यांच्या प्रकृतींत म्हणण्यासारखें अंतर नसते! मनुष्यास सुखदु:ख होत असतें, कामक्रोधादि वासनांचा मनुष्याप्रमाणें त्यांचे ठाईही वास असतो. मनुष्याप्रमाणें तेही युद्धें करतात, स्त्रीसक्त असतात, विश्वासघात करतात, खून करतात, ऐषआराम भोगतात, सोमरस पितात, लुगडीं नेसतात, नथी घालतात; दुखणेकरी होतात, वैद्याचे घरी जातात आणि काढे घेतात; त्यांना जखमा लागतात; दुखणेकरी होतात, आणि अमर असून कधीं कधीं ते मरतात,

किंवा निजधामास जातात! त्यांपैकीं कांहीं उदार, कांहीं परोपकारी, कांहीं दांडगे, कांहीं क्रूर, कांहीं खोडकर, कांहीं 'शिनळ', कांहीं एकस्त्रीव्रत, कांहीं बहुपत्नीक, कांहीं दासीपुत्र आणि कांहीं कोष्टी, सोनार, सुतार, शिल्पी, चितारी, गवयी, झाडू, मोतद्दार, गाडीवान व बागवान असतात! सारांश ज्याप्रमाणें या मर्त्य लोकांत त्याप्रमाणें देवलोकांत थाट आहे! कांही कमी नाहीं! आणि कां कमी असेल? या आमच्या पृथ्वीवरचेच प्रबल पुरुष, राजे, वैद्य, सुवर्णकार, चित्रकार, शिल्पज्ञ, विद्वान, योद्धे, भविष्यज्ञ, हेच मरणोत्तर देव होऊन जात असल्यामुळें त्यांनीं आपला ऐहिक स्वभाव किंवा प्रकृति सर्वथैव टाकावीं हें कांहीं संभवत नाहीं; किंवा तसें करणेही शक्य असलें, तरी ज्या आम्हीं अत्रस्थ मर्त्यांनी त्यांच्या आयुष्यक्रमाची कल्पना करावयाची; त्या आम्ही आमच्या इंद्रियांचे व मनाचे जे धर्म आहेत त्यांच्या बाहेर कसें जावें? आमच्या देवांच्या आणि महादेवांच्या कल्पना, आमचे आचार, आमचे विकार, आणि आमचे विचार यांवरच अवलंबून असल्या पाहिजेत. कल्पनातुरगीवर आरोहण करून तिला कितीही भरधांव सोडिली तरी अंतर्बाह्येंद्रियविषयांस सोडून ती कोठें जाणार? ज्ञानेंद्रियांनीं व कर्मेंद्रियांनीं ज्या विषयांचें ज्ञान होतें; त्या विषयांपैकी लहानांस थोर करणें, तुटलेल्यांस जोडणें, दूरांस जवळ करणें, कुरूपांस सुरूप व सुरूपांस करूप करणें, सचेतनांचा व अचेतनांचा अन्योन्यांशीं किंवा ज्यांच्या त्यांशीं मिलाफ करून नवीन तिरस्करणीय किंवा रमणीय सृष्टि निर्माण करणें हें काय तें कल्पनेचें काम होय. कल्पना झाली तरी फक्त इंद्रियांच्याच द्वारें ज्या विषयांचे ज्ञान होत असतें, त्यांच्या बाहेर जाऊं शकत नाहीं. तिनें पाहिजे तेवढी घडामोड करावी; पण नवीन विषय उत्पन्न करणें हें तिचें काम नव्हें. सारांश, धार्मिक लोक पाहिजे तें म्हणोत, आमच्या देवता येथील प्रबल पुरुषांच्या, राजांच्या, वैद्यांच्या, कारागिरांच्या, किंवा योद्ध्यांच्या कल्पनेनें काढलेल्या मुळाहून कदाचित् कांहींशा श्रेष्ठ अशा प्रतिमा आहेत, व अशा प्रतिमा काढण्याची संवय तिला लागण्यास मनुष्यांतील स्वकुलांतील पूर्वज पूजेचा प्रघात कारण झाला आहे, असें कबूल करणें भाग आहे. आणि म्हणून सर्व धर्मकल्पनांच्या आणि देवतांच्या मुळास स्थूलमानानें पूर्वजपूजा आहे, असें म्हटल्याशिवाय कोणाही विचारी पुरुषास राहवणार नाहीं.

✷

# अथ आचारप्रकरणम्

पूर्ण एकांताशिवाय स्वेच्छाचार नाहीं. दोन मनुष्य एकत्र आले कीं एकानें दुसऱ्याशीं कसें वागावें, असा प्रश्न उत्पन्न होतो; आणि त्या दोहोंत ज्या प्रकारचा संबंध असेल तदनुसार त्यांचें एकमेकांशीं वर्तन होतें. पण कसेंही झालें तरी मनुष्य एकटा असतां तो ज्याप्रमाणें वागूं शकेल; त्याप्रमाणें त्याला दुसऱ्यासमक्ष कधींही वागतां येत नाहीं. दुसऱ्याच्या सांनिध्यामुळें स्ववर्तनांत जो भेद करावा लागतो, त्यास येथें सामान्यपणें आचार किंवा आचारपद्धती म्हटलें तरी चालेल समाजांत अनेक प्रकारच्या व्यक्तींशी व्यवहार करावयाचा असल्यामुळें, या आचारपद्धतीस विलक्षण प्रकारचें बहुविधत्व आलें आहे. राजाप्रजा; पतिपत्नी; बहिणभाऊ; स्वामिसेवक; गुरुशिष्य; अग्रणीअनुयायी; ग्राहकविक्रेता; श्रेष्ठकनिष्ठ- असे समाजघटकांत अनेक प्रकारचे संबंध असतात; आणि या संबंधानुरोधानें स्थापित झालेल्या आचारनियमांप्रमाणें आजपर्यंत एकाचें दुसऱ्याशीं वर्तन होत आलें आहे. हे आचारनियम केवळ चिरस्थाई असतात असें नाही. देशकालमानाप्रमाणें त्यांत फेरफार होत जातात. तथापि ते कशातरी प्रकारचे असल्याखेरीज कोणताही समाज चालावयाचा नाहीं. समाज म्हणजे एकाहून अधिक व्यक्तींचा समुदाय. असा समुदाय चालू राहण्यास्तव त्याच्या घटकांचें अन्योन्यांशीं जें वर्तन व्हावयाचें; त्याचे कसले तरी नियम असलेच पाहिजेत. अशा नियमांशिवाय समाजाची कल्पनाच अशक्य आहे. हें म्हणणे केवळ मनुष्यसमुदायासच लागूं आहे असें नाहीं. मनुष्याहून बुद्धीनें, शरीरानें, सामर्थ्यानें बऱ्याच अंशीं कमी अशा समाज करून राहणाऱ्या चतुष्पादांत, पक्ष्यांत, व सूक्ष्म कीटकांत सुद्धां हे आचारनियम दिसून येतात. श्रेष्ठाला वचकणे, बरोबरीच्यांशी सामना करणें, कनिष्ठावर चालून जाणें, आवडत्याला कुरवाळणें, संकटावस्थेंत शरण जाणें, व कोणी उपकार केला असतां कृतज्ञता प्रदर्शित करणें- हे आचाराचे प्रकार खालच्या प्रतींच्या प्राण्यांतसुद्धा कमी अधिक प्रमाणानें सांपडतात, हे सर्वांस ठाऊक असेलच. तेव्हा ते मनुष्यसमाजांत सांपडतात, यांत काहीं नवल नाहीं. ज्याप्रमाणें कसल्यातरी दोऱ्याशिवाय निरनिराळे मणि एकत्र होऊन माळ व्हावयाची नाहीं, त्याप्रमाणें कसल्यातरी समाजबंधनाशिवाय समाज चालावयाचा नाहीं. कशा

तरी प्रकारचीं समाजाचारबंधनें स्थापित झाल्यानंतर, त्यांपासून समाजास विशेष वळण लागणारीं धर्मबंधनें व राज्यबंधनें उत्पन्न होतात, व या तिहींनी मिळून समाजास पुष्कळच बळकटी येते; पण धर्मबंधनाशिवाय किंवा राज्यबंधनांशिवाय वेडावाकडा समाज अस्तित्वांत यावयाचा नाहीं असें नाहीं. आफ्रिका, अमेरिका, ऑस्ट्रेलिया यांच्या कांहीं भागांत असे समाज पाहण्यांत आले आहेत कीं, त्यांत सामान्य आचारबंधनांशिवाय समाजघटकांस एकत्र राखण्यास दुसऱ्या कोणत्याही प्रकारची बंधनें नाहीत. जुन्या राष्ट्रांत राहणाऱ्या आम्हा जुन्या लोकांची अशी समजूत आहे कीं, सामाजिक, धार्मिक, व राजकीय या तीन प्रकारच्या बंधनांशिवाय समाजघटना होऊं शकणारच नाहीं. पण ही आमची चूक आहे. ज्यांना कोणत्याही प्रकारचे धर्माचार आणि राज्याचार बिलकुल ठाऊक नाहींत, असें या क्षणीं पृथ्वीच्या पाठीवर पुष्कळ रानटी लोक आहेत. पण हें मात्र खरें आहे कीं, ज्या समाजांत धर्मबंधनें व राज्यबंधनें दिसूं लागली आहेत, त्या समाजांस आचारबंधनें दिसत नाहींत, असें मात्र कधींहि होत नाहीं. 'यत्र यत्र धूम: तत्र तत्र वन्हि:' या न्यायाप्रमाणें जेथें धर्म व राज्य दृष्टीस पडतात, त्या ठिकाणी सामाजिक आचारपद्धति दृष्टीस पडलीच पाहिजे. परंतु ज्याप्रमाणें अग्नि असेल तेथें धूर असलाच पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं, त्याप्रमाणें सामाजिक आचारपद्धति स्थापित झाली असेल तेथें धर्म आणि राज्य या संस्था अस्तित्वांत आल्या असल्याच पाहिजेत असें म्हणतां येणार नाहीं. मुलाशिवाय आईबापें असतील, पण जनकजननीशिवाय संतानोत्पत्तीचा संभव नाहीं. धर्माचार आणि राज्याचार यांची सामान्य आचारांपासून उत्पत्ति होते, आणि ज्याप्रमाणें सृष्ट्यनुक्रमानुरोधानें प्राण्यांच्या जाती होत असतां, ज्यांच्या शरीरात पृष्ठवंशास्थि (पाठीचा कणा) अस्तित्वांत आणण्यासारखे पदार्थ असतात; त्यांस कसलीही रूपें येत गेलीं तरी, त्यांत पाठीचा कणा हा दृष्टीस पडावयाचाच, असें मासे, साप, पाखरें, गायी-म्हशी वगैरे प्राण्यांच्या शरीररचनेवरून स्पष्ट दिसतें, त्याप्रमाणें समाजास कोणत्याही प्रकारचीं स्थित्यंतरें प्राप्त झालीं तरी त्यांत सामाजिक आद्याचारांची छाया पडल्याशिवाय रहात नाहीं. या सामाजिक आचारांहून आद्यतर किंवा पुराणतर असा दुसरा कोणताही आचार नाहीं; व यांपासून उत्पन्न झालेले आचार कितीहि मंदावत किंवा क्षीण होत गेले तरी सामाजिक आचार नाहींसे होत जाण्याचा संभव नाहीं. उलट यांपासून निघालेल्या आचारांस क्षीणता येत जाईल तसतशी त्यांची वृद्धिच होत जाण्याचा संभव आहे; आणि आजपर्यंत असेंच होत आलें आहे. समाजास जसजशी उन्नतावस्था येत जाते, तसतशी त्यांतील धर्माचारांस आणि राज्याचारांस शिथिलता येत जाते, हें अनेक देशांच्या व समाजांच्या इतिहासांवरून सिद्ध करून देतां

येण्यासारखें आहे. पण कोणत्याही देशाच्या इतिहासावरून असें दाखवितां येणार नाहीं कीं, धर्माचार आणि राज्याचार शिथिल होत गेले म्हणून त्यांच्याबरोबर सामाजिक आचारांचीहि तीच वाट झाली. फार झालें तर येंवढेच दाखवितां येईल की, ज्ञानवृद्धीनें व ज्ञानप्रसारानें कोणत्याही समाजास उन्नतावस्था प्राप्त होऊन त्यांतील वेडेपणाच्या धर्माचारांचा व राज्याचारांचा लोप होत चालला, तर त्याबरोबर सामाजिक आचारांस सुस्वरूप येऊं लागतें व ते विशेष सभ्य आणि सुखावह असे होतात.

मनुष्यांची वन्यावस्था सुटत जाऊन त्यांची सुधारणा होऊ लागणें म्हणजेच त्यांमध्यें धर्म आणि राज्य या संस्थांची स्थापना होणें होय. या संस्थांची प्रथमावस्था केवळ आचारमय असते; म्हणजे मनुष्यांच्या आद्य धर्मपद्धतींत व राज्यपद्धतींत विवक्षित आचारांशिवाय दुसरें कांहीं नसतें. समाजांत जो पुरुष चातुर्यानें, धैर्यानें, व शरीरसामर्थ्यानें इतरांहून श्रेष्ठ असतो; तो प्रथम त्यांचा राजा होतो, आणि पुढें देव होतो, हें मागें एकदा सांगितेलच आहे. अशा रीतीनें राजत्वाप्रत व देवत्वाप्रत पावलेल्या व्यक्तीच्या हयातींत किंवा त्याच्या मरणोत्तर; त्याशीं वागण्याच्या ज्या पद्धति त्यास राज्याचार व धर्माचार म्हणतात. अनेक युगें जो राजा असतो तोच देव असतो; पण कालांतरानें राजेपणापासून देवपण वेगळें होतें, आणि राजपूजा व देवपूजा निराळया होतात. परंतु प्रथम राजत्व आणि देवत्व एकाच व्यक्तींत असल्यामुळें, तीं निराळीं झालीं तरी राजास आणि देवास भजण्याच्या पद्धति किंवा आचार एकसारखेच असतात. ज्याप्रमाणें राजाला राजवाडा त्याप्रमाणें देवाला देऊळ; राजाला वंदन त्याप्रमाणें देवाला वंदन; राजाला करभार द्यावयाचा, तसा देवाला करभार द्यावयाचा; शेतांतील उत्पन्नाचा पहिला भाग ज्याप्रमाणें राजपदीं अर्पण करावयाचा, त्याप्रमाणें तो देवपदीं अर्पण करावयाचा; राजाला चोपदार तसे देवाला चोपदार; राजाला पालखी तशी देवाला पालखी; राजाला मुकुट, दागिने, चौऱ्या, तसें देवालाही; राजाभोंवती मंत्रिगण तसा देवाभोंवतीं पूजकगण; ज्याप्रमाणें राजास स्तुतिपाठक असावयाचे, त्याप्रमाणे देवासही असावयाचे; ज्याप्रमाणें राजाच्या संतोषासाठीं बळी पडण्याची हौस त्याप्रमाणें देवाच्या संतोषासाठींही प्राणत्याग करण्याची हौस;- सारांश, पूर्वावस्थेंतील मनुष्यें राजा आणि देव यांच्यांत फारसा भेद समजत नाहींत, आणि म्हणून त्यासंबंधानें त्यांचें जें वर्तन असतें, त्यांतही फारसा भेद असत नाहीं. राजांच्या स्वाऱ्यांचा थाट आणि देवांचे छबिने यांत म्हणण्यासारखा भेद असत नाहीं.वाद्यें वाजताहेत, भाट गुण गाताहेत, लोक नमस्कार घालताहेत, बायका खिडक्यांतून लाह्या व रेवड्या फेंकताहेत- वगैरे प्रकार ज्याप्रमाणें राजाची स्वारी निघाली असतां होतात, त्याप्रमाणें

कोणत्याही देवाची पालखी निघाली असतां होतात; आणि हा प्रकार ज्याप्रमाणें या देशांत दृष्टीस पडतो, त्याप्रमाणें याच्याच तोडीचे जे जपान, चीन, तुर्कस्थान वगैरे देश आहेत त्यांतही दृष्टीस पडतो, आणि पूर्वी ग्रीस, इताली, स्पेन, फ्रान्स, जर्मनी, इंग्लंड वगैरे देशांतही दृष्टीस पडत असे. अर्थात् देशपरत्वें राजास आणि देवास पूज्यता दाखविण्याची ही पद्धति किंचित् निराळी असते व आहे, हें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. पण सर्वत्र तिचें तत्त्व एकच आहे. ज्याप्रमाणें देवाच्या देवळांत पाहिजे त्याला प्रवेश करण्याची परवानगी नाहीं, त्याप्रमाणें राजवाड्यांतही पाहिजे त्याचा प्रवेश होण्याचा संभव नाहीं. ज्याप्रमाणें देव गुरवाच्या ताब्यांत, त्याप्रमाणें राजा मंत्र्याच्या ताब्यांत. अद्यापि कित्येक ठिकाणीं कांहीं राजे आहेत; ते असे कीं, त्यांचें दर्शन लोकांस सहसा व्हावयाचें नाहीं. आमच्या इकडील पडदानशीन स्त्रियांप्रमाणें आफ्रिकेंतील कांहीं राजे पडद्याच्या आड बसून, किंवा जुन्या शिवालयाच्या गाभाऱ्यासारख्या एखाद्या अंधाऱ्या कोठडींत आपणास कोंडून घेऊन, तेथून भेटण्यास आलेल्या लोकांशीं मंदस्वरानें स्वत: किंवा दुभाषाच्या द्वारें थोडेंसे बोलतात! देवळांत गेलें असता देवास जी प्रार्थना करावयाची असेल, ती साष्टांग प्रणिपात केल्याशिवाय जशी करण्याची सोय नाहीं, त्याप्रमाणें पूर्वपद्धतीच्या राजास भेटण्यास गेलें असतां जमिनीपर्यंत लवून दहापांच मुजरे ठोकल्याशिवाय आणि गुडघें टेंकून तोंडाला पदर लावल्याशिवाय 'ब्र' काढण्याची सोय नाहीं! जीं जाड प्रकरणें असतात त्यांना मर्त्यांस स्वत: उत्तर देण्यांत कमीपणा वाटत असल्यामुळें, भेटणाऱ्यानें दुभाषाकडे तोंड करून बोलावें, त्यानें 'जी जी' करत 'सरकाराकडे' तोंड करून त्याचा प्रतिध्वनि उठवावा, आणि मग सरकारांनी तोंडांतल्या तोंडात कांहींतरी गुळमुळावें, आणि मग दुभाषेबोवांनीं त्यांतील धरवतील तेवढे शब्द व वाक्यें धरून तीं भेटीस आलेल्या गृहस्थांपुढे वठवावी! ही राजेपणाची ऐट आणि हा राजकीय आचारांचा थाट! याचेंच अनुकरण राजाच्या सरदारांनीं आपल्या खालच्या लोकांशीं, आणि त्यांनीं त्यांहून खालच्या लोकांशीं करावयाचें! तिकडे धर्मसंबंधानेंही तसाच प्रकार. जो कोणी धर्मगुरु किंवा शंकराचार्य किंवा परमहंस असेल तो एखाद्या देवतेचा काय तो दास; इतरांस तो साक्षात् देव. आणि अशी अधिकारपरंपरा पंचांगसांग्या गांवजोशापर्यंत किंवा श्राद्धभटापर्यंत असावयाची!

अशा प्रकारें राज्य आणि धर्म या संस्थांच्या पूर्वावस्थेंत आचारांस काय तें प्राधान्य असतें. जो त्याप्रमाणें वागेल तो राजनिष्ठ आणि धर्मनिष्ठ, आणि त्यावरच राजा आणि देव प्रसन्न! ज्याचें तदनुसार वर्तन नसेल त्यास जबर दंड! ज्यांनीं एकदोन पिढ्यांच्या मागील राजदरबारें पाहिली असतील, त्यांना वरील लेखांत

किती तथ्य आहे, हें दिसून येणार आहे. धर्मसंबंधी या प्रकारची यातायात; जे आमच्यासारखे पाश्चिमात्य शिक्षणानें बरेच निगरगट्ट झाले आहेत, त्यांना फारशी पीडा देत नाहीं; पण जे पहिल्या पद्धतीचे आहेत, त्यांचा श्रावणीसारख्या कवायतीपासून होणारा जाच अद्याप बिलकुल कमी झालेला नाहीं, व त्यांस तो 'जाच' असें वाटतही नाही! येथल्याप्रमाणेंच पूर्वी युरोपियन लोकांतही धर्माचारांची अशीच गर्दी व सक्ती असे; आणि आतांही आफ्रिकेंतील व अमेरिकेंतील कांहीं अर्धवट सुधारलेल्या लोकांत ती दृष्टीस पडते. हवाई बेटांत **टाबू** नांवाचा उत्सव कांहीं दिवस होत असतो. त्या प्रसंगीं पुढें लिहिल्याप्रमाणें व्यवस्था होत असते.

"हा उत्सव सुरू असतां या बेटांत किंवा त्याच्या आसमंतांतील प्रदेशांत कोठेंही चूल पेटविण्याची किंवा दिवा लावण्याची सक्त मनाई असते. तसेंच कोणीही पाण्यांत होडी घालतां कामा नये, किंवा स्नान करतां कामा नये, असा प्रतिबंध असतो. तसेंच ज्या मनुष्यास देवळांत जावयाचें असेल त्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही मनुष्यास आपल्या घराच्या दाराबाहेर पडण्याची मनाई असते. तसेंच कोठेंही कुत्रे भोंकतां कामा नये, की डुक्कर डुरकतां कामा नये, की कोंबडा आरवता कामा नये, असा प्रतिबंध असतो. याप्रसंगीं या बेटांतील लोक कुत्र्याचीं आणि डुकरांची तोंडें बांधतात, आणि कोंबडी वगैरे घरगुती पाखरें भोंपळयांच्या वाळलेल्या छकलांखालीं कोंडून घालतात, किंवा फडक्यांनी त्यांचें डोळे बांधतात."

हे एक रानटी लोकांच्या धर्माचाराचें उदाहरण झालें. सुधारलेल्या युरोपखंडांतही थोड्या वर्षांपूर्वीं अशीच स्थिति होती. **सेंट कोलंबेनस** याची आज्ञा अशी आहे कीं, "जो कोणी मंतरलेला पाव गमावील त्याला एक वर्षांचें प्रायश्चित्त; जो त्यास डोंगळा किंवा मुंगी लागू देईल त्याला सहा महिन्यांचें; जो त्यास लाल होऊं देईल त्याला वीस दिवसांचें; जो त्याला अवमानानें पाण्यांत झुगारून देईल त्याला चाळीस दिवसांचें; कोठ्याच्या हलकेपणामुळें ज्याकडून तो ओकून पडेल त्याला वीस दिवसांचें; पण जर आजारीपणामुळें तो वर येईल तर फक्त दहा दिवसांचें. तसेंच जो कोणी आशीर्वचन होत असतां 'तथास्तु' म्हणण्यास चुकेल, किंवा जो जेवताना बोलेल, किंवा जो चमच्यावर अथवा धाकट्या भावानें लावलेल्या कंदिलावर (ख्रिस्ताचा) **क्रूस** काढण्यास विसरेल त्याला सहा फटके दिले पाहिजेत."

हा पाश्चिमात्य धर्माचार आणि ही त्याच्या उल्लंघनास सांगितलेली शिक्षा-यांचा विचार करतां, आमच्या येथें जीं शेंकडों व्रतें अस्तित्वांत आलीं आहेत, व ज्यांच्या भंगाबद्दल नानाप्रकारचीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत, तीं पाहून त्यांविषयीं

आपणास वाटत असलेला तिरस्कार किंचित् कमी होईल, यांत कांहीं संशय नाहीं. निरनिराळ्या देशांतील व निरनिराळ्या स्थितींतील लोकांच्या सामाजिक, धार्मिक, व राजकीय आचारांविषयी माहिती मिळवून त्यांचा शांतपणे विचार केला असतां त्याच्यायोगानें आपल्या मनावर दोन प्रकारचे परिणाम होतात. एक, आपली अशी खात्री होऊन जातें कीं, सामान्यपणें कोणतेही लोक घेतले तरी त्यांना विवक्षित स्थिति प्राप्त झाली असतां त्यांच्या राजकीय, धार्मिक आणि सामाजिक कल्पना व आचार साधारणपणें सारख्या तऱ्हेचे असतात; दुसरें, जसजशीं त्यांची सुधारणा होत जाते, तसतसा त्या कल्पनांत व आचारांत पालट होत जाऊन त्यांस विशुद्धत्व येत जातें. हें अवस्थांतर होण्यास ज्ञानवृद्धि व ज्ञानप्रसार कारण होतात. ज्यांना दुर्दैवानें सुशिक्षण मिळालें नसल्यामुळें अशा गोष्टींविषयीं शांतपणें विचार करण्याची सवय लागलेली नाहीं, व कोणत्या स्थितीपुढें कोणती स्थिती येते हें समजलेलें नाहीं, अशांनी असलेली स्थिती अत्युत्तम मानून वरिष्ठ स्थितींचे ज्ञान करून देणाऱ्याचा उपहास करावा, हें अगदीं स्वाभाविक आहे. पण ज्याच्या मनावर सुविद्येचा चांगला परिणाम झाला असेल तो अशा अप्रबुद्धांनीं केलेल्या दुःशब्दांच्या पुष्पवृष्टीबद्दल त्यांचा राग न करता उलट त्याविषयीं अनुकंपा किंवा कींवच प्रदर्शित करील. "सोंवळ्या ओंवळ्याची मीमांसा" किंवा "देवतोत्पत्ति" अशा विषयावरील आमच्या लेखांसारखे लेख वाचून पूर्वपद्धतीच्या सामान्य वाचकांचें पित्त खवळून जात असेल; याविषयीं आम्हांस तिलप्राय शंका नाहीं. पण या गोष्टीस आमचा इलाज नाहीं. पण हितावह परंतु कडू न लागणारें असें भाषण नेहमी करणें केवळ दुरापास्त आहे. ज्याला आसमंतांतील स्थिति वाईट वाटत असेल, व ती बरी व्हावी अशी इच्छा असेल त्याचें, ती वाईट म्हटल्याखेरीज व तींतील चुका दाखविल्याखेरीज, कसें चालेल? यावर कित्येक असा आक्षेप घेतात कीं, अशिक्षित लोकांपुढें अशा प्रकारचा बुद्धिवाद मांडल्यानें त्यांच्या बुद्धीस भ्रंश होऊन "इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः" अशी त्यांची स्थिति होते, आणि तीमुळें समाजांत अनवस्था उत्पन्न होऊन त्याचें फार नुकसान होतें. आमच्या मतें या आक्षेपांत बराच अर्थ आहे. पण तेवढ्यावरून तो निरुत्तर आहे असें मात्र म्हणतां येणार नाहीं. एक तर हें ध्यानात ठेविलें पाहिजे कीं, एक स्थिति जाऊन दुसरी स्थिति येण्यापूर्वी जो काळ जातो, त्यांत विशेष अव्यवस्था दृष्टीस पडणें हे साहजिक आहे. तसेंच हेंही लक्षांत वागविलें पाहिजे कीं, बुद्धीस बरे दिसण्यासारखे विचार पुढें आल्याबरोबर मनुष्य एका क्षणांत आपलें फार दिवस चालत आलेलें वर्तन टाकून देऊन त्या विचारांप्रमाणें नवीन वर्तन एकदम करूं लागला, असें बहुशः घडत नाहीं. अशा गोष्टींत लिहिणारांनीं लिहावें आणि

वाचणारांनी वाचावें, असें कांहीं वेळ झाल्यावर प्रथम लिहिणारांच्या वर्तनांत थोडाबहुत फेरफार होऊं लागतो, व त्यांचें उदाहरण वारंवार डोळ्यापुढें येऊ लागले म्हणजे वाचणारांच्या मनांतही, खात्री झाली असल्यास, लिहिणारांचे अनुकरण करावें असें येऊ लागतें. सारांश, समाजाची सुधारणा मुंगीच्या पायानें होत असते. म्हणून या पत्रासारख्या पत्रांत येणारे असामान्य विचार नवीन मंडळीच्या हातांत पडल्याबरोबर; ती आपले फार दिवसांपासून चालत आलेले धर्माचार, राज्याचार, किंवा सामाजिक आचार एकदम टाकील, अशी भीति क्षणभरसुद्धां बाळगण्याची गरज नाहीं. असें होण्याचा संभव असेल तर आम्हांस त्यापासून फार आनंद होणार आहे. पण तसें मुळींच नाहीं. तथापि कर्तव्य तें केलेंच पाहिजे असें समजून हा व्यवसाय आरंभिला आहे, आणि म्हणून, कोणास कांहीं वाटलें, तरी अशा विषयाविषयीं जें सत्य व योग्य दिसेल तें लिहिणें भाग आहे.

✷

# विजयलांछनें

मनुष्याच्या उपजत मनोवृत्तींपैकीं सामर्थ्यप्रदर्शनाची हौस ही एक असावी असें वाटतें. बहुश: जगाच्या आरंभापासून पुरुष स्त्रियांपुढें, विद्वान अविद्वानांपुढें, धनवान, निर्धनांपुढें; स्वतंत्र परतंत्रांपुढें, प्रबुद्ध अप्रबुद्धांपुढे, जेते जितांपुढें, व शास्ते शासितांपुढें आपल्या सामर्थ्याची प्रतिष्ठा मिरवून तीपासून आनंद करून घेत आहेत. प्राणिमात्रास, व विशेषत: मनुष्यास दुसऱ्यावर सत्ता, अधिकार किंवा अंमल गाजविण्यांत इतका आनंद कां होतो, याची मीमांसा येथें करीत बसण्याचें प्रयोजन नाहीं. सर्व स्थितींत व सर्व वर्गांत ही मनोवृत्ति दृष्टीस पडते, येवढ्यावरून ती जन्मागत आहे, असें येथें घेऊन चालण्यास हरकत नाहीं. या एका वृत्तीमुळें मनुष्यसमाजांत अनेक आचार अस्तित्वांत आले आहेत. आज ज्या आचारांचा विशेष ऊहापोह करावयाचा आहे, ते याच वृत्तीपासून उत्पन्न झाले आहेत.

ज्याच्या अंगांत विशेष रग असते त्याला आपल्या शत्रूचा पराभव केल्यापासून तात्कालिक समाधान तर होतेंच, पण त्याच विजयाची कांहीं खूण जवळ बाळगून तिजकडे पुन:पुन: पहाण्यापासून, किंवा ती आपल्या आप्तास किंवा मित्रास दाखविण्यापासूनही पुष्कळ समाधान होतें. इंग्लंडसारख्या बेटांतील धीवरांनीं फार कष्टानें एखादा प्रचंड किंवा असामान्य मासा पकडला असतां, तो ते विकून न टाकतां बाळगून ठेवतात, आणि अभिमानपूर्वक तो इतरांस दाखवितात. परराज्यामुळें, रानें फस्त झाल्यामुळें, हत्याराच्या प्रतिबंधक कायद्यामुळें, आणि कदाचित् भूतदयेच्या प्रसारामुळें लोकांचा मृगयेचा नाद अगदीं सुटल्यासारखा झाला आहे, व-

**मिथ्यैव व्यसनं वदंति मृगयां ईदृग् विनोद: कुत:।**

अशा प्रकारें पारधीची तारीफ करणारे राजे, सरदार, किंवा सामान्य लोक येथें अगदींच दिसेनासे झाले आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. इंग्लंडसारख्या देशांत या विनोदाचा नाद अद्यापि अनेकांच्या ठाई दृष्टीस पडतो. मृगया करून जी लूट कमाविली असेल, तिच्यापैकीं टिकण्यासारखा भाग आपल्या बसण्याउठण्याचा खोलींत प्रमुख स्थलीं मांडून ठेवण्याची चाल साहेब लोकांत आहे, हे ज्यांनीं शिकारी साहेबाच्या बंगल्यांत एक दोन वेळां प्रवेश केला असेल

त्यांच्या नजरेस आलेंच असेल. खुर्च्यांवर व बैठकीवर हरणांचीं मोठमोठीं कांतडी टांगलेलीं असतात, व कोठें कोठें शृंगविस्तारामुळें भव्य दिसणारी काळविटांचीं शिरें पेंढा भरून भिंतीवर किंवा दारावर अडकवलेली असतात. त्यांतल्या त्यांत ज्याला वाघाच्या किंवा अस्वलाच्या शिकारीचा नाद असेल त्याला वाघांची आणि अस्वलांची कांतडी ठिकठिकाणीं पसरून ठेवण्यांत मोठा पुरुषार्थ वाटतो.

अशा प्रकारें मृगयेंत संपादिलेल्या विजयाची लांछनें वापरण्याचा नाद सुधारलेल्या लोकांसच असतो असें नाहीं. रानटी लोकांस तर हा नाद सुधारलेल्या लोकांहूनही अधिक असतो. त्या लोकांत ज्यापाशीं अस्थिसंग्रह किंवा चर्मसंग्रह असतो तो विशेष शूर गणला जातो, आणि इतरांस त्याच्या पराक्रमाचा धाक वाटतो. यामुळें अशा लोकांच्या झोंपड्यांत जिकडे तिकडें हाडांची व कातड्यांची एकच गर्दी झालेली असते. आपण ज्याप्रमाणें कडीपाटास हांड्याझुंबरे लटकवून देतों, त्याप्रमाणें हे लोक आडव्या तुळवटास किंवा वाशांस मोठमोठ्या वाघांचे आणि अस्वलांचे सांगाडे व कांतडीं अडकवून ठेवितात! कित्येक रानटी लोकांच्या सरदारांची संपत्ति व भूषणें केवळ असल्या जनावरांच्या शिरांची व हाडांची झालेली असते. ही संपत्ति व भूषणें बापाकडून मुलास येतात, व त्यांचा त्याला मोठा अभिमान वाटतो. शोशून लोकांतील योद्धाच्या अंगावर अस्वलाचे पंजे आणि पाय दृष्टीस पडतात! फक्त राजाच्याच आढ्यावर सिंहाचें अथवा चित्त्यांचें शेंपूट लोंबत असावें, असा **कोसास** लोकांत प्रतिबंध आहे!

याप्रमाणें भक्ष्य किंवा हिंस्र पशूंवर आपला किती अंमल चालतो हें दाखविण्यासाठीं सुधारलेले आणि रानटी लोक काय करतात, हें वर सांगितलें. पण हें सर्व प्रस्तावनारूप आहे. मनुष्यांच्या अन्योन्य व्यवहारांत कशा प्रकारचे आचार पडत जातात, हें या निबंधांत दाखविण्याचा मुख्य उद्देश आहे. तो उद्देश चांगल्या रीतीनें सिद्धीस जाण्यासाठीं, म्हणजे पुढें जें सांगावयाचें आहे तें वाचकांच्या मनांत बरोबर रीतीनें उतरून देण्यासाठीं अशी प्रस्तावना केली आहे. रानटी, अर्धवट सुधारलेल्या व पूर्ण सुधारलेल्या लोकांचें हिंस्र पशूंशीं ज्या प्रकारचें वर्तन होत असतें, त्याच प्रकारचें वर्तन आपापसांतही होत असतें. रानटी लोकांतील एखादा वीर युद्धाला गेला आणि त्यानें परत येतांना आपल्याबरोबर कांहीं विजयचिन्ह आणिलें नाहीं, तर त्यास विजयशाली कोण म्हणणार व त्याला कोण वचकणार? तेव्हां अशा लोकांतील जे योद्धे कांहीं पराक्रम करून येतात ते त्या पराक्रमाची कांहीं तरी पक्की खूण आणण्यास कधींही चुकत नाहींत! लढाईत जिंकलेल्या शत्रूकडील बायका, पुरुष व मुलें यांस कैद करून आणण्याचा फार जुना प्रघात आहे. ज्या रानटी लोकांत नरमांससेवनाचा प्रकार चालू असतो

त्यांस अशा रीतीनें आणिलेली लूट नासूं न देतां उरवून पुरवून बरेच दिवस चरितार्थाकडे लावितां येते. पण अशा प्रकारची लूट संभाळणें फार कठीण असते. एक तर कैद केलेले इसम स्वजीवितरक्षणासाठी तुटून पडतील अशी भीति असते. शिवाय कैद्यांच्या मोठ्या समुदायांचे संरक्षण करण्यासही मोठी पंचाईत पडते. अशा अनेक अडचणींमुळें अनेक कैदी पकडून आणिलेच, तर त्यांपैकीं जेवढ्या बायका व पोरं हवीं असतील तेवढ्यांशिवाय बाकीच्यांस मारून टाकण्याचा प्रघात असतो. जुने ग्रीक लोक असेंच करीत असत. सध्यांचे सर्व ठिकाणचे रानटी लोक असेच करतात. तैमूरलंगादि ज्या दुष्ट पराक्रमी लोकांनीं हिंदुस्थानावर व युरोपावर अनेक स्वाऱ्या करून लाखों लोक गुलाम केले; त्यांची त्यांनीं अशीच वाट लाविली! शत्रूच्या अंत:करणांत दहशत उत्पन्न करण्याचा व स्वजातीपुढें शौर्याची प्रतिष्ठा मिरविण्याचा हा अगदी जुना व रानटी प्रकार होय. याच्या खालोखाल युद्धांत जिंकलेल्या शत्रूच्या शरीराचे कांहीं भाग कांपून काढून त्यांचे प्रदर्शन करावयाचें हा दुसरा प्रकार. हा अद्यापि बऱ्याच ठिकाणीं दृष्टीस पडतो; व आमच्या राज्याचारांवर व धर्मचारांवर याचा बराच ठिकाणी परिणाम झाला आहे. मनुष्याच्या अनेक अवयवांत डोक्यास जें मुख्यांगत्व आलें आहे तें अत्यंत स्वाभाविक आहे, हें कोणासही समजणार आहे. प्रतिपक्ष्यांचे शीर कापून आणण्याहून त्याचा पराभव केल्याचा दुसरा सबल पुरावा तो काय देतां येणार? एक डोकें आणिल्यानें शत्रू जिवंत राहिला नाहीं, जो मारावयाचा तोच मारला आहे, अशी त्यापासून अनेक प्रमाणें मिळून हंत्याच्या विजयशालित्वाबद्दल आप्तांची, मित्रांची आणि न जिंकलेल्या शत्रूंची पूर्ण खात्री होऊन जाते. अशा प्रकारें कांपून आणिलेलीं शिरें काठ्यांवर घालून रानटी लोक मोठ्या आनंदानें नाचत सुटतात! त्यांच्या राजाच्या खोपटांपुढें वेळू पुरून त्यांवर असली डोकीं बसवून दिलेलीं असतात. **डहोमन** लोकांच्या राजाच्या घरांतील भिंतींत विटांच्या व तोडींच्या जागीं शत्रूंचीं शिरकमलें बसवून दिलेलीं असतात, आणि कधीं कधीं याच कमलांची फरशीही केलेली असते! खुंट्यांच्या जागीं हातांची व पायांचीं हाडें बसविलेलीं असतात! अशा रीतीनें शत्रूंच्या शिरकमलांवर नित्यश: पादसंचार करणाऱ्या राजास त्याची प्रजा पराकाष्ठेची भीत असेल व त्याचे शत्रू त्यापुढें थरथरा कांपत असतील, हें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. राजा स्वत: युद्धास न निघतां त्यानें तें काम आपल्या वजिराकडे किंवा दुसऱ्या कोणाकडे सोंपविले असलें तर त्या प्रतिनिधीस राजाची मर्जी आपणावर सुप्रसन्न करून घेण्यासाठीं जितकीं डोकीं मिळतील तितकीं मिळवून तीं राजपदी आणून अर्पण करावी अशी महत्त्वाकांक्षा सहज उत्पन्न होते, आणि तदनुसार त्यांचे वर्तन होतें. रानटी लोकांच्या राजाप्रमाणें

त्यांच्या देवताही रुधिरप्रिय असल्यामुळें, राजाप्रमाणें देवतांसही शत्रुशिरकमलें वाहण्याचा प्रघात पडतो; व अशा रीतीनें ज्या आचारांचा उद्गम प्रथम केवळ सामाजिक व्यवहारांत होतो त्यांचा अंमल पुढें राज्याचारांवर व धर्माचारांवर होऊं लागतो. असों! जिंकलेल्या शत्रुंस जिवत धरून नेण्यापेक्षां त्यांचीं शिरे कापून नेणें विशेष सोईचें असल्यामुळें तसें करण्याचा प्रघात लौकरच पडतो. पण पुढें तोही गैरसोईचा वाटूं लागतो. मनुष्याच्या साऱ्या अवयवांत डोकें फार जड; तशांत त्यावर बराच केशभार असला आणि त्यांतून रक्त गळत असलें म्हणजे तें घेऊन जाणें मोठें त्रासदायक आहे. म्हणून हळूं हळूं सगळीं डोकीं न नेतां दांत व दाढा उपटून काढून त्या नेण्याचा प्रघात पडतो. पुढें तोही बरासा न वाटून कान व नाकें कापण्याची चाल पडते. तैमूरलंगानें बगदाद आणि आलेपो येथें आपल्या शत्रूंच्या शिरांच्या पिरमिदी आणि कोट बांधले होते! झांझिखान पोलंडावर चालून गेला तेव्हां त्यापाशीं लाखों शिरें वाहून नेण्यापुरतीं जनावरें नसल्यामुळें त्यानें पोलिश लोकांच्या उजव्या कानांचीं नऊ पोतीं भरून घेतलीं, आणि त्यांसह स्वदेशास प्रयाण केलें! आफ्रिकेंतील कांहीं राजांस शत्रूंची नाकें फार प्रिय असल्यामुळें त्यांचे लढाऊ सरदार नाकांनीं भरलेलीं ताटेंच्या ताटें त्यास नजर करतात! तथापि कान, नाकें वगैरे कुजणारे भाग असल्यामुळें कित्येक रानटी लोक फक्त दांतच घेऊन जातात, आणि त्यांच्या माळा करून ठेवतात. समारंभाचे वेळी आणि सणाचे दिवशीं त्यांच्या बायका असल्या दातांचे दागिनें मोठ्या प्रेमानें वापरतात! डोकीं, दाढा, दांत, कान, नाकें यांशिवाय शरीराचे दुसरे भागही कांपून नेण्याचा प्रघात आहे. कांहीं रानटी लोक काळजें काढून घेतात; कांहीं उजवे किंवा डावे हात कांपतात; कांहींस मांसल असे कटिपश्चाद्भाग फार आवडतात; कांहींस तोंडाची कांतडीं व कांहींस सगळ्या शरीराची संबंध कांतडीं सोलून घेणें बरें वाटतें! तीं सहज निघून यावीं म्हणून ते जिवंत शत्रूंस वांग्याप्रमाणें निखाऱ्यांत बेतानें भाजून मग सोलतात! आणि अशा रीतीनें सोडविलेलें अखंड चोगे वापरण्यांत व त्यांसह राजास व मित्रास भेटण्यास जाण्यांत त्यांस मोठी प्रतिष्ठा वाटते! याप्रमाणें शरीरांतील बहुतेक सारे भाग व अवयव विजयलांछनें होऊं शकतात व होतात, हें वाचकांच्या ध्यानांत येईल. एक मात्र भाग अद्यापि सांगितला नाहीं, पण मनुष्याची क्रूरता कोणत्या थरास जाते, हें त्यांस समजावें म्हणून तोही विजयलांछन करण्यांत येतो, हें येथें सांगणें जरूर आहे. इतर अवयवांप्रमाणें हा गोपनीय अवयवही कांपण्याचा आणि सोलण्याचा प्रघात मागें युरोपांत व आशियांत रूढ होता, आणि प्रस्तुतकालीं आफ्रिकेंतील व अमेरिकेंतील काही रानटी लोकांत रूढ आहे. हाच आचार अन्यरूपानें एका मोठ्या सुधारलेल्या लोकांत अद्यापि रूढ

आहे, हें पुढील एका निबंधांत विशेष स्पष्ट होणार आहे.

राज्याचार व धर्माचार सामाजिक आचारांपासून उत्पन्न होत असल्यामुळें समाजाच्या प्रथमावस्थेंतील धर्म आणि राज्य यांचें स्वरूपही वर निर्दिष्ट केलेल्या रानटी सामाजिक आचारांच्या स्वरूपासारखेंच असतें. सध्यां आपणांस गुलाम, गुन्हेगार, आणि शत्रू यांतील भेद नीट समजतो, व एकाच्या जागी दुसरा समजणें अशक्य वाटतें. पण रानटी लोकांस अशा प्रकारचें वस्त्वंतर समजत नाहीं. ज्याच्याकडून त्यांना कांहीं अप्रिय घडेल अशी भीति असते; त्यास ते शत्रू किंवा गुन्हेगार समजून त्याचा पराभव करण्यास व त्याला गुलाम करण्यास उद्युक्त असतात. साक्षात् पोटच्या पोरांपासून त्यांस त्रास होऊं लागला, तर त्यांना मारून टाकण्याची त्यांस शंका वाटत नाहीं. मग इतरांची कथा काय? अशा स्थितींतील राजेही सामान्य मनुष्याप्रमाणेंच क्रूर असतात, व ज्याप्रमाणें सामान्य व्यक्ति आपल्या सामर्थ्याचा दुसऱ्यास वचक राहण्यासाठीं वर सांगितल्यासारखें निर्दयपणाचें वर्तन करण्यास प्रवृत्त होतात, त्याप्रमाणें राजेही आपल्या प्रजेस व आपल्या शत्रूस आपली दहशत पडण्यासाठीं अशाच प्रकारचें क्रूर वर्तन करतात. लढाईंत जिंकलेल्या लोकांचीं डोकीं उडविणें, हातपाय तोडणें, त्यांना मिरच्यांच्या धुऱ्या देणें, लिदींत पुरणें, तापल्या तोफांवर बांधणें, कडेलोट करणें, हत्तीच्या पायाखाली देणें, त्यांचीं नाकें व कान कापणें, आणि त्यांच्या घशांत शिसें तापवून ओतणें- हे निर्दयपणाचे प्रकार लढाईंत कैद केलेल्या शत्रूकडील लोकांचा छळ करण्याकरतां जसें योजण्यांत येतात, त्याप्रमाणें प्रजेपैकींही कोणी मनुष्यानें अपमान केला, हुकूम तोडला, किंवा बंडाचा घाट घातला तर त्याला शिक्षा करण्यांतही योजण्यांत येतात. राजापराधाकरतां सुळावर चढविणें, जेथें खून केला असेल तेथें सर्व लोकांसमक्ष फांशीं देणें, भर चवाट्यावर फटके मारणें- हे सर्व सध्याही कित्येक ठिकाणी अंमलांत असलेल्या शिक्षेचे प्रकार सरकारच्या सामर्थ्याची दहशत लोकांस असावी, येवढ्यासाठींच आहेत. राजा सिंहासनरूढ होतो, म्हणजे तो मनुष्यांचा स्वामी होतो. येवढेंच नाहीं; तर सिंहासारख्या बलवान हिंस्र पशूसही जिंकून त्याच्या पाठीवर बसतो, असा या शब्दांत गर्भितार्थ आहे. सारांश काय कीं, अर्धवट सुधारलेल्या स्थितींत सामाजिक आचार जितके क्रूर असतात, तितकेच राज्याचारही क्रूर असतात, असें सहज सिद्ध करून देतां येतें; कारण दुसरे पहिल्यापासूनच निघालेले असतात. ज्यांना हे विचार आपल्या समाजाच्या संबंधानें किती खरे आहेत हें पहावयाचे असेल, त्यांनी महाभारतांतील कांहीं गोष्टी वाचून त्यांचें आपल्या मनाशीं शांतपणें चिंतन करावें. दुःशासनाच्या नरडीचा घोंट घेऊन त्याच्या विदारलेल्या वक्षःस्थलापासून निघणाऱ्या रुधिरांत भिजविलेल्या हातानें

द्रौपदीची वेणी घालण्याचा भीमानें केलेला पण आमच्या वाचकांच्या ध्यानांत असेलच! कदाचित् रा. ब. नि. ज. कीर्तने यासारखे हिंदूधर्माचे आणि पुराणांचे मंडनकर्ते असें म्हणतील कीं, ही गोष्ट रूपकात्मक आहे व तिचा गूढार्थ आध्यात्मिक असून तो सामान्य जनांस कळण्यासारखा नाहीं! अशाच रीतीनें वेदांचे अपौरुषत्व आणि गूढार्थत्व बरीच शतकें रूढ होऊन बसलें आहे! पण पश्चिमेकडून ज्ञानरवि या भारतखंडावर प्रकाशूं लागल्यापासून 'वेदार्थयत्न' होऊ लागले आहेत इतकेंच नाहीं, तर त्यांचें पौरुषत्व स्थापण्याचा विडाही कित्येकांनी उचलला आहे, ही अत्यंत अभिनंदनीय स्थिती आहे.

मनुष्यांच्या प्रथमावस्थेंत सामाजिक व राजकीय आचार क्रूर असतात त्याप्रमाणें धर्माचारही क्रूर असतात, हें दाखविण्यासाठी येथें विशेष खल करीत बसण्याची गरज नाही. कारण आमचीं पुराणें, आमचीं मूर्तिपूजा, आमचे प्रेतादिकांचें संस्कार आणि आमच्यापैकीं कनिष्ठ वर्गांत सुरू असलेली विलक्षण पाषाणपूजा यांचा क्षणभर विचार केला, तर असें दिसून येईल की, आमच्या देवतांच्या कल्पना मेलेल्या पूर्वजांपासून म्हणजे त्यांच्या पिशाचांपासून निघाल्या असल्यामुळे ज्या उपायांनी व कृतींनी रानटी व अर्धवट सुधारलेली माणसें आनंद पावतात, त्याच उपायांनी व कृतींनीं देवताही आनंद पावत असतील, असा आमचा भरंवसा ठरून गेल्यामुळें आमच्यांतील अज्ञ लोकांचा पूजाविधि अत्यंत उपहासास्पद झाला आहे! सांबासारख्या किंवा महिषासुरमथनीसारख्या देवतेचें रूपवर्णनच लक्षांत आणा म्हणजे आमच्या लिहिण्याचा अर्धा प्रत्यय येईल. हत्तीचें ओलें कांतडें पांघरून पिशाचगणासह नर्तन करणाऱ्या ''पंचतुंड नररुंडमालधर अशा पार्वतीशास' आम्ही नमन करणार! मग काय विचारतां? अशा भयंकर देवाची पूजाही भयंकरच असली पाहिजे! सांब हा थेट पिशाचवर्गांतून देववर्गांत आला असल्यामुळें त्याचें रूप आणि त्याची पूजाही पिशाचांचें रूप आणि पूजा यांसारखी झाली आहेत; व आमच्या पिशाचांच्या स्वरूपाच्या आणि त्यांच्या स्थितीच्या कल्पना आमच्या श्राद्धविधींत आणि गरूडपुराणांत पूर्णपणें नमूद झालेल्या आहेत! उत्कुंभ, शय्यादान, गोप्रदान, लोहदान, कार्पासदान- या सर्वांवरून काय व्यक्त होतें कीं, शरीरास या लोकीं ज्या अडचणी येतात त्याच मरणोत्तर आत्म्यास पिशाचयोनींत येतात, असें आमचे लोक मानतात! व अशाच प्रकारच्या पिशाचापासून देवतोत्पत्ति झाली असल्यामुळें, त्यांचीं स्वरूपें आणि स्वभावही तत्तुल्य मानिलीं आहेत, आणि म्हणून त्यांच्या पूजाही तत्समान झाल्या आहेत यांत नवल तें कोणतें?

✷

# व्यवच्छेदन

आपण संपादिलेली विजयश्री गाजविण्यासाठीं रानटी व अर्धवट रानटी लोक जिंकलेल्या शत्रूंस ठार न मारल्यास त्यांच्या शरीरांचे कांहीं भाग कांपून घेऊन त्यांचा संग्रह करतात, हें वरील लेखांत सांगितलें. आतां याच आचारापासून उत्पन्न झालेल्या व्यवच्छेदनाच्या आचाराविषयीं दोन शब्द लिहावयाचें आहेत.

**व्यवच्छेदन** म्हणजे कापणें. जोंपर्यंत जिंकलेल्या लोकांच्या जिवाची पर्वा नसते, तोंपर्यंत हा अस्तित्वांत येत नाहीं. डोक्याची नरटी काढणें, जबडा उपसणें, कांतडें सोलणें, काळीज सोडविणें वगैरे विजय मिरविण्याच्या पद्धति अत्यंत क्रूरपणाच्या आहेत, आणि त्या जेथें रूढ असतात, तेथें मनुष्याचा जीव घेणें ही वाईट गोष्ट आहे, असें कोणाच्या स्वप्नांत सुद्धां येत नसतें. पण पुढें आपापसांत युद्धें होतां होतां उभय पक्षांस असें दिसून येतें कीं, जिंकलेल्या शत्रूकडील लोकांस मारून टाकण्यापेक्षां गुलाम करणें बरें. त्यांस गुलाम करण्यानें त्यांच्याकडून निरंतर सेवा करून घेतां येईल. त्यांच्या वृत्तींत हा बदल होण्यास दोन कारणें होतात. सामान्य लोकांस असें वाटण्याचा संभव आहे कीं, रानटी लोक मोठे उद्योगी असतील. पण ही त्यांची चूक आहे. रानटी लोक पराकाष्ठेचे आळशी असतात. ज्याप्रमाणें सिंहव्याघ्रादि हिंस्र पशु भुकेनें कळवळूं लागल्याशिवाय आपल्या गुहा सोडून भक्ष्याच्या शोधासाठीं बाहेर पडत नाहींत, त्याप्रमाणें रानटी लोक चरितार्थास कांहीं नसलें तरच हातपाय हालविण्यास तयार होतात. भूक लागली म्हणजे हवें तें मारून ती भागवावी, आणि ती भागली म्हणजे पडून रहावें, अशी त्यांना खोड असते. तेव्हां भूक भागविण्यास लागणारे पदार्थ कोणी आयतेच आणून देईल तर त्यांस ते मनापासून पाहिजे असतात. लढाईंत पकडलेल्या लोकांस न मारतां गुलाम करून ठेविलें, आणि त्यांच्याकडून पारध करवून तिच्यावर चरितार्थ करतां आला, तर त्यांस तबियत लागेल तेव्हां मात्र थोडासा उद्योग करून बाकीच्या वेळांत विश्रांति घेण्यास सापडते. याच सुमारास गुरें पाळून त्यांच्या दूधदुभत्यावर किंवा शेतकी करून धान्यावर उपजीविका करण्याची कला समजून आली, तर लढाईतल्या कैद्यांस मारण्यापेक्षा त्यांना गुलाम करून ठेवण्याची इच्छा होण्यास विशेष कारण होते. एक धनगर जितकीं गुरे पाळूं शकतो तितक्या गुरांपासून

त्याचा निर्वाह होऊन शिवाय आणखीही पुष्कळांचा होण्यासारखा असतो. शेतकऱ्याचे श्रम याहीपेक्षां विशेष फायदेशीर असतात. यामुळें काय होतें कीं, रानटी लोकांस धनगरावस्था व कृषीवलावस्था प्राप्त झाल्या असतां, त्यांस माणसें मारण्याचा कंटाळा येऊं लागून त्यांना आपलें गुलाम करून ठेवणेंच अधिकाधिक प्रिय वाटूं लागतें. अशा स्थितींत समाजांतील व्यक्तींचे दोन स्थूल विभाग होतात. एक चाकरांचा किंवा गुलामांचा; आणि दुसरा स्वामींचा किंवा धन्यांचा. पहिल्या वर्गांत बायकांचाहीं समावेश केला पाहिजे. घरच्या मालकानें लढण्याचें काम करावें, आणि बायकांनीं घरचीं कामें करावीं अशा प्रकारचा श्रमविभाग उत्पन्न होतो, आणि त्यांपासून मिळूं लागलेलीं सुखें अधिकाधिक ग्राह्य वाटूं लागून ज्यांस गुलाम केलें असतें; त्यांस चांगल्या रीतीनें वागविण्याची सहज प्रवृत्ति होते. डोळे काढलेले, हात तोडलेले, लंगडे केलेले अनेक गुलाम पदरीं असून काय फायदा? गुलाम केलेल्या प्रत्येक इसमापासून जितका फायदा करून घेतां येईल तितका करून घेतां आला पाहिजे. काम करण्याचे अवयव तोडून टाकल्यास त्यांच्यापासून फायदा कसा होणार? तेव्हां तसें करणें बरोबर नाहीं. पण ते जिंकलेले लोक आहेत, असा कांहीं तरी शिक्का त्यांच्या अंगावर नेहमीं दिसत असला पाहिजे, त्याखेरीज आपण विजयशाली आहों असें आपल्या मित्रांस किंवा शत्रूंस कसें कळले, व त्यांवर आपला वचक कसा राहील? चिंता नाहीं; पण तसें होण्यास गुलामास ठार मारलेंच पाहिजे असें नाहीं. ते लढाईंत जिंकलेले लोक आहेत असें दाखविणारी एखादी कायमची निशाणी त्यांच्या अंगावर करून ठेविली म्हणजे झालें. अशा विचारांनी **विजयलांच्छनास्तव** डोकीं उतरण्याचा, हातपाय तोडण्याचा, सबंध कांतडें सोलण्याचा- सारांश ज्या गोष्टीमुळें तत्क्षणीं जीव जाईल, किंवा स्थाईक लुळेपण अंगी जडेल, अशा प्रकारचा देहदंड करण्याचा प्रघात मागें पडून कोठें पायाचा आंगठा उतरणें, कोठें हाताची करंगळी तोडणें, कोठें शेंडी काढणें, कोठें सुंता करणें असे आचार पडतात. आणि अशा प्रकारचे सामाजिक आचार एकदां रूढ झाले म्हणजे राज्याचारांस व धर्माचारांसही त्यांचें वळण लागतें.

पूर्वी युरोपांत व इतर खंडांत एका गृहस्थास आपली जमीन दुसऱ्यास विकावयाची झाली तर तो आपल्या वकिलाकडून विकत घेणाऱ्या मनुष्याच्या वकिलाच्या हातावर, त्या जमिनींतील थोडीशी माती कांहीं साक्षीदारांसमक्ष पाडीत असे. जमीन ही उचलून देण्यासारखी वस्तु नसल्यामुळें असा प्रघात पडला असावा हें उघड आहे. आपणांत उदक सोडण्याचा जो रिवाज आहे तोही अशाच अर्थाचा आहे. ज्या वस्तूवर आपण उदक सोडतों तीवरील आपलें स्वामित्व

आपण सोडतों, असा या संप्रदायाचा मूळ आशय आहे. स्थावर वस्तु उचलून देतां येत नाहीं, तेव्हां तिच्या संबंधानें अशा प्रकारचा तोडगा करणें भाग पडतें. पुढें ब्राह्मणभोजन घालावयाचें झालें, दक्षिणा द्यावयाची झाली, कन्यादान करावयाचें झालें तरी उदक सोडण्याचाच प्रघात पडतो; म्हणून स्थावरजंगम पदार्थांवरील स्वामित्व सोडण्याची एकच पद्धत पडते; व असें होणें फार सोईचें आहे. तसेंच पूर्वीचे लोक लढाई करावयास निघाले असतां, ज्या लोकांवर चालून जावयाचें असेल, त्यांच्याशीं प्रत्यक्ष संग्राम करूं लागण्यापूर्वी, माती आणि पाणी मागत; आणि त्या जिनसा त्यांच्याकडून आल्या तर लढाई न करतां ते आपले गुलाम होण्यास तयार आहेत असें समजत. या आचाराचा अर्थही उघड आहे. ज्यांनीं मागितल्याबरोबर माती आणि पाणी दिलें त्यांनी आपण होऊन आपला देश ताब्यांत देण्याची कबुली दाखविली, असें होतें, याप्रमाणेंच लढाईकरतां साहाय्य मागायचें झालें, तर एकमेकांकडे भाले पाठवून देण्याची चाल असे; तसेंच लढाई सुरू होऊन कांहीं कैदीही करण्यांत आले आहेत असें दाखविण्याकरितां, या मदतीसाठीं धाडण्यांत येणाऱ्या भाल्यांच्या फळांवर कैद केलेल्या लोकांचे हात किंवा बोटें टोंचून ते पाठविण्यांत येत असत. असेंच 'आम्ही शरण आलों' असें म्हणावयाचें असल्यास शस्त्रें उलट धरून किंवा हात बांधून घेऊन शत्रूच्या छावणींत जाण्याचा प्रघात असे. हात जोडणें, पायां पडणें, गुढगे टेकणें, तोंडांत मारून घेणें, कान उपटून घेणें, नाक घासणें वगैरे जे प्रकार आपण देवापुढें किंवा राजापुढें करतों त्या सर्वांचा इंगितार्थ हाच आहे.

पण कोणी असें म्हणतील कीं, मनुष्यांनी ठरविलेल्या ह्या कांहीं तरी खुणा आहेत. यावरून; पूर्वी स्वामिसेवक संबंध, राजाप्रजा संबंध किंवा देवपूजक संबंध दाखविण्यासाठीं ज्या आचारांच्या या खुणा आहेत असें आम्हीं म्हणतों, ते आचार अस्तित्वांत असतील असें अनुमान करणें बरोबर नाहीं. त्यावर उत्तर एवढेंच आहे कीं, पृथ्वीवर सध्यां जे रानटी किंवा अर्धवट रानटी लोक आहेत त्यांमध्यें असे आचार रूढ आहेत; आणि ज्या देशांतून ते नष्ट झाले आहेत, अशा देशांच्या इतिहासांत त्यांची उत्तम माहिती मिळण्यासारखी आहे. आमच्या देशांतील निरनिराळ्या वर्गांतले लोक निरनिराळ्या स्थितींत असल्यामुळें कोठे हे आचार प्रत्यक्ष आढळतात व कोठें त्यांची फक्त कवाईत दृष्टीस पडते. **वुइलियम्स** नांवाच्या एका प्रसिद्ध इंग्लिश प्रवाशानें असें म्हटलें आहे कीं, एका प्रसंगीं **फिजी** लोकांचा एक राजा मेला असतां, त्याच्या दरबारानें त्याच्या प्रीत्यर्थ शंभर करंगळ्या तोडाव्या असा हुकुम फरमाविला; तसेंच एका मुलाचा आवडता बाप नुकताच वारला होता; तेव्हां त्याला गाडण्यापूर्वीं त्याच्या मुलानें आपली पितृभक्ति

प्रदर्शित करण्यासाठीं आपलीं पांच बोटें तोडून त्यांस आपल्या पित्याच्या शवाबरोबर मूठमाती दिली! अमेरिकेंतही याप्रमाणेंच पितरांस व देवतांस अंगुलिच्छेद करून खुष करण्याचा प्रघात आहे. **हाटेंटॉट** लोकांत अशी चाल आहे कीं, एखाद्या बायकोचा नवरा मेला असता आणि तिच्या मनांत दुसरें लग्न करावयाचें असलें, तर तिनें आपल्या बोटाचें पहिलें कांडें तोडून घेतलें पाहिजे. हा दुसरा नवरा मरून तिसरा करावयाचा असल्यास त्याच्या खालचे दुसरे कांडे दुसऱ्याच्या पिशाचास अर्पिले पाहिजे. याप्रमाणें एका पाठीमागून एक हवे तितके नवरे करावे, प्रत्येका पाठीमागें बोटाचें एकेक कांडें गमविण्याची तयारी असली म्हणजे झालें! याप्रमाणें पितृभक्ती किंवा भर्तृप्रेम दाखविण्यासाठीं हाताचीं बोटें गमावणें; हें ज्या आमच्या लोकांत सतीचा प्रघात इंग्रजी होईतोंपर्यंत रूढ होता त्यांस हास्यास्पद किंवा क्रूर वाटण्याचा मुळींच संभव नाही. जिनें भर्तृशवाबरोबर अग्निप्रवेश केला, तिची काय थोरवी सांगावी? तिच्या पुण्यप्रतापानें सासरच्या व माहेरच्या मागल्या व पुढल्या बेचाळीस पिढ्यांचा उद्धार होऊन, शिवाय खुद्द तिला त्याच भर्त्यांशीं सात जन्म सहवाससुख! पण हिंदु लोकांनीं असें समजूं नये कीं, अशा प्रकारच्या प्रेमप्रदर्शनांत आपणांहून श्रेष्ठ असे दुसरे लोक नाहींत! हिंदुस्थानांत असा कोणताही आचार नाहीं किंवा नव्हता, कीं ज्याच्या प्रतिमा दुसरीकडे दाखवितां येणार नाहींत. काहीं बाबतींत तर हिंदुस्थानास लाज आणविणारे असे प्रकार इतर लोकांत रूढ आहेत. दूर कशाला, ही सतीची गोष्ट पाहिजे तर घ्या. माधवराव पेशव्याबरोबर फक्त रमाबाईच सती गेली. आफ्रिकेंत व अमेरिकेंत कांहीं रानटी लोक आहेत, त्यांचे राजे परलोकवासी झाले असता त्यांच्या बरोबर त्यांच्या बायकाच तोडून पुरण्याचा प्रघात आहे इतकेंच नाही, तर त्यांच्या समवेत त्यांच्या आवडत्या व निवडक भावांस, गुलामांस, मंत्र्यांस, व जनावरांसही सती घालविण्याची चाल आहे! मेलेल्या पितरांस आंथरुणें पाहिजेत, गाई पाहिजेत, वाडे पाहिजेत, तर घोडीं कां नकोत, कुत्रीं कां नकोत, गंजिफाच्या पेट्या आणि बुद्धिबळांचे आणि सोंगट्यांचे पट व त्या खेळण्यास लागणारे मित्र कां नकोत? खरी प्रीतीच दाखवायाची असेल, आणि मृताकरतां जें जें देण्यांत येतें तें तें त्याला पावतें, व त्याचा उपभोग त्याला घेतां येतो हें खरें असेल; तर अगोदर घरेंदारें जाळून टाकून मग आईबापांनीं मुलांबरोबर, मुलांनीं आईबापांबरोबर, बहिणींनीं भावांबरोबरच व भावांनी बहिणींबरोबर, राजानें प्रजेबरोबर आणि प्रजेनें राजाबरोबर, आणि मित्रांनीं एकमेकांबरोबर सती जावें, आणि येथल्यासारखाच पिशाचयोनींत सारा थाट उठवून द्यावा हें योग्य आहे! बायकोनें नवऱ्यासाठीं स्वतःस जाळून घेणें हें उत्तम प्रेमाचें निदर्शक असेल तर

त्याचें अनुकरण इतर सर्व संबंधांत होऊं लागणें यांत मनुष्यतेची केवढी उन्नति व्यक्त होणार आहे बरें? आणि अशा प्रकारची उन्नति सार्वत्रिक झाल्यास येथील मनुष्यवस्ती नाहींशी होऊन जन्ममरणाचे क्लेश या पृथ्वीतलावर मनुष्यमात्रांत तरी दृष्टीस पडूं न लागल्यामुळें तिच्यावरील दु:खाचा किती भार कमी होणार आहे? पण असें होत नाहीं. यावरून दिवसेंदिवस आम्ही नीच होत चाललों आहों, व खऱ्या प्रेमाचा आम्हांमधून लोप होत आहे, असें म्हणणें जरूर नाहीं काय? साक्षात् जाळून घेण्यानें ज्या प्रकारचें निकट प्रेम प्रदर्शित होतें, त्याचा एक कोट्यंश तरी आतां जे आचार रूढ आहेत, त्यांनीं होत असेल काय? असो! या सामाजिक आचारांचें राज्याचारांतही अनुकरण होऊं लागतें, हें पहावयाचें असेल तर प्रस्तुतकालीं चीनसारख्या जुन्या पद्धतीच्या देशांत अपराध्यांस कोणत्या प्रकारच्या शिक्षा देण्यांत येतात, हें पहावें व युरोपखंडांतील निरनिराळ्या देशांचे इतिहास वाचावे. कोणी खोटें केलें तर त्याचे हात तोडावयाचें, कोणीं खोटी साक्ष दिली तर त्याची जीभ कापावयाची, कोणी स्त्री चपला निघाली तर तिचें नाक कापावयाचें किंवा तिच्या शरीराच्या निरनिराळ्या भागांवर डाग द्यावयाचे; तसेच कांहीं गुन्ह्यांबद्दल कान कापावयाचे, कांहींबद्दल पाय कलम करावयाचे, कांहींबद्दल डोळे काढावयाचे- अशा अनेक प्रकारच्या शिक्षा सध्यां चिनांत सुरू आहेत, व पूर्वी येथें व युरोपांत अस्तित्वांत होत्या; आणि इंग्रजांचें राज्य येथें न होतें; तर त्यांपैकीं बऱ्याच येथें सध्यांही अंमलांत असलेल्या दृष्टीस पडत्या. पण उत्तरोत्तर अशा शिक्षा क्रूर वाटूं लागून सौम्य शिक्षा देण्यानें मनुष्यांची नीति लौकर सुधारत जाते, असा अनुभव हळूं हळूं येऊं लागतो, आणि असल्या शिक्षा अगदीं मागें पडून सौम्य शिक्षा सर्वत्र अंमलांत येतात. हा बदल क्रमाक्रमानें सर्व आचारांच्या संबंधानें होतो, व अखेरीस ज्या प्रकारानें कमींत कमी विकलांगता उत्पन्न होईल, व ती ज्याच्या कपाळी आली असेल; त्याला कमींत कमी वेदना सोसाव्या लागतील, असे प्रकार सामाजिक, धार्मिक व राजकीय आचारांत रूढ होत जातात. अलीकडे लष्करी घोड्यांस खुणेसाठी डागतात, हें सर्वांस ठाऊक आहेच; पूर्वी गुलामाच्या अंगावर मालकाच्या नांवाचा डाग देत असत. हाच प्रकार धर्मांत शिरला तेव्हां त्याच्या तप्तमुद्रा झाल्या. मग अर्थात् जो स्वामीस अधिक पैसे देईल त्याला ओल्या फडक्यावरच्या मुद्रा, जो पैसा न सोडील त्याला लालभडक मुद्रा, जी कोमलांगी असेल तिला ओझरत्या मुद्रा, जी हेडंबा असेल तिला प्रशस्त मुद्रा, असा परिपाठ पडणें किती स्वाभाविक आहे? या मुद्रांप्रमाणेच नाकांतील व कानांतील भोकांची गोष्ट होय. कोणी असें म्हणतात कीं, स्त्रिया स्वभावत: फार चंचल आहेत, म्हणून त्यांना अल्लड बैलाप्रमाणें किंवा उंटाप्रमाणें थोड्या श्रमानें

वागविता येण्यासाठीं नथरूपी वेंसणी त्यांच्या नाकांत घालवयाची चाल पडली! मुसलमान लोक आपल्या बायकांविषयी विशेष दक्ष असल्यामुळें ते बायकांच्या नाकपुड्यांतील पडद्यांत खाशी काडी बसवून देऊन तिच्या चंद्राकार परिघाचा खळ तोंडावर होऊं देतात. ही नथ कधीं कधीं इतकी जड असते कीं, तिच्या ओझ्याने नाकाचा पडदा तुटून जाण्याची भीति पडून ती सांवरण्यासाठी तिला एक दोरा लाऊन तो मागें बुचड्याला खेचून बांधलेला असतो! कोणी म्हणतात कानानाकांसही विंझें पाडण्याची पद्धत अलंकारशास्त्रप्रणीत आहे! असेल बापडी! येवढ्यानें अलंकारशास्त्राचें रहस्य पुरतें उमजत नसेल, तर खालच्या वरच्या ओठांस चार किंवा पांच भोंकें पाडून त्यांत बाळ्याबुगड्यांच्या व नथांच्या नवीन सवती अडकविण्याचा प्रघात पडेल, तर किती बहार होईल! तसेंच गुजराथी बायकांप्रमाणें दातांत सोन्यारुप्याच्या चुका मारून त्या ओठांतून बाहेर काढण्याचा प्रचार पडेल तर अलंकारशास्त्रांत एक-दोन नवीन उल्लास करून घातल्याचें श्रेय येणार नाहीं काय? असो! व्यवहारांत आम्ही या बायकांच्या नथांतून केव्हा सुटूं ते सुटूं; येथें पाहिजे तेव्हां त्यांतून निसटणें आमच्या ताब्यांत असल्यामुळें तसें करून, दुसऱ्या एका अंगवैकल्याकडे वळतों. हें वैकल्य जगत्प्रसिद्ध आहे. याचा आरंभही विजयलांछनापासूनच आहे. लढाईंत धरलेल्या कैद्यांपासून संतानवृद्धी न व्हावी, घरांत ते वावरूं लागले असतां त्यांपासून स्त्रियांस भीति न रहावी यासाठीं गुलामांस बैलाप्रमाणें हतपुंस्त्व करण्याचा प्रघात यहुदी, फिनीशियन, मिसर, फ्रिजियन, पारशी, मुसलमान वगैरे अनेक लोकांत फार वर्षे रूढ होता, व अजूनही तो अनेक रानटी लोकांत दृष्टीस पडतो. ज्याप्रमाणें तोडलेले हातपाय त्याप्रमाणें हीं गुह्यांगें राजास नजर करणें हा आचार रानटी लोकांत पूज्य मानल्यामुळे, राजस्वरूप देवासही तो अत्यंत प्रिय होत असेल असा तर्क करून, भक्तांनी आपापल्या देवतांस आपण होऊन आपलीं किंवा दुसऱ्यांचीं सबंध गुह्यांगें किंवा त्यांचे कांहीं भाग अर्पण करण्यास तयार होणें, हें किती स्वाभाविक आहे? ज्या इंद्रियामुळें सर्व सुखांत अत्यंत प्रिय सुखाची प्राप्ति होत असून जातिप्रवाह अव्याहत चालतो, त्याहून देवतेला नजर करण्यास विशेष महत्त्वाची वस्तु कोणती असणार? आपल्याकडे कोणी सूर्यास हात वाहतात, कोणी पाय वाहतात, कोणी दुसरा कांहीं अवयव वाहतात, पण सुंतेवाल्यांनीं आम्हा सर्वांस हटविलें आहे असें कबूल केलें पाहिजे! युरोपियन लोकांत जसा बाप्तिस्मा, आमच्या लोकांत जशी मुंज, तसा मुसलमान व इतर लोकांत हा सुंत्याचा संस्कार प्रमुख होऊन बसला आहे. सुंता हा पूर्वीच्या कृत्रिम नपुंसकत्वाचें सौम्य रूप आहे. असो. विषयाच्या ओघांत या अमंगळ आचाराविषयीं आम्हांस इतकें स्पष्टपणें लिहावें

लागलें याबद्दल वाचकांची क्षमा मागून दुसरीकडे वळतों.

ज्याला आपण अलीकडे गोंदणें म्हणतों; तेंही पराभूत लोकांवर पराभव झाल्याचें एक चिन्ह कायम करण्याचा मार्ग होतें. अलीकडे हें गोंदणें भूषण होऊन बसलें आहे, ही गोष्ट आम्हांस नाकबूल नाही, पण याची वंशावळ वरील सर्व आचारांच्या वंशावळींसारखीच आहे. शूर लोकांस शरीरावर अनेक वार लागले असून त्यांपासून जे डाग पडलेले असतात, त्यांचें मोठें भूषण वाटतें, व अशा डागांपासून उत्पन्न झालेली कुरूपता पुरूषांच्या सौंदर्याची परीक्षा करण्याचा ज्यांचा विशेष अधिकार; त्या स्त्रियांना ती कुरूपता न वाटतां, उलट ते डाग भूषणांसारखे वाटतात, व वाटणें नीट आहे. कारण ज्यांत जो गुण नसेल त्याला त्या गुणाचें मोठें कौतुक वाटतें. हा प्रकृतिनियम फार पूर्वीच्या तत्त्ववेत्त्यांच्या नजरेस येऊन गेला होता. स्त्रियांच्या अंगीं शौर्याभाव असल्यामुळें ज्यांच्या शरीरावर शौर्याचीं चिन्हें ढळढळीत दिसत असतील त्याकडे स्त्रियांचें मन ओढणें हा नैसर्गिक प्रकृतिधर्म होय. असें नसतें तर **डेस्डेमोना** आणि **ऑथल्लो** हे नाटक आपणांस पराकाष्ठाचें नीरस वाटलें असतें. असो. शरीरावर नानाप्रकारच्या रंगांच्या वेलबुट्ट्या काढण्याचा प्रकार आजमितीस रसिक लोकांत जरी भूषणावह मानिला असला, व 'प्रियाकुचतटी' 'पत्रावली' 'काढण्याची रुढि भगवान् श्रीकृष्णापासून जरी आम्हांपर्यंत आली असली, तरी गोंदण्याची मूळ पद्धत जिंकलेल्या लोकांवर पराभवाची कांहीं तरी टिकाऊ निशाणी ठेऊन देण्याच्या बुद्धीनें शोधून काढिली असावी, असें मानण्यास विपुल पुरावा आहे. आमची उभीं आडवीं गंधें व आमच्या बायकांचीं निरनिराळया तऱ्हांचीं कुंकवें, आमच्या गोपीचंदनाचे टिळे, आमच्या वैष्णवांच्या कृष्णरेषा आणि आमच्या शैवांचे भस्मार्चन- हीं सारीं दास्यसूचक चिन्हें आहेत, असें वाटतें.

आतां आणखी एका आचाराविषयी अल्प उल्लेख करून हें बरेंच लांबलेलें **व्यवच्छेदनप्रकरण** आटपतों. हा आचार केशवपनाचा. सध्यां या शब्दाचा विशिष्ट अर्थ होऊन गतभर्तृकांचे जें वपन त्यासच केशवपन म्हणण्याची चाल पडली आहे. बाकी पुरुषांच्या वपनास, केशवपन कां म्हणूं नये हें समजत नाहीं. तथापि त्याबद्दल आम्ही वाद करीत बसत नाहीं. क्षौर हा दुसरा सामान्य शब्द चालण्यासारखा आहे. मृतपूर्वजांविषयी व त्यांपासून उत्पन्न झालेल्या देवतांविषयीं, आणि अगदीं जवळचे आप्त मेले असतां त्यांविषयीं आपलें प्रेम प्रगट करण्याकरतां केशांचें मुंडन करण्याचा विधि फार पुरातन व सार्वत्रिक आहे. ग्रीक लोकांत, रोमन लोकांत, अलीकडील ख्रिस्ती लोकांत- सारांश बहुतेक सर्व लोकांत या मुंडनविधीचें लिंगभेदाप्रमाणें व आश्रमभेदाप्रमाणें कमी अधिक वर्चस्व दृष्टीस पडतें.

कोठें दर महिन्यास किंवा पंधरवड्यास नखशिखांत वस्तरा चालविण्याची पद्धत आहे; कोठें कांहीं अपराधाबद्दल भिंवया व पांपण्या काढण्याचीच चाल आहे; कोठें अर्धे डोके, एक मिशी व अर्धी दाढी काढण्यांतच मोठी शिक्षा होतें असें मानतात; कोठें डोक्याच्या मध्यावर एक चंद्र केला म्हणजे काम होतें; कोठें प्रति पौर्णिमेस व अमावस्येस एक बट ठेऊन बाकीचे सारें डोकें व तोंड साफ करण्याचा प्रघात आहे; एकंदरीनें पहातां असें दिसून येतें की, शरीरावर वाढणाऱ्या या चिजेवर हवे ते प्रयोग केले, तरी शरीराला म्हणण्यासारखी बाधा होण्याचा संभव नाहीं असें पाहून, तें करण्यास फारशी दगदग व खर्च पडत नाहीं असें मनांत आणून, आणि त्याचें पीक फिरून फिरून येणारें आहे असें जाणून, बरीच सुधारणा झाली असतां; प्रत्येक राष्ट्रांत क्षौराच्या निरनिराळ्या तऱ्हांनी जेवढें स्वामित्व, जेवढें प्रेम, आणि जेवढी धार्मिकता व्यक्त करतां येईल तेवढी करण्याचा प्रघात पडतो, असें दिसतें. मिशांवर ताव देऊन घर्षण करणें, किंवा 'आमच्या मिशा खालीं' असें म्हणून पड घेणें- या सामाजिक आचारांत पुष्कळच इतिहास आहे! तेव्हां स्त्रियांचा केशकलाप उतरून त्यांना पतिप्रेम प्रगटविण्यास लावणें किंवा पतींसमक्ष उत्तर हिंदुस्थानांत त्यांच्याकडून वेणीदान करविणें, या अज्ञानमूलक पद्धति भरतखंडविशिष्टच आहेत असें नाहीं!

✷

# उपायन, कर, व बलिदान

**लॉर्ड लिटन्** यांच्या कारकीर्दीत हिंदुस्थानच्या खजिन्यांत जी कोटी दीड कोटीची तूट पडली ती अफगाणिस्थानच्या लोकांस दिलेल्या देणग्यांमुळें पडली, असें म्हणतात. जनरल **रॉबर्टस्** यांनी कंदाहारावर कूच करून जात असतां, अफगाणी लोकांस जितकें आपल्या शौर्यानें तितकेंच आपल्या औदार्यानें जेरीस आणिलें; अशी त्या वेळेस लोकवार्ता होती. अफगाणिस्थानच्या डोंगराळ प्रदेशांतील लोक अगदीं निर्धन असल्यामुळें, जेव्हां आमचे कमँडर-इन-चीफ कंदाहारच्या वाटेवर दोहों बाजूस तोडे फेंकीत चालले तेव्हां त्या लोभी कडव्या लोकांचें लक्ष ते गोळा करण्यांत व वांटून घेण्यांत व्यग्र होऊन गेलें, आणि आमच्या सेनापतीस अडथळा न होतां आपला मार्ग सुधारतां आला! या कर्णोपकर्णीं आलेल्या वार्तेंत तथ्य असो किंवा नसो, तीवरून एक सामान्य सिद्धांत असा निघतो कीं, उपायनांनी शत्रूंस कांहीं अंशीं वश करून घेतां येतें; आणि असें होणें स्वाभाविक आहे. पारितोषिकें, वायनें, दानें, उपहार आणि नझरा- हीं सर्व कसल्या तरी उपभोग्य वस्तूंचीं झालेलीं असतात. या उपभोग्य वस्तु प्राप्त झाल्या असतां, ज्यांस त्या प्राप्त होतात; त्यांनीं त्या देणारांवर सुप्रसन्न किंवा मेहेरबान व्हावें, हें स्वाभाविक आहे. शिवाय, अशा प्रकारच्या देणग्यांपासून आणखी एक गोष्ट व्यक्त होत असते ती ही कीं, त्या देणारा आपणास वचकतो असें त्या घेणारास वाटूं लागतें, आणि कांहीं अंशीं तें खरेंही असतें. ज्या कुत्र्यास पारध करण्यास शिकविलेली असते त्याला एखादे दिवशीं कांहीं सांपडलें नाहीं, तर तो निदान झाडाचें वाळलेलें पान किंवा एखादें चिपाड तरी तोंडांत धरून शेंपूट हालवीत हालवीत मोठ्या लाडानें धन्यास खुष करण्याचा प्रयत्न करील. यावरून काय दिसतें कीं, अप्रबुद्ध प्राण्यांत सुद्धां अशा रीतीनें वरिष्ठाची मर्जी सुप्रसन्न ठेवण्यास आपणाकडून होण्यासारखी खटपट करण्याची नैसर्गिक प्रवृत्ति आहे. आम्हीं मनुष्यें एकमेकांस ज्या देणग्या देतों त्या मुख्यत: दोन कारणांसाठीं देतों; तीं कोणतीं म्हणाल; तर कोपशमन आणि स्नेहसंपादन. ज्याला कांहीं द्यावयाचें तो आपला शत्रु असल्यास त्यानें वैर विसरून जाऊन कोणत्याही प्रकारची पीडा देऊं नये अशा हेतूनें, किंवा जो मित्र असेल त्यानें प्रसंगविशेषीं उपयोगी पडावें

म्हणून आपण पदरमोड करून व स्वत:स झीज लावून घेऊन कधीं कधीं शत्रूस व मित्रास नझरा पाठवितों. एकदां अशा कारणास्तव नझरा पाठविण्याची चाल रूढ झाली, म्हणजे त्या कितीही अल्प मोलाच्या किंवा शुष्क असल्या तरी चालतात. फार काय सांगावें, अशा कामास एखादा खडा, गवताची काडी, तुटलेला केंस, किंवा लांकडाची ढलपीसुद्धां बस्स होते. **पेरू** येथील डोंगरावर ओझी चढवणारे हमाल डोंगराच्या माथ्यावर येऊन पोहोंचले म्हणजे ओझीं उतरून टाकतात, आणि शैलाधिपति **पचकामक** देवास अशी प्रार्थना करितात कीं, ''हे प्रभो, त्वां आम्हांस या ओझ्यासकट सुरक्षितपणें वर आणिलें, याबद्दल आम्हीं तुझे फार आभारी आहों, व या तुझ्या उपकारांतून मुक्त होण्यासाठी हे आम्ही आपल्या भिंवईचे केंस तुला अर्पण करतों''- असें म्हणून प्रत्येकजण आपापल्या भिंवईचा एकेक केंस उपटून टाकतो! या देशांतही कित्येक ठिकाणी डोंगर चढून गेल्यावर खडा उचलून टाकण्याची वहिवाट आहे, व अशा खड्यांचे मोठमोठाले ढीग जमलेले आहेत, हें पुष्कळांच्या पाहण्यांत व ऐकण्यांत आलें असेल. देणग्या देणें आणि त्या घेणें, हा आचार प्रथम दोन अथवा अधिक विषम व्यक्तीत सुरूं होतो, व पुढें तो समव्यक्तींतही पसरत जातो. कुळांनीं जमिनीच्या मालकांस, प्रजांनी राजांस, भक्तांनीं देवांस, शिष्यांनीं गुरूंस- अशा रीतीनें दक्षिणा देण्याचा आणि घेण्याचा प्रघात पडतो. पुढें एका दर्जाच्या मित्रमित्रांतही त्या देण्याघेण्याचा प्रचार पडतो. दसऱ्याचें शुष्क सोनें, थोर लहानांस व लहान थोरांस देतात व घेतात. संक्रांतीच्या 'शर्करावगुंठित' तिळांचीही तशीच स्थिति आहे. पण वाढणीं पाठविणें, लग्नास किंवा मुंजीस आहेर देणें, दिवाळीस ओंवाळण्या घालणें, आंब्यांच्या डाल्या धाडणें, एकमेकांच्या मुलांस फटाकड्याच्या पेट्या आणि गांठ्या पाठवून देणें- हे आचार बरोबरीच्या लोकांत चालतात. **सुधारकाच्या** एडिटरानीं **लॉर्ड रे साहेबांस** अफुसाचे कांहीं निवडक दाणे पाठविले आणि ते त्यांनीं स्वीकारिले, किंवा **लेडी रे नें मिसेस आगरकरणीस** बाळंतविडा पाठविला, असे होण्याचा संभव नाहीं! अशा प्रकारची देवघेव **सर जेम्स फर्ग्यूसन** आणि **सरदार रा. ब. रास्ते** किंवा **लेडी रे** आणि **अक्कलकोटच्या** किंवा दुसऱ्या एखाद्या संस्थानच्या राणीसाहेब- अशांच्या दरम्यानच होऊं शकणार. अशा प्रकारच्या देणग्या ज्यांच्यामध्यें चालतात; ते परस्परांस एका पदवीचे समजत असून, त्यांचा एकमेकांशीं पुष्कळ घरोबाही झालेला असतो. नहाणाच्या हळदकुंकवाचे बोलावणें भलत्याच घरीं जावयाचें नाहीं, भलत्याच ठिकाणचें वाढणें यावयाचें नाहीं!

येथपर्यंत या आचाराच्या सामाजिक स्वरूपाचें दिग्दर्शन झालें. आतां याला

राज्यप्रकरणांत व धर्मप्रकरणांत कसें वळण लागतें हें थोडक्यांत दाखवूं. वर दर्शविल्यासारखे सामाजिक आचार रूढ झाले म्हणजे त्यांपासून समाजस्थितीस अनुसरून राज्याचार व धर्माचार पडूं लागतात. ज्या लोकांची स्थिति पशुतुल्य आहे व ज्यांना देवतांची किंवा पिशाचांची कल्पना नाहीं, अशांत देवतांस किंवा पिशाचांस बलि मिळण्याचा संभव नाहीं, हें उघड आहे. पण त्यांच्या कल्पना येऊं लागल्या कीं, त्यांसंबंधीनें या आचारांचा प्रादुर्भाव होतो. देवता आणि राजा या दोहोंपैकी आधी उपायनें कोणास देण्यांत येऊं लागतात, याचा निश्चय बरोबर करतां येत नाहीं; तथापि केवळ वन्यावस्थेंतून पार पडलेल्या उत्तर धुव्राजवळच्या **एस्किमो** लोकांसारख्या लोकांच्या स्थितीवरून असें दिसतें कीं, मनुष्याच्या मनांत राज्याच्या आणि राजाच्या कल्पना येण्यापूर्वी पिशाचांच्या व देवतांच्या कल्पना येऊं लागणें शक्य आहे. म्हणून कर, खंडणी, करभार यांच्या अगोदर बलिप्रदानें अस्तित्वांत येण्याचा संभव आहे. तसेंच हेंही ध्यानांत ठेवण्यासारखें आहे कीं, ज्याप्रमाणें देवतांच्या व पिशाचांच्या कल्पना येण्यापूर्वी त्यांस बलि देण्याचा प्रचार पडण्याचा संभव नसतो, त्याप्रमाणें ज्या लोकांत 'राजा' म्हणून कोणी एक इतरांहून कमी-अधिक श्रेष्ठ मानिलेली अशी व्यक्ति जेथपर्यंत अस्तित्वांत आलेली नसते; तेथपर्यंत त्या लोकांत राजभाग, राजांश, सरकार देणें, कर, खंडणी, सरकारदंड-असल्या कल्पना किंवा तदनुरोधी विचार अस्तित्वांत येण्याचा संभव नाही. पुन: याच विचाराच्या ओघांत असतां वाचकांच्या लक्षांत हेंही येऊन जाईल कीं, ज्या देशांत एकसत्ताक राज्य कधींच स्थापण्यांत आलें नाहीं, किंवा आलें असून जेथें लोकसत्ताक राज्याची लौकरच स्थापना झाली, अशा देशांत या राजकीय देणग्यांची जी पद्धत असते; ती ज्या देशांत एकसत्ता फार प्रबल आहे अशा देशांतील राजोपहारपद्धतीहून पराकाष्ठेची भिन्न व क्षीण असते.पाटिलकुळकरण्यांनीं हप्ते गोळा करून नेमल्या तारखेस तालुक्याच्या मामलेदार कचेरींत पोतें हजर करणें-ही अलीकडील कर घेण्याची पद्धत पूर्वीपासून अंमलांत आहे, असें समजणें फार मोठी चूक आहे; तसेंच, असले कर गोळा करण्यासाठीं आतांच्या मामलतदारांसारखे दोन-दोनशें रुपये दरमहाचे अधिकारी फार प्राचीन कालापासून आपापल्या राजासाठीं कर गोळा करीत आहेत; असें समजणें, हेंही चूक आहे. समाज अत्यंत संकुचित किंवा मर्यादित असला, आणि त्याला नाण्याचा उपयोग ठाऊक नसला, म्हणजे त्यांत अशा प्रकारें राजभाग जमविण्याची चाल कोठून असणार? समाजाच्या प्रथमावस्थेंत राजा म्हणजे एक विशेष बलवान् व चतुर पुरुष असतो. समाजांतल्या समाजांत जे तंटेबखेडे होतील ते मध्यस्थ होऊन कधीं बुद्धिबलानें व कधी बाहुबलानें तोडणें, व दुसऱ्या जातीचा हल्ला आला असतां

स्वजातीचें पुढारीपण पत्करून त्या अरिष्टांतून तिचा बचाव करणें- हें राजाचें मुख्य कर्तव्य. अशा समाजांत; सामान्य प्रजेच्या आणि राजाच्या बाह्य स्थितींत म्हणण्यासारखें अंतर नसतें. राजाला तिऱ्हाइताचें व अग्रणीचें काम करावें लागत असल्यामुळें तो इतरांहून थोडासा श्रेष्ठ गणला जात असतो, व त्याच्या आणि त्याच्या कुटुंबाच्या चरितार्थासाठीं समाजांतील प्रत्येक घरांतून कांहींना कांहीं तरी पोहोंचवावें लागत असतें. जो जें पिकवीत असेल, किंवा ज्याचा जो धंदा असेल त्यानें त्यानें आपल्या उत्पन्नाचा कांहीं भाग स्वसंतोषानें राजाला आणून द्यावा, अशी रीत प्रथम पडते; व पुढें या रीतींतील स्वातंत्र्य नाहींसें होऊन सत्ताधीनत्व येतें. तथापि जोंपर्यंत राष्ट्राचें क्षेत्रफल संकुचित असून त्यांतील लोकसंख्या एका जातीची व मर्यादित असते, तोंपर्यत हें सत्ताधीनत्व फारसें कठिण वाटत नाहीं. परंतु एका जातीचा दुसऱ्या जातीशीं संग्राम होऊन मिश्र समाज उत्पन्न झाला, व राष्ट्र विस्तार आणि लोकसंख्या हीं वाढलीं म्हणजे ही सत्ताधीनता जाचूं लागते. अखेरीस जेव्हां हिंदुस्थानसारखा प्रचंड देश मोंगलांसारख्या एखाद्या शूर लोकांच्या अंमलांत येऊन त्यांत जिंकणारे आणि जिंकलेले असे दोन ठळक वर्ग होतात, तेव्हां राजास करभार देणें, हें स्वसंतोषावर बिलकुल अवलंबून राहीनासें होतें. बाबरासारख्या किंवा अकबरासारख्यासुद्धां एकट्या बादशहास येवढ्या देशावर राज्य करणें अशक्य असल्यामुळें त्याला ठिकठिकाणीं आपल्या प्रतिनिधींची स्थापना करावी लागते. या प्रतिनिधींनाही आपापले मुलूख आवरण्यासारखे नसल्यामुळें पोटप्रतिनिधि नेमावे लागतात. याप्रमाणें सार्वभौम बादशहापासून पेट्याच्या तहशीलदारापर्यंत एकाहून एक उतरत जाणाऱ्या अधिकाऱ्यांची परंपरा लागत जाते, आणि हे सर्व जिंकणाऱ्या लोकांपैकीं असल्यामुळें त्यांचा अंमल मोठ्या सक्तीनें चालतो. प्रत्येकास आपला व आपल्या तैनातीचा खर्च भागवून शिवाय वरच्या अधिकाऱ्यास बराच ऐवज प्रतिवर्षी भेट किंवा खंडणी म्हणून पोहोंचवायाचा असतो; व ज्याच्याकडून विशेष खंडणी येईल; त्याची बादशहाच्या दरबारांत तारीफ होऊन त्याची विशेष बढती होण्याचा संभव असल्यामुळें; व ज्याच्याकडून कमी खंडणी येईल त्यावर इतराजी होऊन त्याला बडतर्फी मिळण्याचा संभव असल्यामुळें; जो तो आपापल्या ताब्यांतील लोकांस जितकें नाडवेल तितकें नाडून आपली व बादशहाची तुंबडी जितकी भरवेल तितकी भरण्याचा प्रयत्न करीत असतो; आणि असें करण्यांत त्यास शस्त्रबलाचें भरपूर सहाय्य असल्यामुळे लोकांची पराकाष्ठेची जाचणूक होते. उत्पन्नाचा अमुक वाटा राजभाग, असा निर्बंध अशा स्थितींत बिलकुल चालत नाहीं. राजकिंकर, जितकी माया निघेल तितकी काढीत असतात. अशा प्रकारच्या संमिश्र समाजांत नाणें

चालूं असलें म्हणजे राजभाग उत्पन्नरूपाने न घेतां द्रव्यरूपानें घेण्याचा प्रघात पडतो, व या प्रघातामुळेंही प्रजेस फार त्रास होतो. राजाचें मागणें असेल तेवढी रक्कम जिवाच्या व भावी सुखाच्या आशेनें आपला माल जाईल त्या दरानें विकून उभी करावयाची, हें किती कष्टावह आहे बरें? तथापि अशा स्थितींतही मनुष्यें उत्पन्न करीत असतात व राजदेणें देत असतात! ब्रिटिश सरकारच्या पदरीं असलेल्या नोकरांचे पगार मोठे असल्यामुळें लांचलुचपतीचा प्रकार बेताबातानें चालतो. पूर्वी युरोपांत, अमेरिकेंत, व आशियांत सरकारी नोकरांस मुळींच पगार मिळत नसल्यामुळें किंवा अगदीं लहान मिळत असल्यामुळें त्यांना आपले पगार काढून शिवाय राजभाग काढावा लागत असे. यामुळें गांवच्या पाटलापासून थेट बादशहापर्यंत- ज्याला आपण अलीकडे लांच म्हणतो- तो सर्वत्र राजरोस घेण्यांत येत असे. प्रसिद्ध इंग्लिश तत्त्ववेत्ता लॉर्ड बेकन याची लांचखाऊपणाबद्दल प्रसिद्धी आहे. त्यावर स्पेन्सर साहेबाचें असें म्हणणें आहे कीं, ही त्यावेळची रीतच होती. साऱ्याच न्यायाधीशांस व इतर अधिकाऱ्यांस अशा रीतीने आपल्या पगाराची भरती करून घ्यावी लागत असे; व ती किती करावी, याला कोणत्याही प्रकारची ठरीव इयत्ता नसल्यामुळें कांहींकडून योग्य मर्यादेचें उल्लंघन होई, यांत कांहीं नवल नाहीं. आमचेकडील कांहीं नेटीव संस्थानांत व कित्येक रेल्वे कंपन्यांत आज या स्थितीचें जिवंत उदाहरण सांपडेल. तात्पर्य काय कीं, प्रथमावस्थेंत स्वसंतोषानें देण्याचीं जीं स्वल्प राजोपायनें असतात, त्यांपासून अखेरीस कर, तिजोरी, आणि नोकरांचें पगार या तीन गोष्टी उत्पन्न होतात.

हें राजकीय जमाबंदीचें प्रकरण नीट समजलें असतां, देवस्थानें आणि त्यांचीं उत्पन्नें कशीं अस्तित्वांत येतात, हें समजणें मुळींच कठीण नाहीं. सध्यां पृथ्वीच्या पाठीवर जे रानटी, अर्धवट सुधारलेले व पूर्ण सुधारलेले लोक आहेत, त्यांच्या सांप्रत स्थितीचा आणि पूर्वापार इतिहासाचा विचार केला असतां स्पष्टपणें असें दिसून येतें कीं, ज्याला आपण सध्यां बलि म्हणतों, म्हणजे देवताभाग म्हणतो, त्याची उत्पत्ति सामान्य उपायनांपासून म्हणजे सामाजिक देणग्यांपासून झाली आहे. देवतांची कल्पना महापुरुषांच्या पिशाचांपासून आली असल्यामुळें व पिशाचांचे व्यवहार जिवंत मनुष्याप्रमाणेंच चालतात असा प्राथमिक लोकांचा विश्वास असल्यामुळें, ज्याप्रमाणें बैल, घोडीं, कुत्रीं, ससे, कोंबडीं वगैरे जनावरें जिवंत राजास नजर करण्यांत येतात, त्याप्रमाणें तीं त्यांच्या थडग्यावर, त्यांच्या पिशाचांच्या चरितार्थासाठी कापण्यांत येतात; व त्याच पिशाचांपासून निर्माण झालेले जे महापिशाच म्हणजे देव; त्याच्या मंदिरांत म्हणजे देवळांतही या प्राण्यांचा संहार करण्यांत येतो. शिजलेल्या अन्नाच्या राजास मेजवान्या देतात; तें त्यांच्या

थडग्यांत किंवा चितेंत घालतात, आणि देवांपुढें नैवेद्यरूपानें मांडतात; सदर्हूप्रमाणें नव्या नवाळीची नजर जिवंत राजाला, मृतराजाला, व देवाला करतात. आवळे, चिंचा, मोहोर वगैरे देवास वाहण्याच्या प्रचाराची आंठवण वाचकांस दिली पाहिजे, असे नाहीं. दूध, तूप, मध, रस, ताडी, मदिरा, सोम इत्यादिकांचीं वायनें जशीं नृपतीला व मृतपितरांना, त्याप्रमाणेंच देवांनाही अर्पण करतात. ज्याप्रमाणें जिवंत राजापुढें व मृतपितरांपुढें, त्याप्रमाणेंच देवापुढेंही धूपदीप जाळायचें आणि गंधदान करावयाचें! सारांश राजा, राजवाडा आणि राजभाग; मेलेले पितर, थडगी किंवा चिता आणि श्राद्धान्न; व देव, देवालयें, आणि बलि अथवा नैवेद्य- या तीन त्रयींत पराकाष्ठेचें साम्य आहे. यांपैकीं पहिलीपासून दुसरीचे, आणि दुसरीपासून तिसरीचे विधि व आचार अनुकरणानें अस्तित्वांत आले आहेत. तेव्हां राजवाड्यांत ज्याप्रमाणें राजसेवकांची; त्याप्रमाणें देवांच्या भोंवतीं गुरवांची, बडव्यांची, आणि गयावळांची गर्दी असते, आणि राजस्थानाप्रमाणें देवस्थानांचाही थाट उठून जाऊन ती शेंकडों वर्षे अव्याहत चालतात, यांत कांहीं नवल नाहीं.



# भेटी, देवदर्शनें व यात्रा

आपल्या भाषेंतील 'भेट' हा शब्द द्व्यर्थी आहे. 'भेट' म्हणजे एकानें दुसऱ्याकडे जाणें, हा एक अर्थ. तसेंच जातांना देण्याकरितां बरोबर घेतलेली किंवा न जातां एकानें दुसऱ्यास धाडून दिलेली जी वस्तु, तिलाही 'भेट' म्हणतात. मागल्या लेखांत या दुसऱ्या अर्थाच्या भेटी पाठविण्याचा प्रघात कसा पडत जातो, हें सांगितलें आहे. आतां 'भेटीच्या' पहिल्या अर्थाच्या संबंधाने थोडेसें लिहावयाचें आहे.

उपायनें; विशेषत: कनिष्ठाकडून वरिष्ठास देण्यांत येतात हें मागें सांगण्यांत आलेंच आहे. तेव्हां हीं नेऊन देण्यासाठी कनिष्ठांनीं वरिष्ठाचे घरी जाण्याची चाल पडते हें स्वाभाविक आहे. राजाकडे किंवा देवाकडे रिक्त हस्तांनीं जाऊं नये, अशी सामान्य शास्त्राज्ञा किंवा फार प्राचीन कालापासून चालत आलेला संप्रदाय आहे. यावरून ज्या देशांत किंवा लोकांत राजसत्ता स्थापन झाली नाहीं, किंवा ज्यांना मेलेल्या आप्तांस किंवा त्यांपासून निर्माण होणाऱ्या देवतांस बलिसमर्पण केलें पाहिजे, असें वाटूं लागलेलें नाहीं, त्यांमध्यें एकानें दुसऱ्याकडे भेटण्यास जाण्याची चाल असण्याचा संभव नाहीं. आतां भेट घेण्यांत नेहमीं 'मी तुमचा किंकर किंवा आज्ञाधारक सेवक आहे' असें दाखविण्याचाच हेतु असतो असें नाहीं. कनिष्ठांनी वरिष्ठांविषयीं आपली निष्ठा प्रदर्शित करण्यासाठीं जाणें, हा भेटीचा मुख्य हेतु खरा. परंतु अलीकडे दुसऱ्याही अनेक कारणांसाठी एकमेकांच्या भेटी घेण्यांत येतात. आपणांपैकी एखादा जिज्ञासु मनुष्य इंग्लंडांत गेला असतां **स्पेन्सरसारखा** तत्त्ववेत्ता किंवा **ग्लॅडस्टनसारखा** लोकाग्रणी घरीं वागतो कसा, अभ्यास करतो कसा, सामान्य लोकांशीं बोलतो कसा, वगैरे गोष्टी प्रत्यक्ष पहाण्याच्या इराद्यानें त्याला भेटण्यास जाईल; तसेंच, कोणा एखाद्या मनुष्यास दुसऱ्याच्या वर्तनांत विशेष दोष असल्यास त्याला तो दाखविण्यासाठी त्याची भेट घेणें इष्ट वाटेल; किंवा एखाद्या परोपकारी सुखवस्तू गृहस्थाला कोणी मनुष्य संकटांत पडला आहे असें समजल्याबरोबर त्यास मदत करण्याची बुद्धि होऊन त्याच्या घरीं जावेसें वाटेल. तेव्हां अलीकडील प्रत्येक भेटींत प्रणिपातपूर्वक प्रभुभक्तिप्रदर्शनाचा आशय असतो, असें म्हणता येणार नाहीं. तथापि 'भेट'

घेण्याची मूळ चाल पडण्यास श्रेष्ठाला अभिवंदन करून त्याची मर्जी आपणावर सुप्रसन्न करून घेण्याची इच्छा कारण झाली असावी असें दिसते.

उत्तर ध्रुवाजवळच्या **एस्किमो**सारख्या ज्या लोकांत राजपुरुष अस्तित्वांत आलेला नाहीं, त्यांत भेटीचा संप्रदाय फार स्वल्प आहे किंवा मुळींच नाहीं, असें त्यांविषयीं चौकस प्रवाश्यांनी प्रसिद्ध केलेल्या माहितीवरून दिसतें. एकंदरीनें पाहतां भेटी घेण्याचा प्रचार मिश्र समाजांत फार दृष्टीस पडतो. एकाच जातीच्या लोकांनीं आपल्यापैकीं एकास आपला राजा किंवा नायक केलें, तरी त्याविषयीं आपली निष्ठा प्रगट करण्यासाठीं त्याला वारंवार भेटण्यास जाण्याची चाल पडत नाही, व त्यालाही त्या गोष्टीची इतकी परवा वाटत नाहीं. पण मिश्र समाजाची तशी गोष्ट नाहीं. एका जातीच्या लोकांनीं दुसऱ्या जातीच्या लोकांस जिंकिलें असतां, जिंकणाऱ्या जातीच्या लोकांस, जितजातीचे लोक व विशेषत: त्यांचे नायक राजनिष्ठ आहेत किंवा नाहींत, हें पहाणें विशेष अगत्याचें असतें. यामुळें मिश्र समाजांत मुख्य नायकास म्हणजे राजास किंवा बादशहास उपनायकांनीं म्हणजे मांडलिकांनीं वारंवार भेटण्यास जाण्याचा प्रघात पडतो. दिल्लीचे मोंगल बादशहा किंवा पेशवे मोठमोठाले दरबार भरवून मांडलिकांकडून नजराणे घेत व त्यांना पोषाख देत, हे सर्वांस ठाऊक आहेच. सध्याही राणीच्या वाढदिवसास इलाख्यांचे गर्व्हनर व हिंदुस्थानचे व्हाइसरॉय दरबार भरवून कित्येकांस पोषाख व पदव्या देतात, आणि मधूनमधून नॉनऑफिशीअल लोकांच्या भेटी घेण्यासाठीं छोटेखानी दरबार किंवा लेव्ही करतात, त्यांचें इंगित तरी हेंच आहे. राजदरबारांत हजर राहून स्वामीस मुजरा करणें आणि नजराणा देणें यात 'मी तुमचा दास आहे, मला तुमचा अंमल मान्य आहे, व मी तुमच्याविरुद्ध कोणत्याही प्रकारची फंदफितुरी करण्यांत गुंतलों नाहीं' असें दाखविण्यासारखें होय; निदान भेटीस येणाऱ्याच्या बाह्य वर्तनावरून तरी तसें अनुमान करणें भाग पडतें. त्याच्या उलट, बोलावणें गेलें असून जो दरबारास आला नाहीं, किंवा ज्यानें नजराणा पाठविला नाहीं अशाच्या मनांत कांहीं तरी पापबुद्धि उत्पन्न झाली आहे असा तर्क होऊं लागतो, व सर्व मांडलिकांस सक्तीनें दरबारांस बोलावून आणून त्यांच्याकडून नजराणे घेण्याचा आणि त्यास राजधानींत कांहीं दिवस रहाण्यास लावण्याचा प्रघात पडतो. या कामासाठी बादशहा व राजधिराजे पाहिजे तितका खर्च करण्यास तयार असतात; पण एकूण एक मांडलिकानें वर्षांतून एकदोन वेळ तरी राजदरबारीं येऊन आपली स्वामिभक्तीची हजीरी द्यावी, असें त्यांस वाटत असतें. पर्वांपर्यंत जपानांतील सरदारांस किंवा मांडलिकांस आपापल्या जहागिरींत वर्षांतील बारा महिन्यांपैकीं फक्त सहा महिने घालविण्याची परवागनी असे. दुसरे सहा महिने

त्यांनीं येड्डो येथें घालवून प्रपंचसुख अनुभवावें असा निर्बंध असे. प्रपंचसुख असें म्हणण्याचें कारण असें कीं, या सरदारांनीं बंडखोर न व्हावें म्हणून त्यांचीं बायकामुलें 'ओलीस' म्हणून नेहमीं राजधानींत ठेवलेली असत! आपल्या मिजासखोर मोंगल बादशहांच्या अंमलांत तर या प्रचाराच्या हास्यास्पदतेची कमाल होऊन गेली होती. या बादशहांपैकीं कित्येकांच्या अमदानींत ठरीव सरदारांनीं दिवसांतून दोन वेळां, म्हणजे सकाळीं अकरा वाजण्याचे सुमारास न्यायनिवाडा चालला असतां, व रात्रीचे दहाचे सुमारास राजकीय प्रकरणांची वाटाघाट होत असतां, तख्ताधिपतीस सलाम करण्यास आलेंच पाहिजे, असा नियम असे! कोणास ही कदाचित अतिशयोक्ति वाटेल; पण जम्मू व काश्मीर येथें ही प्रात्याहिक द्विवार प्रणिपातपद्धति आजमितीस जागृत आहे. तसेंच आमच्या एका मित्रानें एकदां आम्हांस असें सांगितल्याचें स्मरतें कीं, बडोद्यासारख्या इंग्रजी धर्तीवर आलेल्या संस्थानांतही असे कांहीं वृद्ध राजभक्त आहेत कीं, महाराज राजधानींत असोत किंवा नसोत, त्यांना वाड्यांत जाऊन महाराजांच्या गादीला, निदान वाड्याला तरी सकाळसंध्याकाळ मुजरा केल्याशिवाय अन्न गोड लागावयाचें नाहीं! असो. ज्या ठिकाणीं सर्वांनीं मुख्य नायकास किंवा राजास भेटण्यास येण्याची सोय नसते, त्याठिकाणीं त्यांनीं त्यांच्या प्रतिनिधींस व मंत्र्यांस भेटावें असें ठरविलेलें असतें; म्हणजे मांडलिकांनी महाराजांस भेटावें व सामान्य लोकांनीं मंत्र्यांस भेटावें, असा नियम होतो; व हाच नियम थोड्याशा भेदानें येथेंही जे दरबार प्रतिवर्षीं भरविण्यांत येतात, त्यांत दृष्टीस पडतो.

मोठमोठे राजे आणि त्यांचे मांडलिक यांच्या अन्योन्य भेटीचा हा प्रकार झाला. त्यांचेंच अनुकरण इतर पदवींचे लोक करतात. कनिष्ठानें वरिष्ठास भेटण्यास जावें हा साधारण नियम; जर वरिष्ठ कधीं कनिष्ठास भेटावयास गेला तर तो अनुग्रह समजावयाचा. कर्जदारांनीं सावकारास, कुळांनीं जमीनदारास, पक्षकारांनीं वकिलास, शिष्यांनीं गुरूस, धाकट्या भावांनीं वडील भावास, मुलांनीं मातापितरांस, खालच्या अधिकाऱ्यांनी वरच्या अधिकाऱ्यास व सांसारिकांनी परमार्थरतास भेटण्यास जावें, अशी पद्धत सर्वत्र पडली आहे, व हिचें उल्लंघन चांगल्या कारणांशिवाय कोठेंही होत नाहीं. दसऱ्यासारख्या किंवा संक्रांतीसारख्या सणास प्रत्येक वर्गांतील मोठमोठ्या लोकांनीं बिछायती घालून व उजव्या किंवा डाव्या बाजूस पानसुपारीचीं ताटें ठेववून भेटीस येणाऱ्या मंडळीची वाट पहात बसावें, हा या सणांस एकमेकांच्या भेटी घेण्याचा जुना प्रकार होय. यांत अलीकडे बरेंच अंतर झालें आहे, व पुढें याहूनही अधिक होण्याचा संभव आहे. कारण सुधारलेल्या किंवा सुधारूं लागलेल्या देशांत एका प्रकारची समता वाढत असते,

व या समतेमुळें एका पक्षाची पूजनीयता आणि दुसऱ्या पक्षाची पूजकता यांचा हळूं हळूं लोप होत असतो. समाजरचनेची आद्यबंधनें बलात्कारात्मक असतात, व जोंपर्यंत किंवा ज्या बाबतींत हें बलात्कारतत्व जारीनें अंमलांत असतें, तोंपर्यंत व त्या बाबतींत कनिष्ठांचा वरिष्ठांशी वर सांगितल्याप्रमाणें व्यवहार चालतो. युरोपांतील सुधारलेल्या देशांत आजमितीस लष्करी खात्यांतील अधिकाऱ्यांचे एकमेकांशी वागण्याचे जे नियम आहेत, ते इतर खात्यातील नियमांपेक्षां कमी सक्तीचे आहेत. ज्या देशांत एकसत्ता प्रबल असते त्यांतील आचारांची रहाटी बऱ्याच अंशीं लष्कराच्या रहाटीसारखी असते, असे म्हणण्यास हरकत नाहीं. एकसत्ता क्षीण होत जाऊन लोकसत्ता प्रबल होत गेली, आणि लोकांत ज्ञानाचा आणि संपत्तीचा बराच प्रसार झाला म्हणजे बलात्कारतत्व लयास जाऊन संमतितत्त्व तत्स्थानापन्न होतें, आणि तसें झालें म्हणजे सामाजिक व राजकीय आचारांस समतेचें वळण लागूं लागतें. धर्मासंबंधानेंही अशाच प्रकारची स्थित्यंतरें होत जातात, पण त्यांस थोडासा अधिक काळ लागतो. धर्माचार राज्याचारांच्या अगोदर अस्तित्वांत येऊन त्यांचें वैरूप्यही त्यापेक्षां सावकाशीनें नाहींसें होतें. राजाच्या अगोदर देवाची कल्पना येत असल्यामुळें व देव हा राजाहून मोठा मानिला असल्यामुळे; राजाविषयीं पूज्यबुद्धि नाहींशीं झाली तरी देवाविषयी ती नाहींशीं होत नाहीं, व राजे आणि राजवाडे पंचत्वाप्रत गेले तरी देवालयांत जाऊन प्रार्थना करण्याची पद्धत सुरू असते. धर्मसंबंधाचें बरेंच ज्ञान वाढलें तर एवढाच भेद होतो कीं, शुद्ध पाषाणास किंवा मनुष्याकृति पाषाणमूर्तीस देव कल्पून व त्यांचे ठाई मनुष्य स्वभावासारख्या देवस्वभावाची कल्पना करून, मनुष्याच्या अन्तर्बाह्येंद्रियांस ज्या गोष्टींनीं समाधान व आनंद होतात, त्याच गोष्टींनीं शिलाकर देवतांसही संतोष होत असेल, असें मानणें बरोबर नाहीं असे वाटूं लागून, सजीव व निर्जीव पदार्थांच्या बलिप्रदानानें त्यांचें अर्चन करून त्यांस सुप्रसन्न करून घेण्याचा प्रघात मागें पडत जातो, व मूर्तिशून्य अशा मंदिरांत नियमित काळीं व दिवशीं; निराकार परमेश्वरास प्रेमपूर्वक डोळे मिटून, हात जोडून, गुढगे टेंकून व प्रणिपात करून भजण्याची व स्तवण्याची पद्धति सुरू होते. ख्रिस्तीधर्म, मुसलमानी धर्म व इकडील कांहीं धर्मपंथ अशा प्रकारचे आहेत. मूर्तिपूजेचा लय होऊन निराकार ईश्वररूपाचें ध्यान होऊं लागणें, हें धर्माचें बरेंच उन्नत स्वरूप होय यात संशय नाहीं. तरी हें स्वरूप त्यास प्राप्त झालें असतांहीं, तदनुयायांस मूर्तिपूजाकालांत लागलेल्या साऱ्या सवई नाहींशा होत नाहींत. ख्रिस्ती व मुसलमान लोकांनीं फक्त मूर्तिपूजा काय ती टाकली आहे; बाकी त्यांचे इतर धर्माचार बऱ्याच अंशीं आम्हा मूर्तिपूजकांच्या धर्माचारासारखे आहेत. जातप्रेतादिकांच्या संस्काराचें

बंड जसें आम्हांत तसें त्यांतही अद्यापि बरेंच आहे. धर्माधिकाऱ्यांचें वर्चस्व जसें आमच्या इकडील अज्ञ लोकांवर व स्त्रियांवर अजून जबर आहे, तसें तिकडेही आहे. इकडील भाविक जसे प्रत्येक दिवशीं देवदर्शनास जातात, त्याप्रमाणें प्रत्येक दिवशीं मशिदींत जाऊन नमाझ पढणारे व **चर्चात** जाऊन **प्रेअर** करणारे भाविक त्यांच्यातही आहेत. ज्याप्रमाणें देवास भेटण्यास व भजण्यास घरापेक्षां देऊळ विशेष सोईचें आहे असें आम्हांस वाटतें, त्याप्रमाणें खिस्त्यांस व मुसलमानांसही वाटतें. पवित्र भूमीस यात्रा करण्याची उत्कंठा क्रूसवाल्यांच्या अंत:करणांत एकदा जेवढी प्रबल होती, तेवढी आतां नाहीं हें कबूल केलें पाहिजे; पण श्रीकाशीस जाऊ इच्छिणाऱ्या भाविक हिंदूंची संख्या मक्केस जाऊं इच्छिणाऱ्या महंमदीयांच्या संख्येपेक्षां जास्त असेल असें आम्हांस वाटत नाहीं. कदाचित् जातिभेदाच्या व परधर्मीयांकडून धर्मांतर करविण्याच्या वगैरे संबंधानें मुसलमान व खिस्ती धर्मांस विशेष श्रेष्ठत्व आलें आहे असें कित्येकांचें म्हणणें असेल, व कदाचित तें बरोबरही असेल; त्याविषयीं आम्हांस कांहीं एक म्हणावयाचें नाहीं. आमचें इतकेंच म्हणणें आहे कीं, धर्मसंबंधीं सारतत्त्वें, ठोकळ समजुती, आणि सामान्य आचार आम्हां तिन्ही लोकांत सारखेच आहेत व देवाच्या भेटीस जाण्याचा म्हणजे देवदर्शन घेण्याचा आचार आजमितीस आम्हांत जितका रूढ आहे, तितकाच त्या दोन, मूर्तीस न भजणाऱ्या, लोकांतही आहे. खिस्ती लोकांत अर्वाचीन ज्ञानप्रसारामुळे यात्रांचा नाद बराच कमी झाला आहे, व चर्चला जाणाऱ्यांची संख्याही प्रतिवर्षी कमी होत आहे. ह्या स्थित्यंतराच्या बरेवाईटपणाविषयीं अभिप्राय येथें देण्याचें कारण नाहीं. येथें इतकेंच सांगितलें पाहिजे कीं, ज्या ज्ञानामुळें खिस्ती लोकांच्या धर्मवृत्तींत असा बदल झाला आहे, तेंच ज्ञान इकडे पसरलें, (व पसरणार याविषयी यत्किंचित् संशय दिसत नाही) तर या देशातील लोकांच्या धर्मवृत्तींतही तसें स्थित्यंतर होणें अपरिहार्य आहे.



# पुण्याचे लोकांनो, सावध व्हा, सावध व्हा

आज सर्व महाराष्ट्रभर तुमची कीर्ति दुमदुमत आहे ती कां? तुमच्या अंगी स्वदेशाभिमान, बुद्धिमत्ता, वक्तृत्व, स्पष्टवक्तेपणा, स्वातंत्र्य इत्यादि अनेक गुण वास करीत होते म्हणून? कोणत्याही शहराची कीर्ति, त्यांतील जे पांचचार सुशिक्षित गृहस्थ असतात, त्यांवर अवलंबून असते. त्याप्रमाणें तुमचीही होती. परंतु आतां मात्र ती एका उदार, बुद्धिमान, सहिष्णू, सुशील, परोपकारी व तुमच्याविषयीं रात्रंदिवस कळकळ बाळगणाऱ्या पुरुषावर अवलंबून आहे. जर तुमच्या दुर्दैवानें अशा महंतास बाहेर जाणें भाग पडलें, तर तुमची स्थिति काय होणार? तुम्हांला तर चटोरपणाची, अपमान करण्याची, कृतघ्नपणाची इतकी संवय लागून गेली आहे कीं थेट वामनरावापासून तों विनाकारण बी. ए. पर्यंत असें करण्यांत तुम्हाला गौरव वाटतो. विद्येनें, अधिकारानें, संपत्तीनें, सहिष्णुत्वानें व इतर पुष्कळ नैसर्गिक गुणांनीं तुमच्याहून जे श्रेष्ठ त्यांची विटंबना करणें, अवहेलना करणें (व ती कोणाकडून? ज्या पोरांना विद्येचा गंध नाहीं, देशसुधारणा, देशसेवा, सामाजिक सुधारणा अशा विषयांवर ज्यांना मत देण्यास अधिकार पोहोंचत नाही अशा पोरांकडून) या सारखें महत् पातक दुसरें कोणतें? आज धडधडीत आपण डोळ्यांनी पाहतों कीं, पुण्यांतील एक हिरा जर गमावला तर तसा किंवा तशासारखा दुसरा मिळणें म्हणजे कोण पंचाईत! कृष्णशास्त्री, केरूनाना, विष्णुशास्त्री, माधवराव कुंटे असे लोक; निर्घृण काल एका पाठीमागून एक बलात्कारेंकरून नेत आहे. अशा लोकांच्या मरणाने समाजबंधनाच्या अत्यावश्यक साखळ्या अचानक गळून पडताहेत. अशी स्थिति असतां अजून देखील तुम्ही जागें होऊं नये काय?अशा खिण्डी तुमच्या शहरांत पडतांना पाहून तुम्ही स्वस्थ बसणें, किंवा झालेल्या स्थित्यंतराची कल्पना सुद्धां तुमच्या मनांत न येणें हें कोणच्या स्थितीचें दर्शक होय बरें? अशी कल्पना करा की, गांवांत एक परदेशाहून विद्वान मनुष्य आला व त्याला इकडील वादग्रस्त विषयावर माहिती करून घ्यावयाची आहे. तर तुमच्या गावात पांचचार लोक आहेत कां; कीं ज्यांचीं मतें कांहीं विषयावर ठाम झालीं आहेत? वाचाळपणा पुण्यांत तर इतका माजला आहे कीं, वाटेल त्यानें वाटेल त्या विषयावर बोलावें व यथेच्छ तोंडसुख घ्यावें. असा पुरुष

एखादा सांपडेल कीं, जो विषयासंबंधानें पूर्ण माहिती मिळवून बोलेल, बाकी केनसाहेबांसारखे गृहस्थ येवोत, आमची पुण्यांतील मंडळी त्यांच्याजवळ सुद्धां बाता झोडायला तयार! फॉरेस्टसंबंधानें माहिती विचारा, कीं उठलेच आमच्यांतले एखादे व दिली माहिती २-३ वाक्यांत ठोकून! अबकारी खात्यासंबंधानें काय, जमाबंदी काय, मिठासंबंधानें काय, माहिती म्हणजे ओतप्रोत. माहिती इतकी भरपूर कीं, वर्तमानपत्र चालविण्याची तर कधींच पंचाईत पडत नाहीं.

पुण्यांतील लोकांनो, ज्यांना ज्यांना म्हणून तुमची आंतली माहिती आहे ते सर्व तुमची दिखाऊ विद्वत्ता पाहून गालांतल्या गालांत हांसतात. कांहीं लोकांना तर तुमचा वृथाभिमान, पोकळ गर्व व वरकांती विद्या पाहून तिटकारा येतो. बरें इतकेंही असून बढाई कोण? ह्याला काय येतें, त्याला काय येतें, तो कोण शहाणा, त्याचेंच का ऐकावें, अशी तर घमंडी. विचारवैचित्र्य व विचारस्वातंत्र्य यांशिवाय मनुष्याची उन्नति व्हावयाची नाहीं हें खरें. परंतु एवढ्याचकरितां मनुष्यानें बहकत सुटणें, हें माणुसकीचें काम नव्हे. केवळ विषयांची पूर्ण माहिती म्हणजे विषयसर्वस्व नव्हे; हीही गोष्ट प्रत्येकानें ध्यानांत ठेवण्याजोगी आहे. ही झाली शिक्षण मिळालेल्या लोकांची स्थिति.

मध्यमप्रतीचे शिक्षण मिळालेल्या लोकांची स्थिति याहूनही भयंकर आहे. मोठ्या माणसास भरसभेंत बेजबाब करणें, वडील माणसांचा मान न राखणें, अश्लील शब्द उच्चारणें, अर्थाचा अनर्थ करणें ह्या गुणांचें आदिपीठ पुणें शहर होऊन बसलें आहे. पुण्यांतील लोकांनों, अजून तरी जागे व्हा, आम्ही पुण्यपत्तनवासी आहोंत, असें म्हणण्याची देखील लोकांस शरम वाटूं लागली. बाहेरगांवच्या लोकांना तुमची किंमत कळून चुकली. ऐरिश लोकांना जसा कोअर्शन आक्ट लावला, तसा येथील लोकांना लावला तर कांहीं चांगला परिणाम झाला तर होईल. कांहीं सुशिक्षित लोकांचा जसा समज आहे की, हा परिणाम शिक्षणाचा नव्हे! इतिहासांत हें शिक्षण मिळतें, कां गणितांत मिळते, कां रसायन शास्त्रांत मिळतें, असें ते विचारतात. त्यांना उत्तर येवढेंच कीं, तें हिराबागेंत मिळतें. हल्लींची पुण्याची स्थिति आफ्रिकेंतील कोणच्याही रानटी शहरापेक्षा अधिक चांगली आहे असें म्हणावयाला आज कांहीं जागा नाहीं. कोणच्याही संभावित मनुष्याला किंवा स्त्रीला तुमच्या शहरच्या समाजापुढें येऊन बोलावें असें कधींही वाटणार नाहीं. तुम्ही ही आपली भयंकर स्थिति ओळखून सुधारण्याचा प्रयत्न जर न कराल; तर याचा परिणाम याहूनही भयंकर होईल. मुळीं, हीच स्थिति सुधारण्याला पांच चार वर्षें लागतील. ज्यांना ज्यांना म्हणून पंडिता रमाबाईंचे हिराबागेंतील व्याख्यानाची आठवण होईल, त्यांच्या अंगांवर रोमांचच उभे

राहतील, व पुण्यातील उच्च प्रतीचे ब्राह्मणाला विद्येनें अतिशय मागसलेल्या लोकांत सांपडणाऱ्या अश्लील शब्दांचें बाळकडूच दिलें आहे, अशी पक्की खातरी होईल. स्त्रीशिक्षणास लोकांची संमति असो किंवा नसो. ६०-७० कोसांवरून ह्या विदुषी बाई इतर देशांत स्त्रियांनीं कसकसे पराक्रम केले हे सांगण्यास मुद्दाम आल्या; पण त्यांचें भाषण सावधान चित्तानें ऐकून घेण्याइतका देखील सभ्यपणा पुण्यांत (जें विद्येचें माहेरघर असें लोक म्हणतात!!) नसावा ही गोष्ट फार लाजिरवाणी आहे. शहाण्या लोकांची अशी समजूत आहे कीं, पुरुषसमाजामध्ये स्त्रिया असल्या म्हणजे पुरुषांवर एक प्रकारचा दाब असतो. अनीतीचे शब्द स्त्रियांपुढें उच्चारण्यास त्यास शरम वाटते. पण आमच्या पुण्याची स्थिति त्याहून अगदी उलट; कारण पुण्याचे लोक पडले फार शहाणे. अशा वेळी त्यांच्या नीतीला उमाळा फुटतो.

जोंपर्यंत स्त्रीजातीविषयीं व स्त्रियांच्या असाधारण गुणांबद्दल पूज्यबुद्धि उत्पन्न झाली नाहीं, जोंपर्यंत स्त्री म्हणजे प्रजाजननयंत्र होय, जोंपर्यंत स्त्री तुमची दासी होय, तोंपर्यंत हा उद्दामपणा व बेशरमपणा जाणें फार कठिण आहे. लोकशिक्षणाकरितां ज्यांचें जनन; अशी पुण्यांतील कांहीं वर्तमानपत्रें निलाजरेपणाच्या व तिरस्करणीय कृत्यांवर पांघरूण घालतात, व कांहीं तर पाठ थोपटतात व म्हणतात कीं, वाहवारे बच्यांनो, गाजिवलीत आज, राखलीत बाजू!! धन्य तुमची!! आज आपल्या शहराचा वा मातापितरांचा उद्धार केलात. कोण भयंकर स्थिति ही! 'ज्ञानप्रकाशा'सारखे म्हणतात कीं, जरी बागेंत दाटीमुळें गडबड झाली तरी लोकांचें वर्तन कांहीं वाईट नव्हतें. बरोबरच आहे. दाटी होती म्हणून अश्लील शब्द पोरें बोललीं व शहाणे लोक (!!) हासले!!! बाकी पुण्याचे लोक फार गरीब व नीतिमान!! असो. ज्ञानप्रकाश जेथें पडतो, तेथें ही स्थिति! जर लोकांना खरोखर त्या सर्व गोष्टींबद्दल वाईट वाटत असलें, जर त्यांना आपल्या मुलाबाळांची काळजी असली, व जर आपल्या जुनाट व नामांकित शहराची कीर्ति राखावयाची असली, तर लवकर जागे व्हा, व आपली शोचनीय स्थिति सुधारा.

*

# आमची एक दुष्ट खोड : आळस

**आलस्यं हि मनुष्याणां शरीरस्थो महारिपुः।**

समाजोत्कर्षाचा एक मुख्य घटक व्यापारवृद्धि आहे, व तो होण्यास उत्पादक उद्योग वाढला पाहिजे, हे मागे सांगितलें. पण दुर्दैवानें आमच्या येथें उत्पादक उद्योगाविषयींच रड आहे असें नाहीं; अनुत्पादक उद्योगाची सुद्धां आम्हांस म्हणण्यासारखी हौस नाहीं. आपण ज्या स्थितींत उपजलों असूं, ती स्थिति कसेंही करून आपणांस कायम ठेवतां आली; म्हणजे आपण कृतकृत्य झालों असा आपल्यापैकीं बहुतेकांचा समज असतो. असलेल्या स्थितीहून चांगली स्थिति यावी, अशी इच्छा करणारे पुष्कळ आहेत, पण ती प्राप्त होण्यासारखे, परिश्रम करणारे इसम शेंकडा पांच सुद्धां मिळणार नाहींत. उत्पादक श्रम म्हणजे काय; राष्ट्राची संपत्ति वाढण्यास त्या श्रमांची अवश्यकता किती आहे; वगैरे गोष्टी सुधारलेल्या राष्ट्रांतील साऱ्याच लोकांस समजत असतात असें नाहीं. पण त्या सर्वांत एक विशेष दिसून येत असतो, तो हा; कीं येथील वयांत आलेला प्रत्येक इसम रात्रंदिवस कष्ट करण्यांत चूर होऊन गेलेला असतो. लोकांत उद्योग करण्याची हौस व संवय असली म्हणजे त्यांच्या उद्योगास चांगलें वळण लावून देऊन तो फायदेशीर होईल असें करणें कठिण नाही. तें काम विचारी लोकांचें आहे, व तें त्यांस सहज करतां येतें. पण सारी जी अडचण येऊन पडते ती आळसांत मौज वाटणाऱ्या लोकांस ती वाटेनाशी कशी होईल, येथें आहे. मागल्या लेखांत असें म्हटलें आहे कीं, आमच्या लोकांस अंमलदारीचा फार षोक आहे. केवळ उद्योगदृष्टीनेंच पाहिलें, तर हा षोक दूषणीय आहे असें नाहीं. जर्मन लोकांनाही सरकारी नोकऱ्यांचें असेंच वेड आहे. पण त्यांत व आम्हांत जो मोठा भेद आहे तो हा कीं, **व्हॉन जेफकेन्** सरकारी नोकर असला तरी सकाळपासून संध्याकाळपर्यंत इराणीवारूप्रमाणें जिवाकडे न पहातां काबाडकष्ट करीत असतो! आमच्या लोकांची तशी गोष्ट नाहीं. आमच्या सेवाचिकीर्षु उमेदवारांत जी थोडीशी उद्योगापरायणता दिसून येते ती कोठपर्यंत? तर अंमलदारीचा हुकूम मिळेतोंपर्यंत. ''अमक्या अमक्या ठिकाणीं तुम्हांस सबजज्ज किंवा मामलतदार नेमिलें आहे.'' असा हुकूम हातीं पडला कीं, आमच्या इकडील सरकारी नोकरांच्या रावसाहेबी

खाक्यास आरंभ झाला! नोकरीवर रुजूं होण्यापूर्वी पहिला विचार काय कीं, परीक्षेंत पसार होण्यासाठीं कुटून काढलेल्या पुस्तकांची वाट कशी लावावी? कां ती कोणांस देऊन टाकावीं, कां त्यांचा गठ्ठा करून तो कोठें तरी गाडून टाकावा, का त्यांची आताराच्या घरीं रवानगी करावी, कां त्यांचा पाण्यानें किंवा विस्तवानें मागमूस नाहींसा करावा? यांपैकीं एखाद्या पद्धतीनें ज्यांच्या समागमांत रात्रीच्या रात्री घालविल्या, व ज्यांना पोटच्या पोराप्रमाणें हातावर व पोटावर खेळविलें, आणि ज्यांच्या साहाय्यानें दोन पैसे कमाविण्याची अक्कल आली, त्यांची वांट लावल्यावर नोकरीवर हजर व्हावयाचें! आणि ही हजीरी मंजूर होऊन सरकारी **ग्याझेटांत** नांव दाखल झालें कीं, संसारसमरभूमींत आपण विजयाचा झेंडा लाविला, असें या नादान वीरास वाटतें. येथून पुढें केलेल्या कष्टांचें फळ भोगण्याशिवाय, आपणांस कांहीं कर्तव्य राहिलें नाहीं, अशी त्यांची वृत्ति होते आणि सुखोपभोगाशिवाय दुसरें कांहीं करावयाचें नाहीं असा त्यांचा निर्धार होतो. आधुनिक सुशिक्षित तरुण सरकारी नोकरांचें हें चित्र फाजील काढलें आहे, असें कोणास वाटणार आहे; आणि खरोखरीच तें तसें असेल तर आम्ही आपली चुकी कबूल करून ती केल्याबद्दल त्यांची क्षमा मागूं; पण तसें करण्यापूर्वी त्यांनीं ती आमच्या पदरांत घातली पाहिजे. कांहीं व्यक्तींचें वर्तन अपवादक असेल. पण आम्ही जें येथें लिहीत आहों तें व्यक्तींच्या संबंधानें नाहीं; वर्गाच्या संबंधानें आहे. आणि अशा रीतीनें या गोष्टीचा विचार केला असतां, वरील लिहिण्यांत अतिशयोक्ति आहे, असें कोणासही वाटणार नाहीं. सध्यां आमच्या न्यायखात्यांत आणि जमाबंदीखात्यांत खासे खासे अनेक सुशिक्षित तरुण आहेत, त्यांपैकीं पुष्कळांना, विशेषत: न्यायखात्यांतील इसमांना, युनिव्हर्सिटीच्या पदव्या मिळालेल्या आहेत. राष्ट्रोन्नति म्हणजे काय; ती होते कशानें; जीं राष्ट्रें लयास गेलीं तीं कशानें गेलीं; आमचें डोकें वर निघण्यास आम्हांस काय केलें पाहिजे, वगैरे गोष्टींचें ज्ञान ज्याला झालेलें नाहीं, असा मनुष्य या सेवाकुल तरुणांच्या समुदायांत एकही सांपडणार नाहीं. असें असून नोकरी कायम राहण्यास, किंवा फार झालें तर बढती होण्यास लागणाऱ्या अपरिहार्य उद्योगाशिवाय अधिक उद्योग करणारे इसम, येवढ्या सुशिक्षितांच्या तांड्यांत किती आहेत? कचेरींत पुढें आलेलें काम कसें तरी उडवून द्यावें; शिरस्तेदारांवर दरोबस्त जबाबदारी टाकून नि:शंकपणे पुढें आणिलेल्या प्रकरणावर लहान मोठीं कोंबडीं करावी; हुजुरांतून आलेल्या हुकमांची वाट जेमतेम लावावी, आणि वरिष्ठ अधिकारी तपासणीस आला असतां त्याच्या भोंवतीं भोंवतीं घिरट्या घालून, होईल तितक्या उत्तम रीतीनें त्याची सरबराई ठेऊन वेळ मारून न्यावी, ही यांची कर्तव्यकल्पना! अगोदर उशीरानें

उठावयाचें; नंतर शौचास जाण्यापूर्वी बराच वेळ विड्या फुंकण्यांत, चिलमी ओढण्यांत, किंवा तंबाखू चोळण्यांत जावयाचा! मुखमार्जन आटोपल्यावर संतानसमुदायासह तरुण कुटुंबिनीशीं सुखसंलाप करीत करीत चहापान करावयाचें किंवा कांहीं फराळ उरकावयाचा! हा प्रकार आटोपल्यावर पुन: एकदां पान तंबाखूचा बार भरावयाचा! तों कचेरींतला कोणी तरी कारकून प्रकरणें घेऊन येतो. मग बोलत बोलत त्यांवर सह्या करण्याच्या कामास सुरुवात व्हावयाची, व हें बरेंच वेळ चालावयाचें. हें चाललें असतां कोणी भेटावयास आलें तर त्याच्याशीं बोलणें; धोबी, कोष्टी, वाणी, मारवाडी, कडबेवाला, लाकुडवाला, वगैरे कोणी आला असल्यास किंवा बोलावून आणला असल्यास, त्याच्याशीं घासघीस चालावयाची! या घासाघिशींत मधून मधून अधिकाराची थोडीशी जरब दाखवावयाची, व तसें करण्यास पुढें असलेल्या कारकुनाकडून, शिपायाकडून, व इतर गृहस्थांकडून, अनुमोदन व प्रोत्साहन मिळत असावयाचे! अशा थाटांत तास दोन तास घालवून पुढें स्नानास उठावयाचें. स्नानभोजन व पानतंबाखू आटोपल्यावर बायकोमुलांशीं गप्पा मारीत कांहीं वेळ काढावयाचा, किंवा थोडीशी वामकुक्षी घ्यावयाची! नंतर कचेरीस जाण्याचा विचार! तेथलें काम करण्याच्या पद्धतीचा वर उल्लेख केलाच आहे. संध्याकाळीं घरीं परत आल्यावर जेवणाच्या अगोदर व मागून घरांतल्या किंवा बाहेरच्या माणसांशीं गप्पा मारावयाच्या, किंवा विशेष संघट्टनांतले येणारे जाणारे स्नेही असल्यास गंजिफांस, सोंगट्यांस किंवा इस्पिकांस उदार आश्रय द्यावयाचा! अशा प्रकारें आमचे बहुतेक तरुण रावसाहेब आपला कालक्रम करीत असतात, असें आम्ही उघड उघड सांगतों. नाहीं म्हणण्यास कोणाची छाती असेल तर त्यानें नांवानिशीं पुढें यावें. फार झालें तर मामलतदारांच्या वतीनें या पद्धतींत आणखी एक कलम चढवावें लागेल, तें हें कीं, त्यांना घोड्यावर स्वार होऊन फिरावें लागतें; त्यामुळें त्यांचें उपभोगयंत्र मुनसिफांच्या यंत्राप्रमाणें एकसारखें चालत नाहीं. अशा प्रकारच्या आयुष्यक्रमांत सुख मानून तदनुसार वागणाऱ्या आत्मवंचक रावसाहेबांची सुशिक्षित मनें गंजत असतात, व शरीरांस मांद्य येऊन त्यांना अनेक व्याधि जडत असतात, ही गोष्ट त्यांच्या लक्षांत सुद्धां येत नाहीं! सतत स्त्रीसांनिध्यामुळें कोणाची कामवासना मंद झालेली असते, ती प्रज्वलित कोणत्या उपायांनीं होईल अशा पंचायतींत कांही जण पडलेले असतात; कित्येकांस अग्निमांद्यानें घेरलें असल्यामुळें क्षुत्क्षोभ कशानें होईल अशी चिंता लागलेली असते; सारांश, कोणास मधुमेह, कोणास जीर्णज्वर, कोणास मस्तकशूल, कोणास विस्तृत यकृत् याप्रमाणें या विषयसुखरत निरुद्योगी रावसाहेबांपैकीं, बहुतेकांच्या पाठीमागें कांहींना कांहीं तरी लचांड लागलेलें असतें!

अशापासून विशेष त्रास होऊं लागला कीं, घ्या 'सिक लिव्ह' आणि पळा पुण्यास अथवा मुंबईस! किंवा जे कोणी येथल्या किंवा मुंबईच्या प्रसिद्ध डॉक्टरांकडे वारंवार जात येत असतील, त्यांच्या पहाण्यांत असले दोंदील, फिकट, कृश, उत्साहशून्य, व किरकिर करणारे पुष्कळ रावसाहेब येत असतील असें आमचें अनुमान आहे, व तें बहुश: खोटें होणार नाहीं, अशी आमच्या स्वल्प माहितीवरून आमची खातरी आहे. सामान्य सुखांचा अभिलाष करणाऱ्या आमच्या तरुण सुशिक्षित अंमलदारांची ही गोष्ट झाली. हे बहुश: मोठ्या दुर्व्यसनापासून अलिप्त असतात. यांचें वर्तन निरुपद्रवी असतें. आपल्याकडून होईल तितका चोख न्याय करण्यास हे झटत असतात. बायकोपोरांस यांच्या सहवासांत मोठें सुख असतें. एकंदरींत निरुद्योगाशिवाय म्हणण्यासारखें व्यसन यांचे अंगी नसल्यामुळें त्यांची अंमलदारी लोकांस त्रासदायक होत नाहीं. पण याखेरीज अंमलदाराचा आणखी एक वर्ग आहे. त्यांत दोन तीन प्रकारचे लोक येतात; शिकलेले, अर्धवट शिकलेले, व मुळींच न शिकलेले, यांपैकीं शेवटले पहिल्या पिढींतले आहेत. या जुन्या खोडांपैकीं कांहींचें वर्तन अनुकरणीय असेल याबद्दल आम्हांस शंका नाहीं. पण सामान्यपणें हे सारे वृद्धकपी, आणि यांच्या जोडीचे कांहीं शिकलेले व कांहीं अर्धवट शिकलेले अंमलदार असे आहेत कीं, त्यांचे नांव काढले असतां भीति उत्पन्न होते. यांपैकीं कांहींस द्रव्यलोभानें वेडावून सोडिलेलें असते; कांहीं पराकाष्ठेचे कामुक असतात; व कांहींना कटिशूळाची जबरदस्त व्यथा असून, शिवाय बाटलीबाईची विशेष भक्ति असते. लक्ष्मी, स्त्री, आणि मदिरा यांपैकी एकीनें जरी एखाद्यास मनापासून धरले असले तरी देखील त्याची किती थोड्या काळांत धुळधाण होऊन जाते. हें सर्वांस ठाऊक आहेच. तेव्हां जे कोणी एकसमयावच्छेदेंकरून या तिन्ही हडळींच्या झपाट्यांत सांपडत असतील, त्यांची किती दुर्दशा होत असेल, याची वाचकांनींच कल्पना करावी. या तिघींनीं ज्यास गळ घातला आहे अशा कोणत्या मनुष्याची अब्रु, संपत्ति, किंवा शरीरप्रकृति फार वर्षें नीट राहिली आहे? क्राफर्डप्रकरणामुळें कांहीं शिकलेल्या मामलतदारांचीं नांवें पुढें येऊन त्यांचा मोठा दुर्लौकिक झाला आहे, व नानाप्रकारचे लोक त्यांस नानाप्रकारचे दोष देत आहेत. पण वास्तविक पाहिलें तर यांपैकीं बहुतेकांचा अपराध किती स्वल्प आहे बरें! आपली नोकरी राहण्यासाठीं लांच देण्यास सिद्ध होणें ही गोष्ट वाईट नाहीं, असें आम्ही म्हणत नाहीं. पण बेशरम व लोभी वरिष्ठ अधिकाऱ्यानें तो देण्याबद्दल चाप लाविला असतां, तो देत नाही असें साफ म्हणणाऱ्यांच्या अंगीं अमानुष धैर्यच असलें पाहिजे; आणि तें सामान्य मनुष्यांच्या अंगीं नसल्याबद्दल त्यांस विशेष दोष देणें न्याय्य नाहीं; कारण तशा प्रकारचें

धैर्य थोड्यांच्या अंगींच असतें. शिवाय, ही मंडळी पुढें न येती तर हें विलक्षण प्रकरण सरकारास आपल्या हातीं मुळींच न घेतां येतें, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. इतकें करून मग त्यांस जेवढा दोष लावणें योग्य असेल तेवढा लावण्यास आम्ही तयार आहों. पण जर कोणी हा स्वल्प अपराध करून, शिवाय लांच खाणारे व दुसऱ्यांच्या स्त्रीधनाचा अपहार करणारे मदिरासक्त अंमलदार रेव्हिन्यू खात्यात, जुडीशीयल खात्यांत किंवा दुसऱ्या कोणत्याही खात्यांत असतील, तर त्यांस काय शिक्षा करावी, हें कोण सांगूं शकणार आहे? असल्या राक्षसी अंमलदारांकडून उत्पादक श्रम होऊन देशाचा व्यापार व संपत्ति वाढण्याची कल्पना स्वप्नांत तरी आणितां येईल काय? यांच्या दुर्वर्तनामुळें यांच्या कुटुंबास व यांच्या ताब्यांतील रयतेस तर अनन्वित पीडा भोगावी लागतेच, पण कधीं कधीं इतरांस सुद्धां हे अनेक प्रकारें त्रासदायक होतात. असल्या अधिकाऱ्यांहून आळशी अधिकारी शेंकडोंपट बरे. सबब ज्यांच्या मनांत देशोन्नति व्हावी असें असेल त्यांनीं अशांचें निर्मूलन करण्यास अगोदर झटले पाहिजे. हे नाहीसे झाल्याशिवाय व्यापार व संपत्ति वाढण्याचा संभव नाहीं.

✷

# ही दगलबाजी नव्हे काय?

मुंबई सरकारानें क्राफर्डप्रकरण हाती घेतल्यापासून त्याचा शेवट होईपर्यंत जें करावयाचें तें सेक्रेटरी ऑफ स्टेट व हिंदुस्थान सरकार यांस कळवून करावयाचें, असा परिपाठ ठेवला होता. कांहीं विशेष करावयाचें झालें कीं तारा सुटत, व प्रत्येक डाकेला कच्च्या हकीकतीचें पुडकें इंग्लंडास रवाना होत असे. क्राफर्डविरुद्ध जे साक्षीदार आणावयाचे त्यांना त्यांच्या अपराधाची पूर्ण माफी करण्याचें अभिवचन दिल्याखेरीज ते पुढें येणार नाहींत, असें मुंबई सरकारास वाटल्याबरोबर, त्यांनी तसें करून ती गोष्ट तारेनें व डाकेनें सेक्रेटरी ऑफ स्टेटच्या कानावर घातली. त्या वेळेस त्या हपिसरानें मुंबई सरकारच्या करण्यात कोणत्याही प्रकारच्या प्रतिषेध केला नाहीं. लांच दिला, असें आपण होऊन कबूल करणारे मामलतदार नोकरींत ठेवणें बरोबर नाहीं, असें सेक्रेटरी ऑफ स्टेटचें मत होतें, तर त्याच वेळेस त्यांनीं मुंबई सरकारास अशी उलट तार पाठवायाची होती कीं, अशा प्रकारें माफी देणें बरोबर नाहीं; कारण तसें केलें असतां आपल्या तोंडानें आपला अपराध कबूल करणारे मामलतदार नोकरीवर ठेवावे लागणार आहेत, व तसें होणें इष्ट नाहीं. पण त्यावेळेस सेक्रेटरीची स्वारी मूक राहिली. कारण त्या वेळेस मुंबई सरकारास तुम्ही अशी माफी देऊं नका, असें म्हणणें म्हणजे मागल्या तीन गव्हर्नरांनी जी बेबंदशाही व लुटालूट जाणूनबुजून चालू दिली होती, ती पुढेही चालूं देण्यास सेक्रेटरी ऑफ स्टेटची संमति आहे, असें झालें असतें, आणि त्यामुळें इंडिआ हपिसाच्या नांवानें फारच मोठा गवगवा झाला असता. अशा कारणामुळें **लॉर्ड क्रॉस** यांनीं त्यावेळीं मुंबई सरकारास वाटेल तें करूं दिलें, मामलतदारांकडून होण्यासारखा फायदा करून घेतला, क्राफर्ड साहेबाची बातावेताची वाट लाविली, आणि आतां दिलेलीं अभिवचनें अक्षरश: खरीं करून दाखविण्याचा प्रसंग आल्यांबरोबर, क्राफर्डपक्षीयांनी पार्लमेंटात व त्याच्या बाहेर केलेल्या काहुरास भिऊन जाऊन, लॉर्ड क्रॉस मुंबई सरकारावर उलटून पडत आहेत, ही दगलबाजी नव्हे काय? पूर्वीप्रमाणे इंग्लंडास पत्र जाण्यास वर्षसहामहिने लागते तर निराळी गोष्ट होती. पण तशा प्रकारची अडचण सध्या मुळींच नाहीं. रोजच्या रोज येथील हवी ती गोष्ट इंग्लंडास पोहोंचत आहे, व तिकडील येथें पोहोंचत आहे. या

क्राफर्ड प्रकरणांतील प्रत्येक महत्त्वाच्या गोष्टीच्या संबंधानें एकमेकांस तारा पाठविण्यांत आल्या होत्या. त्यावेळेस लॉर्ड क्रॉस यांची न्यायबुद्धि झोपीं गेली होती काय? किंवा तिला कसला भ्रम झाला होता काय? आमच्या मतें लॉर्ड **क्रॉसकडून** या कामात अतिशय अप्रयोजकपणाचा विश्वासघात होत आहे. अगोदर तीनशें साडेतीनशें वर्षांचा जुना इंग्रजी कायदा आज आजमितीस येथें लागूं करणें हें अगदीं अयोग्य होय; पण कायदेवाल्यांच्या मताप्रमाणें तो लागू केला पाहिजे, असें घेऊन चाललो, तरी तो कोठें लावावा, आणि कोठें न लावावा, याचा निर्णय करण्यास हिंदुस्थान सरकारास अधिकार नाहीं असें नाहीं. कायद्यांचें पालन करण्यानें एकंदरींत कल्याण होतें, म्हणून तें करावयाचें. कायद्याच्या ज्या पालनानें हिताहून अहित फार होणार, तो कायदा बदलूं कां नये? ब्रिटिश पार्लमेंटानें योग्य प्रसंगीं तो बदलल्याचें उदाहरण आहे, व हिंदुस्थान सरकारानेंही या प्रसंगीं तसें करणें उचित आहे. याउप्पर आपणांविषयीं लोकांत बेभरंवसा आणि अप्रीति उत्पन्न करून घेण्याचा त्यांचा निश्चयच झाला असेल तर आमचा नाइलाज आहे.

✷

# शनिदेव उर्फ साडेसातीचा देव

शनैश्वराची मूर्ति काळी।।
तो जातीचा होय तेली।।
चरणपंगु सुरत चांगली।।
पूजा करी काळभैरवाची।।१।।
त्याची दृष्टि पडे जयावर।।
करी तयाचा चकनाचूर।।
अथवा कृपा करी जयावर।।
तयासि सर्व आनंद प्राप्त होय।।२।।

तात्याजी महिपतीकृत शनीमाहात्म्य.

हे सूर्यतनया, ग्रहश्रेष्ठा, शनीश्वरा, तुझें उग्र व विशाल स्वरूप, तुझा भीमपराक्रम, व चराचरावर असलेला तुझा दरारा आम्हीं मर्त्य पामरांनी काय वर्णावा? स्वर्गस्थ देवगंधर्वापासून तों या क्षुद्र भूगोलावरील यःकश्चित् कीटकांपर्यंत तुझ्या झपाट्यांत सांपडला नाहीं असा कोण आहे? एका सव्वा प्रहरांत त्वां आपल्या पूज्य गुरूस कसा हात दाखविलास, हें कां आम्हांस अवगत नाही? फकिराचा वेष धारण करून त्वां गुरूस अर्पण केलेल्या खरबुजांचीं शिरकमलें झाल्यामुळें थोड्यांत चुकलें, नाहीं तर त्यावर सुळी जाण्याचाच प्रसंग येऊन बेतला होता! सर्वसंगपरित्याग करून, बैराग्याच्या वेषानें हिमाचलावर संचार करणारा गिरिजारमण तुझ्या भीतीनें दोन घटिका कैलासाच्या गूढ कंदरेंत लपून राहिला! श्रीरामचंद्रावर तुझी अवकृपा झाली तेव्हां त्याला वनवास प्राप्त झाला! भगवती जानकीस तुझी दशा आली तेव्हां लंकेश्वरानें तिला चोरून नेऊन तिच्या शुभ्र कीर्तिस लोकापवादकलंक लाविला! पुढें याच स्वारीवर तुझी वक्रदृष्टि झाली, तेव्हा कलहप्रिय नारदाच्या सांगण्यावरून त्यानें तुला उत्तान होऊं दिलें, व त्यासरशीं तुझ्या उरावरील त्याचा पाय निघून जाऊन तुझाच पाय त्याच्या उरावर बसला, व सहा महिन्यांत रामचंद्रानें परिवारासह त्याचें निर्दालन केलें! तूं हरिश्चंद्रास प्रतिकूल झालास, तेव्हां कौशिक मुनि हात धुऊन त्याच्या पाठीमागें लागल्यामुळें, तो राजा पदच्युत कसा झाला, त्यानें आपले स्त्रीपुत्र कसे विकले, व डोंबाच्या

घरीं त्यास किती दारुण यातना सोसाव्या लागल्या, हे पुराणांतही सुप्रसिद्ध आहे! तुझ्या अवकृपेमुळें नलदमयंतीस भोगावे लागलेले कष्ट ऐकून अद्यापिही अंगावर कांटा उभा राहतो! जेव्हां इंद्रावर आपली खैर मर्जी झाली, तेव्हां त्यास दुर्बुद्धि आठवून त्यानें गौतमाच्या जायेबरोबर कुकर्म केलें, आणि त्या पापाबद्दल ऋषीच्या शापानें आपली सुंदर काया भगांकित करून घेतली! तुझ्या तडाक्यांत सांपडल्यामुळें, चंद्राला गुरुपत्नीस स्पर्श करण्याची इच्छा झाली, व तीमुळें त्यानें आपल्या पाठीमागें क्षयरोग लावून घेतला! तूं वसिष्ठास अनुकूळ नव्हतास, तेव्हां त्याचे शंभर पुत्र मृत्युमुखांत पडले, व पराशरास मत्स्यगंधोपभोगामुळें सुदुस्तर पीडा सोसावी लागली! जेव्हां पांडवास तूं द्वादशस्थानीं आलास, तेव्हां त्यांस द्यूतांत पडून स्त्री व राज्य गमावण्याची दुर्वासना झाली. इतकेंच नाहीं, तर बारा वर्षें वनवास व एक वर्ष अज्ञातवास भोगावा लागला! फार तर काय पण जेव्हां श्रीकृष्णपरमात्म्यावर तुझी करडी नजर फिरली तेव्हां त्यावर स्यमंतकमणि चोरल्याचा आळ आला!

वाचकहो, ज्या ग्रहानें देवदानवांची अशी दुर्दशा करून सोडिली त्यापुढें आम्हां मानवांची काय मात्रा चालणार आहे बरें? उपजल्याबरोबर अंजनीसुत पिकलें फळ म्हणून सूर्यास धरूं धांवला असें म्हणतात; हें राजश्री जनन्युदरांतून अवतरले नाहींत तोंच यांच्या **दृष्टीच्या** प्रचंड पराक्रमामुळें यांच्या पित्याच्या दिव्य शरीरलावण्याचा लोप होऊन, तें कष्टानें विकल झालें, त्याचा सारथी पांगळा झाला, व घोडे आंधळे झाले! आमचे राजे आम्हांस मोठे बलाढ्य वाटतात; पण ते एकदां शनीश्वराच्या साडेसातीच्या फेऱ्यांत सांपडले कीं कसे धुळीस मिळतात, हें ज्यास पहावयाचें असेल त्यानें **विक्रमचरित्र** वाचावें. या भाग्यशाली राजास जेव्हां शनीमहाराजांनी घेरलें तेव्हां त्यावर जसली संकटे ओढवली तसली आजपर्यंत कोणत्याही मर्त्यांवर ओढवली नसतील. बेअब्रू झालेल्या व बडतर्फ केलेल्या सगळ्याच मामलतदारांस बारावा शनी आला आहे, किंवा नाहीं हें आम्हांस ठाऊक नाहीं; पण त्यांपैकी एकाला तरी तो निष्ठुरतेनें छळीत आहे, व नोकरी जाण्याशिवाय आणखी अनेक दु:सह दु:खें त्यांवर आलीं आहेत; हें आम्हांस ठाऊक आहे. विक्रमाच्या दु:खांशीं त्याच्या दु:खांची तुलना केल्यास त्याच्या दु:खांस सुखेंच म्हणावें लागेल! विक्रमावर वैश्यकन्येचा मुक्ताहार चोरल्याचा आरोप शाबीत झाल्यामुळें तामलिंदापूरच्या चंद्रसेन राजानें त्याचे हातपाय तोडून त्यास वेशीबाहेर अन्नपाण्यावांचून उन्हांत होरपळत टाकावें, अशी शिक्षा दिली! मामलतदाराचे हातपाय कायम असून, त्यांस निदान पोटापुरते कॉंपेन्सेशन मिळणार आहे! पुढें विक्रमाची ग्रहदशा किंचित् फिरली तेव्हां

उज्जनींतील एका तेल्याची मुलगी तामलिंदापुरास आपल्या सासरीं जात असतां वेशीपाशीं तळमळत पडलेला विक्रम तिच्या दृष्टीस पडला. तेव्हां तिनें त्याला ओळखून घरी नेलें आणि राजाज्ञेनें त्यास घाणा हाकण्याचें कामावर नेमिलें! आमच्या मामलतदारांची ग्रहदशा फिरली असल्यास, हिंदुस्थान सरकार त्यांस मेहतरकन्येनें विक्रमास सांगितलेल्या कामापेक्षां अधिक योग्यतेचें काम सांगेल, याविषयीं शंका नाहीं. शेवटीं विक्रमाची ग्रहदशा संपली. तेव्हां त्याचे हातपाय फिरून आले इतकेंच नाहीं; तर दीपरागाची तान घेतल्याबरोबर जिकडे तिकडे प्रकाशमय करून टाकणाऱ्या त्याच्या अलौकिक कंठमाधुर्यामुळें, राजा चंद्रसेनाची कन्या पद्मसेना एकाएकीं अनुरागबद्ध होऊन त्याची भार्या झाली, आणि तिच्यासह राजा विक्रम मालव प्रदेशीं परत येऊन, तीं उभयतां राज्योपभोग सुखानें घेऊ लागली! इकडे आपल्या मामलतदारांची ग्रहदशा संपली असेल, तर तेही पुन: अधिकाररूढ होऊन आपल्या मामलतींच्या स्वादुत्वाचें पुन: सेवन करूं लागतील अशी आम्ही आशा करतों! पण ही गोष्ट हटकून व्हावयाला पाहिजे असेल तर त्यांनीं शनी महात्म्यांत सांगितल्याप्रमाणें **सुधारकासारख्या** ब्राह्मणास दानभोजनादिकांनीं संतुष्ट केलें पाहिजे! कारण म्हटलें आहे:-

जप (पत्र?) कर्त्या ब्राह्मणांसी॥<br>
शनैश्वररूप मानूनि त्यासी॥<br>
दक्षिणा देऊनि पूजेसी॥<br>
प्रसन्नचि करावें॥१॥<br>
मग करावे ब्राह्मणभोजन॥<br>
यथाशक्ति द्यावें दान॥<br>
ब्राह्मण तृप्त होतां पूर्ण॥<br>
संतोष पावे शनिदेव॥२॥

वाचकहो, किती झाला तरी तेलकट शनी ब्रह्मतेजापुढें काय करणार? निदान तात्या महिपतींनीं तरी त्याच्या माहात्म्यापेक्षां ब्राह्मणमाहात्म्य श्रेष्ठतर करून ठेविलें असल्यामुळें, ब्राह्मणकीस जो फायदा होत असेल, त्याबद्दल त्या वृत्तीवर अवलंबणाऱ्यांनी त्याचे उपकार मानून त्यास दुवा दिला पाहिजे हें उघड आहे!

असो, येथपर्यंत आम्हांसारख्या भाविक लोकांच्या ग्रहाविषयीं या ज्या समजुती आहेत, त्या थोडक्यांत सांगितल्या! आतां त्याच पद्धतीनें म्हणजे थोडक्यांतच अलीकडल्या सुधारलेल्या ज्योतिषांचे याविषयीं जें म्हणणें आहे तें सांगतो, आणि आरती करतों.

हा भूगोल सोडून जर आपण शनीवर गेलों तर येथें आपल्या मनाची जी

स्थिति कधींच होत नाहीं ती तेथें होईल. कां नाहीं होणार? शनी कांही सामान्य ग्रह नाहीं. आम्हांपासून त्याचें अंतर १०,००,००,००० मैल आहे, व आमच्या पृथ्वीसारख्या ७३४ पृथ्व्या एके ठिकाणीं कराव्या, तेव्हां त्याच्या विस्ताराची कल्पना होणार आहे! हा इतका मोठा आहे तरी आपल्या आंसाभोंवतीं इतक्या झपाट्यानें फिरत असतो कीं त्याची दिनप्रदक्षिणा **दहा तासांत** संपते! शनीच्या विषुववृत्तापासून सुमारें २०,००० मैलांवर त्याला वेष्टणारीं चापटीशीं व चकाकणारीं तीन वळीं किंवा वेढीं आहेत. या वेढ्यांस चापटीं असें म्हटलें आहे. कारण यांची जाडी दहापांच मैलांहून अधिक असेल असें वाटत नाहीं! इंग्रजींत या त्रिविध चक्रमालेस किंवा प्रभामंडलांस **रिंग्ज्** म्हणजे अंगठ्या म्हणतात. या आंगठ्यांचा व्यास १,६६,००० मैल आहे! या आंगठ्या स्थिर नाहींत. शनीच्या बिंबाबरोबर त्याही मोठ्या वेगानें परिभ्रमण करतात. या तीन विशाल प्रकाशपरिधींनींच शनीचा परिवार संपला असें नाही. आपणांस काय तो एक चंद्र आहे. शनीच्या निरनिराळ्या भागास निरनिराळ्या रात्रीं प्रकाशमय करणारे कमींतकमी आठ चंद्र आहेत! या अष्ट चंद्रांपैकीं जो शनीपासून अगदीं जवळ आहे तो त्याच्या मध्यापासून १,२०,००० मैलांवर आहे, व जो सर्वात दूर आहे, तो २२,९३,००० मैलांवर आहे. यावरून काय सिद्ध झालें कीं, कमींतकमी ४५ लक्ष मैलांचे व्यासाच्या वर्तलांत जें कांहीं सांपडेल त्यास शनी आपल्या आकर्षणपाशानें बद्ध करून, आपल्या सभोंवतीं अनंत काल घिरट्या घालण्यास लावणार!

भारतीय फलज्योतिष्यांनीं **गुरूस** ब्राह्मण व **शनीस** तेली असें म्हटलें आहे, यावरून जुन्या ज्योतिर्विदांपाशीं अलीकडील दुर्बिणीच्या भिंगासारखी ''लहान वस्तु थोर'' दिसवणारीं भिंगें असावीं असा तर्क होतो. कारण अलीकडील मोठ्याशा दुर्बिणींतून गुरूकडे (Jupiter) पाहिलें असतां, त्याच्या बिंबावर तीन पदरी जानव्यासारखे तीन पट्टे दिसतात व शनीवार (Saturn) तर तेलाचा सारखा घाणा चालला असावा, असें दिसतें! शनीवर इतकें तेज व त्याच्या भोंवती फिरणारे इतके चंद्र असून, त्याच्या दूरत्वामुळें तो तेल्यासारख्या निस्तेज दिसतो, व मंदपणानें फिरतो, हें उघड आहे. **मिक्रोगेमस** नांवाचा कोणी एक प्रवासी शनीवरून पृथ्वीवर उतरला, तेव्हां त्याला ती वारुळाप्रमाणें दिसली, अशी जी ख्रिस्ती पुराणांत गोष्ट आहे, तीवरून या दोन गोलांच्या आकारांचें प्रमाण ध्यानांत येतें, सूर्याभोंवती शनीच्या प्रदक्षिणेस तीस वर्षें लागतात, म्हणजे आमच्यापेक्षां शनीवरील वर्ष तीसपट मोठें आहे, व त्याच मानांने तेथील ऋतुही मोठे आहेत. सात वर्षे चार महिनेपर्यंत पर्जन्यकाळ झाल्यावर तितक्याच लांबीचा हिवाळा येतो,

व तो आटपल्यावर, सुमारें सव्वासात सव्वासात वर्षे वसंत आणि ग्रीष्म यांचा अंमल असतो. शनी कन्याराशीस आला असतां अतिशय पीडा देतो, अशी युरोपांतील अडाणी लोकांचीही समजूत आहे.

येथपर्यंत या ग्रहाधिपतीचें तत्त्वविनोदात्मक जेवढें वर्णन या स्थलीं करणें उचित वाटलें तेवढें केलें. आतां पूर्वी सांगितल्याप्रमाणें त्याची आरती करून त्याचा निरोप घेतो-

(जयदेव जयदेव जय पांडुरंगा- या चालीवर)

जय देव जय देव जय शनीराया।।
अज मज झाली बुद्धि तुजला वर्णाया।।जय.।।
भाविक शास्त्रज्ञांसी संमत अशि गाथा।।
गाउनि चित्ताकर्षी केली तव कथा।।
यास्तव प्रसन्न होऊनि 'वर माग आता' ।।
ऐसें म्हणशिल तरी दे हें तत्त्वतां।।जय.।।
जे न सुधारका पढतील त्यांसी।।
त्याची वा किंमत न देती त्यांसी।।
राशीस येऊनी छळावेंगा देवा!।।
वद नाहीं नामी कां पत्र हें राया।।जय.।।
येथें बारा आणे मुंबापुरिं रुपया।।
फक्त दीड रुपया दुसऱ्या गांवींया।।
बंगींत मागतां पोष्टेजासकट।।
फक्त अठरा आणे, हें कां संकट?।।जय.।।
वाचुनि यातें जोडी जो तत्त्वज्ञानाला।।
संतती, संपत्ती, उद्‌गति दे त्याला।।
तैसेंच, यांतील विचार ज्या मान्य।।
त्या महाराष्ट्रीयां दे दे सुखदान ।।जय.।।

✷

# स्वयंवर

विदुषी म्हणे म्हणा जा जरि कथिलें म्यां परोपरी पण ती।
प्रणति प्रभूसि करिती अनुकंप्या मी स्वयंवरा म्हणती।।
गांधर्वेण विवाहेन बह्व्यो राजर्षिकन्यका:।
श्रूयन्ते परिणीतास्ता: पितृभिश्चाभिनंदिता:।।

कालेंकरून जो आचार रूढ झाला, तो किती अभेद्य असतो याचें उत्कृष्ट उदाहरण आमची अलीकडील विवाहपद्धति आहे. आमचा पूर्वीचा इतिहास, परक्या लोकांचें वर्तन, व आमची सांप्रत जागृत झालेली विचारपद्धति, हीं सारीं या अप्रशस्त चालीस प्रतिकूल आहेत, तरी आम्हांस ती झुगारून देण्याचें धैर्य होत नाहीं, हें आश्चर्य नव्हे काय! किंवा आश्चर्य तरी कसलें? ''हा आमच्या वडिलांचा कूप, असें म्हणून खारें पाणी पीत बसणारे'' आम्ही लोक आहों, तेव्हां जें रूढ झालें तें आम्हांस टाकवत नाहीं, यांत कांहीं नवल नाहीं. तथापि आमची प्रस्तुतची निकृष्टावस्था आम्हांस नको असेल; तर सर्वांच्या अगोदर या अत्यंत अपायकारक प्रघाताचे निर्मूलन करण्याचा प्रयत्न केला पाहिजे. या खटपटीपासून अनेक फायदे होणार आहेत. ज्याप्रमाणें युरोपांत क्याथोलिक व प्रॉटेस्टंट या ख्रिस्ती धर्माच्या दोन पंथांत उत्पन्न झालेल्या वादापासून पुढें महत्त्वाचे अनेक परिणाम घडून आले, त्याप्रमाणें आज जर आपण जाणूनबुजून बालविवाह रद्द करण्याच्या कामीं झटूं लागलों तर त्यापासून अनेक महत्त्वाच्या गोष्टी निष्पन्न होणार आहेत. विचारानें चांगली गोष्ट कोणती व वाईट गोष्ट कोणती याचा पूर्ण निश्चय करून, वाईट टाकण्याचा व चांगली स्थापण्याचा प्रयत्न एका बाबींत केला असतां जें धैर्य अंगीं येतें, तेंच पुढें तसली दुसरी गोष्ट करण्यास प्रवृत्त करतें; आणि ही दुसरी गोष्ट करतांना धैर्याचें भांडवल पहिल्यापासूनच अधिक असल्यामुळें, पहिल्या प्रसंगाहून विशेष सुलभ रीतीनें यश:प्राप्ति होते. याप्रमाणें एका गोष्टींत यश आलें, दुसरींत आलें, तिसरींत आलें, असें होतां होतां नवीन नवीन गोष्टी करण्याचें धैर्य दिवसेंदिवस अधिकाधिक वाढत जाऊन, त्याचा पाहिजे त्या कामीं उपयोग करण्यास उल्हास वाटूं लागतो. उन्हाळ्याच्या प्रत्येक दिवसास भूमितिश्रेणीनें वाढत जाणाऱ्या उष्णतेप्रमाणें मानसिक धैर्याची गोष्ट आहे; तें प्रत्येक

दिवशीं अधिकाधिक होत जातें. उलट तें कमी होऊं लागलें म्हणजेही भूमितिश्रेणीनेंच कमी होतें! ज्याप्रमाणें आकाशांत फेंकलेला दगड खालीं येऊं लागला म्हणजे प्रत्येक क्षणास मागल्या क्षणापेक्षां अधिक फूट उतरतो, त्याप्रमाणें कोणत्याही कारणानें राष्ट्राच्या किंवा त्यांतील एखाद्या व्यक्तीच्या मनास भयानें घेरलें म्हणजे तें क्षणोक्षणीं त्यास अधिकाधिकच ग्राशीत जाते! तेव्हां; बालविवाहावर निकराचा हल्ला करण्यानें प्रथम आम्हांत मानसिक धैर्य उत्पन्न होईल, व उत्तरोत्तर त्याची वृद्धि होत जाऊन इतर कामांकडेही त्याचा उपयोग करतां येऊं लागेल.

याशिवाय याच खटपटीनें दुसरा एक फायदा होणार आहे. तो हा कीं, आज जे आम्ही चोहोंकडून धर्मपाशांनीं अगदी जखडल्यासारखे झालों आहों, त्या आम्हांस त्याच्या 'आज्ञा कोठवर पाळाव्या' हें समजूं लागेल. बालविवाहाचें पूर्ण निर्मूलन आणि स्वयंवराची प्रस्थापना यांच्या दरम्यान बराच धर्मवाद उपस्थित होणार आहे, व तो करण्यानें पुढें पुष्कळ हित होणार आहे. बापाच्या घरीं मुलगी ऋतुस्नात होतां कामा नये, व ऋतुस्नात झालेल्या मुलीचें यथासांग गर्भाधान झालेंच पाहिजे, नाहीं तर उभय कुलांतील चाळीस पिढ्यांस दुर्गति प्राप्त होते, असल्या अजागळपणाच्या धर्मसमजुतींचा ऱ्हास; होईल तितक्या त्वरेनें होणें फार इष्ट आहे. असल्या वेडेपणाच्या समजुतींचा मोक्ष करण्यास पूर्वेतिहास आणि पूर्वाचार हे पुन: पुन: पुढें आणून त्यांचें फिरून अवलंबन करा असें सांगत न बसतां, अलीकडील न्यायाच्या भात्यांतून तीव्र बाण काढून त्यांचा त्यांवर संपात केला पाहिजे. कोणतेही आचार घालण्यास पूर्वींच्या ऋषींस जितका अधिकार होता, तितकाच आम्हांसही आहे; पूर्वकालीन आचार्यांवर ईश्वराची जितकी कृपा होती, तितकीच आम्हांवरही आहे; व त्याच्याशीं त्यांचा संबंध होता तितकाच आमचाही आहे; बऱ्यावाईटाची निवडानिवड करण्याची जितकी बुद्धि त्यांना होती तितकी, किंवा तीहून अधिक आम्हांसही आहे; अनुजांसाठीं त्यांचें अंत:करण जितकें कळवळत होतें, तितकें किंवा त्याहून अधिक आमचेंही कळवळत आहे; सृष्टिविषयक व तत्कर्तृविषयक ज्ञान जितकें त्यांस होतें, तितकें किंबहुना त्याहून बरेंच अधिक ज्ञान आम्हांस आहे; सबब त्यांनी घालून दिलेल्या नियमांपैकीं जेवढे हितकारक असतील तेवढ्यांचेंच आम्ही पालन करणार, व अपायकारक असतील ते टाकून देऊन त्यांचे जागीं आम्हांस निर्दोष वाटतील असे नवीन घालणार- अशा धर्तीवर हा वाद नेला पाहिजे, व अशा धर्तीवर तो नेल्यासच त्यापासून फायदा होणार आहे. एका ऋषीविरुद्ध दुसरा ऋषि हुडकींत बसण्यांत, व साऱ्यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. तसलें काम वे. झळकीकरांसारख्या शास्त्र्यांनीं

जुन्या पद्धतीच्या लोकांसाठी खुशाल करीत बसावें! कोणत्याही विषयाचा ऐतिहासिक पद्धतीनें ऊहापोह करण्यांत फायदा आहे; नाहीं असें आमचें म्हणणें नाहीं. पण आमच्या बहुतेक जुन्या पंडितांस ऐतिहासिक पद्धति म्हणजे काय, हें मुळींच ठाऊक नाहीं. त्यांना असें वाटतें कीं, जगांत म्हणून जेवढें कांहीं ज्ञान आहे तेवढें संस्कृत भाषेंतील ग्रंथसमूहांत भरलेलें आहे. त्याच्या बाहेर चहूंकडे अंधार आहे! व त्यांना असें वाटणें हें कांहीं अंशीं स्वाभाविकही आहे. ज्याअर्थी दुसऱ्या भाषेंतील ज्ञानभांडारांचा गंधही त्यांस लागलेला नाहीं, त्याअर्थी त्यांना त्यांची महती कोठून कळणार? तेव्हां अर्थात् त्यांनीं आपल्यापाशीं असलेल्या छोटेखानी डबोल्यासच अखिल विश्वांतील संपत्ससमूह समजून त्यांच्या महत्त्वाचे व अद्वितीयत्वाचे पवाडे गात सुटावे, हें साहजिक आहे. पण ज्या आमचे डोळे उघडले आहेत; ज्या आम्हांस हिंदुस्थानच्या बाहेर देश आहेत, व संस्कृत ग्रंथांच्या बाहेर विद्या आहे, हें पक्कें समजत आहे; त्या आम्हींही संकुचित दर्शनाच्या शास्त्रीवैदिकांप्रमाणें किंवा अगदीं मूढ जनांप्रमाणें वागत सुटावें, ही मोठ्या लाजेची गोष्ट आहे. तेव्हां बालविवाहाचें निर्दालन करण्याचा प्रयत्न आपण मनापासून आरंभिल्यास, बऱ्याच धर्मकल्पनांचें संशोधनही आपणांस करावें लागणार आहे; व या कामीं हें संशोधन करण्यास आरंभ केला, म्हणजे इतर गोष्टींतही तें करण्याची इच्छा होऊं लागेल, व विचाराच्या भट्टींत, धर्मांत शिरलेल्या हीण धातू खांक होऊन त्यांतील सारतत्त्वरूप बावन्नकशी सोनें मात्र मागें उरेल!

बालविवाहाचें खंडन म्हणजे स्वयंवराचे मंडन. तेव्हां अर्थात् जे बालविवाहास प्रतिकूल असतील, त्यांना स्वयंवरास प्रतिकूल असलेल्या लोकांच्या मतांचें समर्पक खंडन करतां आलें पाहिजे. यावर कोणी असा आक्षेप घेतील कीं, बालविवाहापासून एकदम स्वयंवरावरच उडी कशाला मारावयाला पाहिजे? त्यावर आमचें असें उत्तर आहे कीं, जीं स्वयंवरें नाहींत त्या सर्वांस आम्ही बालविवाहच समजतों! ज्याचें त्यानें लग्न करणें म्हणजे स्वयंवर! एकाचें दुसऱ्यानें करणें म्हणजे बालविवाह! अर्धें स्वयंवर आणि अर्धा बालविवाह, अशी लग्नाची पद्धत शक्य नाही. कोणी असें म्हणतात कीं, फ्रान्स देशांत अशा प्रकारची विवाहपद्धति कांहीं वर्षामागें रूढ होती. बापानें मुलाकरितां मुलगी पाहून ठेवावी, आणि मुलास ती पसंत झाल्यास तिचा त्याच्याशीं विवाह व्हावा. किंवा मुलानें आपल्या मनाजोगी मुलगी पाहून ठेवावी, आणि ती बापास पसंत झाल्यास, तिचा त्याच्याशीं विवाह व्हावा, ही दिसण्यांत मध्यगामी पद्धत दिसते, व जे लोक बालविवाहांतून निघून स्वयंवराकडे येण्यास निघाले असतील, त्यांना कांहीं वर्षे या पद्धतीपाशी मुक्काम करावा लागत असे, असें वाटतें! आम्हांत एके कालीं स्वयंवरपद्धति अत्यंत

प्रचलित होती, अशाबद्दल पुष्कळ आधार आहे. आम्हांपैकीं बहुतेकांची लग्नें अकराच्या आंतील वयाच्या मुलींशीं झालीं असल्यामुळें, सध्यां येथें बालविवाहाची पद्धत अंमलांत आहे, याबद्दल पुरावा देण्याची मुळींच गरज नाहीं! एकदां आम्ही विवाहपर्वताच्या शिखरावर होतों; प्रस्तुत त्याच्या पायथ्याशीं येऊन पडलों आहों. पुन्हां वर चढून जावें, अशी कित्येकांना इच्छा होऊं लागली आहे; पण कित्येकांना असें वाटत आहे कीं, तसें करण्याचा प्रयत्न केला असतां, आम्हांस घेरी येऊन, किंवा आमचा पाय निसटून, आम्ही पुन्हा पायथ्याशीं गडबडत येऊन पडूं! तेव्हां कित्येकांचें असें म्हणणें पडतें कीं, आपणांला पायथाही नको आणि शिखरही नको; आपण आपले या पर्वताच्या मध्यप्रदेशाला धरून असावें! प्रथमदर्शनी हा सल्ला मोठा नामी दिसतो; व त्याप्रमाणें आचरण करण्यासही आमची कांहीं हरकत नाहीं. पण मनुष्यस्वभावाचें ज्यास अगदीं सामान्य ज्ञान आहे तोही असें सांगूं शकेल की, मनुष्य हा प्राणी त्याला जी गोष्ट हितावह वाटूं लागली असेल तिची पक्का शहानिशा केल्याखेरीज रहाणारा नाही. मध्यप्रदेशाशीं येऊन ठेपल्यावर आणखी एक टप्पा वर जावें, असें त्यास साहजिकपणें वाटूं लागतें. तेथें येऊन पोहोंचल्यावर पुनः तोच नाद! याप्रमाणें टप्प्याटप्प्यानें कां होईना, केव्हां तरी शिखरावर जाऊन थडकल्याखेरीज त्याचें पूर्ण समाधान व्हावयाचें नाहीं! 'सामाजिक सुधारणापरिषदे' च्या मनांत जी बालविवाह निषेधकमंडळी स्थापावयाची आहे, तिच्या पुरस्कर्त्यांनीं नुकत्याच प्रसिद्ध केलेल्या पत्रकांत १०, १२, व १४ हे मुलींच्या वयाचे आंकडे दिले आहेत. ते आमच्या मतें केवळ टप्पे आहेत! यांपैकीं शेवटचा आंकडा आम्हांस बराच पसंत आहे. पण खरें स्वयंवर ज्यांना येथें पुनः स्थापित व्हावयाला पाहिजे आहे, त्यांना तो पसंत होण्यासारखा नाहीं. पण त्यांत एक विशेष आहे; तो हा कीं, त्या वर्षांपर्यंत जे आपल्या मुली अविवाहित ठेवण्यास राजी होतील त्यांनीं धर्मानें घातलेली अटकनदी उतरण्यांचें कांहीं तरी साधन आपल्या मनाशीं तयार करून ठेवलें असावें, हें उघड आहे. बहुतेक हिंदू मुली १४ वर्षांच्या आंत ऋतुमती होतात, हें निर्विवाद आहे. तेव्हा १४ च्या आंतील वयाच्या मुलीचें लग्न न करण्याबद्दल शपथ घेणें, म्हणजे नहाण आलेल्या मुलींचें लग्न करण्याविषयीं शपथ येणें होय! पण असे त्या पत्रकांत किती आहेत?

*

# सामाजिक सुधारणा आणि कायदा

सुधारणेचा शब्दांत:पुराच्या बाहेर संचार होऊं नये म्हणून डोळ्यांत तेल घालून खडा पहारा करणाऱ्या, नानाविध धर्मकल्पनांशी तुमुल संग्राम करण्यास ज्यांस स्फुरण यावें, त्याच्या भोंवताली उभारलेल्या प्रचंड लोकमत-तटास ढांसळून पाडण्यास ज्ञानतोफांस ज्यांनीं सरबत्ती द्यावी, व त्यास गराडा घालण्याऱ्या रुढिखंदकांवर क्रियासेतु बांधण्यास ज्यांनीं प्रवृत्त व्हावें, अशा विद्याचारसंपन्न लोकांनी दुराग्रहाच्या भरी भरून व शुष्क बाबतींत दुही माजवून आपल्या मुख्य कर्तव्याची हेळसांड होऊं द्यावी ही मोठ्या दुर्दैवाची गोष्ट होय.

'नवखंड पृथ्वी व दहावे खंड काशी' यापुढें ज्यांच्या भूगोलविषयक कल्पनांची धांव जात नाहीं, वेदाच्या अर्थ कालत्रयीं होणें नाहीं अशी दृढ समजूत असूनही त्यांतच मनुष्यास अवश्यक अशा सर्व ज्ञानाचा गठ्ठा आहे असा ज्यांचा पक्का ग्रह झाला आहे, व प्राचीन ऋषिप्रणित आचारांहून सुखकर असे आचार असूं शकतील अशा नुसत्या कल्पनेचाही विटाळ न होऊं देण्याविषयीं जे अत्यंत दक्ष आहेत, तात्पर्य 'पुराणामित्येव हि साधु सर्व' या महामंत्राच्या प्रभावापुढें पदोपदीं येणाऱ्या असंख्य नडी ज्यास साह्य झाल्या आहेत; अशा लोकांनी नुसतें कायद्याचें नांव ऐकलें नाहीं तोंच, वेडावून जाऊन माधवबागेंतील सत्तेचाळीसेतरांवर ताण करून सोडावी, हें अगदीं साहजिक आहे. परंतु ही सीमा ओलांडून पुढें गेलेल्या ज्ञानविशिष्ट म्हणविणाऱ्या लोकांनीं कायद्याच्या विरुद्ध इतकें काहूर कां माजवावें याचा मात्र आम्हांस उमज पडत नाहीं. सामाजिक सुधारणा आणि कायदा यांच्यामध्यें अपरिहार्य एकनाड असल्यामुळें त्यांचे जुग कधीही जमावयाचे नाहीं असें जें कित्येक सामुद्रिकांनीं गणित केलें आहे; त्यांत आमच्या मतें कांहीं चूक झाली आहे, व ती दाखविण्याचा प्रयत्न केला असतां तिकडे शांतपणानें नजर फेंकण्याची जर ते तसदी घेतील, तर हा वाद मिटून उभय पक्षांत समेट होणें केवळ दुरापास्त आहे असें आम्हांस वाटत नाहीं. सामाजिक सुधारणेंत कायद्याची मदत घेणें अनर्थावह आहे असें प्रतिपादणाऱ्या मंडळींच्या आजपर्यंतच्या वाटाघाटींत आम्हांस जितका दुराग्रहाचा भाग दिसून येतो तितका योग्यायोग्य विचार दिसून येत नाहीं, असें म्हटल्यावांचून आमच्यानें रहावत नाहीं. सकृद्दर्शनीं

ज्यांत कांहीं अर्थ आहे असें भासतें, असें काय तें एकच कारण पुढें आलें आहे. बाकी सर्व शब्दजाल, हट्टवाद व पुराणप्रियतेच्या संस्काराची अवशिष्ट झांक यांचेंच अकांडतांडव आहे. व तें कारण हेंच कीं, आमचें सरकार परकें, त्याचा धर्म वेगळा, त्यांचे रीतिरिवाज भिन्न; तेव्हां अशा सरकारास आपल्या समाजव्यवस्थेंत हात घालूं देणें अत्यंत भयावह आहे. याचे परिणाम फारच अनिष्टकारक झाल्यावांचून रहाणार नाहींत, व याबद्दल मागाहून पस्ताव्यांत मात्र पडावें लागेल. आतां हा कोटिक्रम करणाऱ्यांस आमचा इतकाच प्रश्न आहे कीं, सामाजिक गोष्टींत आजपर्यंत सरकारने जें औदासीन्य पत्करलें आहे, त्याचें कारण तसें करण्यास आम्हीं त्यांस परवानगी देत नाहीं इतकेंच आहे काय? मुसलमान लोकांनीं एका हातांत तरवार व दुसऱ्या हातांत कुराण घेऊन आम्हांपैकीं कित्येकांस बाटविलें त्यावेळीं तसें करण्याविषयीं आम्हीं त्यांस परवाना दिला होता काय? किंवा आमच्या समाजव्यवस्थेंत ढवळाढवळ करण्यास सरकारनें मनांत आणलें तर तें आज असमर्थ आहे असें तरी मानतां येईल काय? तात्पर्य, सरकार सामाजिक बाबतींत उदासीन असण्याचे कारण, तसें करण्यास आम्ही त्यास संधी देत नाहीं इतकेंच काय तें, बाकी आम्ही त्यास आमच्या घरगुती गोष्टींत हात घालण्यास केव्हां विनंती करूं म्हणून तें अगदीं चातकाप्रमाणें वाट पहात आहे, व एकदां का त्यास आपणाकडून जराशी फूस मिळाली की, कायद्यामागून कायदे करून आमच्या सर्व सामाजिक व्यवस्थांचा भंडवडा करून आम्हांस ते त्राहि त्राहि करून सोडतील, वगैरे विचारांत जर कांहीं तथ्य असेल तर मग "आपण कोंबडी झांकली कीं उजाडायाचें राहिलेंच" असें मानणाऱ्या म्हातारीच्या समजुतींतही तथ्य नाहीं असें कोण म्हणेल?

दुसरें, सती जाण्याची चाल जी सरकारनें बंद केली; त्यापासून आमच्या धर्मांतही प्रसंगानुसार हात घालण्यास सरकार डगमगणारें नाहीं असें सिद्ध झालें नाहीं काय? किंवा जो पुनर्विवाह हिंदु धर्मशास्त्रानें बेकायदेशीर ठरविला होता, तोच कायदेशीर ठरविण्याविषयीं कित्येकांनीं आपण होऊन विनंती केल्यावरून, तो कायदेशीर ठरविल्यास आज ३४ वर्षें झालीं असून त्यावेळीं मिळालेल्या फुशीचा त्यांनीं अद्याप पावेतों फायदा घेतला नाहीं, हें कसें? इंग्लंड देशांत बारा वर्षांच्या आंत पुरुषाचें लग्न झाल्यास तें बेकायदेशीर आहे, परंतु येथें पाळण्यास बाशिंगें बांधणेंही कायदेशीर असून १० वर्षांच्या आंतील स्त्रियेशीं प्रत्यक्ष नवऱ्यानें संभोग केला असतां, त्याजवर जबरीसंभोगाचा आरोप शाबीत होतो असें कलम पीनल कोडांत कोठून आलें? तात्पर्य, सामाजिक गोष्टींत आधीच सरकारनें हात घातला आहे असें असतां, आणखी अमुक एक गोष्टींत असा असा कायदा करा

अशी सरकारास विनंती केल्यानें त्यास आमच्या सामाजिक गोष्टींत आयतीच ढवळाढवळ करण्यास फूस सांपडेल, अशा समजुतीवर कायद्याचा निषेध करीत बसणें म्हणजे वास्तविक पहातां आम्हांस पुढें जावयाचें नाहीं, हेंच जगास जाहीर करणें होय.

आतां आजमितीस जितक्या म्हणून सुधारणा आम्हांस इष्ट किंवा अवश्यक वाटतात; त्या सर्व कायद्याच्या मदतीनें सुसाध्य आहेत असें आमचें म्हणणें नाहीं, किंवा त्यांपैकीं कांहीं कायद्यानें सुसाध्य असल्या, तथापि त्या सर्वांवर कायद्याची अंमलबजावणी करावी असेंही आम्हीं इच्छित नाहीं. परंतु याचें कारण आमचें सरकार परकें आहे हें नव्हे; किंवा सामाजिक गोष्टींत सरकारनें हात घालणें गैरशिस्त आहे, अशा सामान्य सिद्धांताचा आम्ही अंगीकार करतों असेंही नव्हे. व्यक्तीच्या ज्या आचरणापासून समाजाचें प्रत्यक्ष अपरिमित नुकसान होत नसेल, तें आचरण त्या व्यक्तीस घातक असलें तथापि त्यानें तें करूं नये अशी समाजानें सक्ती करण्याचा समाजास अधिकार नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य आणि समाजबंधन या दोहोंसही मर्यादा आहेत. त्या मर्यादांचा अतिक्रम होईल तर त्यापासून एकंदर समाजाचेंच नुकसान होणारें आहे. व्यभिचार हा एक पुण्यमार्ग आहे, असें कोणत्याही धर्माचा मनुष्य प्रतिपादणार नाहीं; परंतु एवढ्यावरून व्यभिचार करणाऱ्यांस कायद्यानें शिक्षा ठरवावी किंवा नाहीं असा प्रश्न पुढें आला असतां, सर्वच विचारी लोक एकदम 'हो' म्हणण्यास तयार होणार नाहींत. त्या व्यभिचारापासून समाजाचें प्रत्यक्ष नुकसान होत आहे कीं काय? या प्रश्नाचा प्रथम विचार केला पाहिजे. तसेच दारू पिणें हें जरी वाईट आहे, तथापि ती पिणाऱ्या व्यक्तीपासून समाजास त्रास पोंचल्यावांचून त्याच्यावर कायदा लागू करणें, न्याय्य होणार नाहीं. तात्पर्य, एखादी गोष्ट आपणांस कितीही चांगली वाटली, तथापि दुसऱ्यांनीं तिचा स्वीकार केलाच पाहिजे अशी सक्ती करण्याचा आपणांस अधिकार नाहीं. आपण पाहिजे तर त्यांचें मन वळविण्याचा प्रयत्न करावा, परंतु यापुढें मात्र आपणांस जातां येणार नाहीं. वरील विचारावरून हेंही ध्यानांत येण्यासारखें आहे कीं, ज्याप्रमाणें एखाद्या व्यक्तीच्या आचारविचारापासून समाजाचें नुकसान नसतां तो आचारविचार बदलण्याची समाजास सक्ती करतां येत नाहीं, त्याचप्रमाणें आधींच जर समाजानें सक्ती केली असेल, तर ती नाहींशी करणें हेंही समाजाचें कर्तव्य होय; व तें बजावण्यास समाज तयार नसेल तर समाजाचा विशेष जोरदार प्रतिनिधी जें सरकार; त्यानें पुढें झालें पाहिजे. पातिव्रत्यसंरक्षणार्थ स्त्रियांनीं आपणांस पतिचितेवर जिवंत जाळून घ्यावें हें अत्यंत मूर्खपणाचें, अविचाराचें व साहसाचें कृत्य होय असें समजून, लोकांची वाट न पहातां सरकारनें एकदम या

कामीं कायदा करून ती क्रूर चाल बंद केली. एखाद्या स्त्रीचा पति निवर्तला असतां तिनें दुसरा पति करूं नये, अशी जी पातिव्रत्यसंरक्षणार्थ दुसरी सक्ती समाजानें केली आहे तीही व्यक्तिस्वातंत्र्याविरुद्ध आहे, हें सरकार जाणून होतें; परंतु सतीच्या चालीइतकी ती अमानुष नसल्यामुळें त्यांनीं कांहीं दिवस वाट पाहिली व योग्य काल आला असें दिसतांच तीही सक्ती दूर करून पुनर्विवाह कायदेशीर मानला जाईल म्हणून ठराव केला. आतां पातिव्रत्यसंरक्षणार्थ समाजानें केलेली तिसरी सक्ती म्हटली म्हणजे केशवपन होय. या केशवपनाच्या प्रघाताचें मंडन करणाऱ्या लोकांनीं त्यापासून किती जरी फायदे दाखविले व तो त्यास किती जरी समंत असला, तथापि ज्या स्त्रीचें वपन होणार तिची इच्छा नसतां व ती एकसारखा हंबरडा फोडून आपणास या ममताळू वैऱ्यांच्या तावडींतून कोणी सोडवील काय म्हणून गयावया होऊन चोंहीकडे दृष्टी फेंकीत असतां, तिला जुलमानें न्हाव्यापुढें बसविणें किती निंद्य आहे, व अशा रीतीनें तिचें स्वातंत्र्य हिरावणें म्हणजें केवढा घोर जुलूम आहे हें सिद्ध करीत बसण्याची आमच्या मतें मुळींच अवश्यकता नाहीं. ज्यांच्यावर हा घोर प्रसंग गुदरतो त्या परावलंबी अबलांस ही विटंबना कितपत मानवते, हें त्यांचें हृद्गत जाणणाऱ्या समवयस्क मैत्रिणीवांचून दुसऱ्यास सहसा सांगतां येण्यासारखें नाहीं! तथापि त्याची अटकळ कल्पनेनें अगदींच बांधतां येणार नाहीं असें नाहीं. ज्यानें आपणांस जन्म दिला, आपणांस लहानाचें मोठें केलें, व आपल्याकरितां अनंत कष्ट साहिले, त्या बापाच्या नांवानें मिशा बोडण्याचा प्रसंग दुर्दैवानें आला असतां, केवळ चटावर काम उरकून घेण्यास पुरुष कसे तत्पर असतात; १५-२० दिवसांनीं मुंडन केल्याचा मागमूसही राहण्याचा संभव नसून तें टाळण्यास काय काय उपाय योजतात; व मुंडन केल्यावांचून गत्यंतर नाहीं असा प्रसंग आला असतां, आपल्या बापाविषयीं आपली पूज्यबुद्धि व्यक्त करण्याकरितां ज्यांनीं आपलें मुंडित मुख मोठ्या गर्वानें लोकांस दाखवीत फिरावें; तेच लोक अंधार कोठडींत कशी दडी देतात, हें ज्यांनी पाहिलें असेल त्यास स्त्रियांच्या मनाची स्थिती कशी होत असेल याची कल्पना करणें कठीण नाहीं! लहानपणापासून ज्यांची जोपासना केली, ज्यांस न्हाऊं माखूं घालून वाढविलें, ज्यास नाना भूषणांनीं शृंगारिले असे केश क्षणार्धांत नाहींसे होऊन आपण सर्वांच्या तिरस्कारास पात्र होणार व पंधरा वीस दिवसांनी पूर्वस्थिति येण्याची तर आशा नाहींच, परंतु उलटें ज्यांचें मुखावलोकनही करावयास नको, अशा त्या परक्या नापितापुढें दर पंधरवड्यास मान वाकवावी लागणार, हे विचार मनांत येऊन या विटंबनेस सर्व स्त्रिया आपण होऊन राजी होतील अशी नुसती कल्पनाही करतां येत नाहीं. आपल्या अत्यंत जवळच्या आप्ताच्या किंवा आपल्या स्वतःच्या प्रिय

कन्येच्या अशा हालअपेष्टा पाहण्याचें ज्या हतभाग्यांच्या कपाळीं आलें असेल त्यांची अंत:करणें दु:खोद्वेगानें विव्हल झाल्यावांचून कदापि राहिलीं नसतील.

तात्पर्य, दुसरें लग्न करण्याची इच्छा असूनही तसें करण्यास कायद्याची आडकाठी असणें यांत जितका अन्याय आहे; त्याहूनही या विद्रूप करण्याच्या घोर चालींत अधिक अन्याय व प्रत्यक्ष जुलुमाचा प्रकार आहे, हें प्रत्येकास कबूल केलें पाहिजे, व तो अन्याय नाहींसा करण्यास कित्येकांनीं अर्ज करून कायदा करून घेतला असतां त्याहून अधिक अन्यायाचा व जुलुमाचा प्रकार बंद करण्याकरिता 'अमुक वयाच्या आंत मुळींच वपन करूं नये व त्यापुढेंही तें स्त्रीच्या मर्जीविरुद्ध होऊं नये' असा कायदा मागणें हें केवळ परंपरेस धरून आहे; यांत नवीन असें कांहींएक नाहीं

## सामाजिक सुधारणा आणि कायदा, नं.२

'म्हातारी मेल्याचें दु:ख नाहीं परंतु काळ सोकावतो' या न्यायावरच कायद्याचा प्रतिषेध करीत बसणें केवळ वेडगळपणाचें आहे, कारण सरकारनें सामाजिक गोष्टींत आधींच हात घातला आहे; तसेंच ज्या कांहीं सामाजिक गोष्टींत सरकारनें कायदे केले आहेत, व ज्या दुसऱ्या गोष्टींत कायदा असावा असें कित्येकांचें म्हणणें आहे, त्यामध्येंही त्या त्या गोष्टी सामाजिक या सदराखाली मोडतात किंवा नाहीं हा वाद अप्रासंगिक होय; व्यक्तिस्वातंत्र्य व समाजबंधन यांच्या ज्या योग्य मर्यादा आहेत त्यांचा अतिक्रम होतो कीं काय, एवढ्याच धोरणानें कायदा असावा कीं नाहीं हें ठरविलें पाहिजे, व सरकारानें जो सती जाण्यास प्रतिबंध केला, किंवा विधवेचें बेकायदेशीर मानलें जाणारें लग्न कायदेशीर ठरविलें, तेंही वरील तत्त्वास अनुसरून केलें, व विधवावपनाची चाल बंद करण्यास कायद्याची मदत असावी म्हणून जें कित्येकांचें मत आहे; तेंही वरील तत्त्वावरच अवलंबून आहे, वगैरे विचार वरील लेखांत दाखविले. या लेखांत बालविवाहाची चाल बंद करण्यास कायद्याचें साह्य घ्यावें असें जें कित्येकांचें म्हणणें आहे, त्याविषयीं दोन शब्द लिहिण्याचा आमचा विचार आहे.

बालविवाहाची चाल अत्यंत घातक आहे याविषयीं आतां बहुधा मतभेद राहिला नाहीं. तसेंच या दुष्ट चालीच्या तावडींतून आपण सुटलों असें म्हणतां येण्यास, मुलगी निदान १५-१६ वर्षांची होईपर्यंत व मुलगा २०-२२ वर्षांचा होईपर्यंत त्या उभयतांचाही 'नीतिशास्त्रांत' प्रवेश होऊ नये, हेंहीं पुष्कळांस संमत आहे. परंतु हें घडवून आणण्यास कोणते उपाय योजावेत याबद्दलच काय तो वाद राहिला आहे. एका पक्षाचें म्हणणें असें पडतें कीं, ही गोष्ट लोकांनींच आपल्या शिरावर घेतली पाहिजे; दुसऱ्या पक्षाच्या मतें केवळ लोकांवरच ही

जबाबदारी सोपविण्यापेक्षां, सरकार व लोक या उभयतांच्या साह्यानें हें काम शेवटास नेण्याचा प्रयत्न करणें नुसतें इष्ट आहे, इतकेंच नाहीं, तर तसें केल्यावांचून या बाबतींत आमचें पाऊल खात्रीनें पुढें जाण्याची फारशी आशा नाहीं. आतां सती जाण्याची चाल बंद करण्यास किंवा विधवाविवाह कायदेशीर ठरविण्यास जीं कारणें होतीं, किंवा विधवावपन बंद करण्यास जीं कारणें आहेत, तींच या बालविवाहाच्या चालीसही पूर्णपणें लागू होतात असें मात्र म्हणतां येणार नाहीं. व्यक्तिस्वातंत्र्य व समाजबंधन यांच्या योग्य मर्यादांचा जसा प्रत्यक्ष अतिक्रम वरील गोष्टींत होतो, तसा बालविवाहाच्या चालींत उघडपणें भासत नाहीं. या बालविवाहाच्या चालीमुळें लक्षावधी मुलांचा १२ दिवसांच्या आंतच मोक्ष होत असला, १६-१७ वर्षांतच मुलें बाप बनल्यामुळें त्यांची तारुण्यांतील हिम्मत व महत्त्वाकांक्षा सर्व जागच्या जागीं जिरून जात असलीं, किंवा ७-८ वर्षांपासूनच आईबापांच्या ममतेस पारखी होऊन, सासरच्या माणसांच्या धाकानें मुलीचें सर्व व्यक्तित्व नाहींसें होऊन संसाराचा गाडा हांकण्यास ती सर्वतोपरी लंगडी होत असली, तथापि त्यांत काय झालें? त्यांत घोर अनर्थ तो कोठें घडला? व तो बंद करण्यास कायदा कशास पाहिजे? असा एक पक्ष करतां येण्यासारखा आहे हें आम्ही जाणून आहों. आतां 'कृतांत कटकामलध्वजजरा दिसों लागली। पुर:सरगदांसवें झगडतां तनू भागली' अशी स्थिती होऊन जाऊन ज्यास मृत्युपाशानें घेरल्याची चिन्हें स्पष्ट दिसत आहेत, अशा ९९ वर्षांच्या थेरड्यास 'नवरा मुलगा' सजवून एकाद्या ७-८ वर्षांच्या अल्लड लेंकरास बहुल्यावरच 'रंडकी' करण्यांत ज्यास अनीतीचा यत्किंचितही भाग दिसत नाहीं, व तिचा मात्र पुनर्विवाह झाल्यास 'अब्रह्मण्यम' 'अब्रह्मण्यम्' म्हणून दाही दिशा दणाणून सोडण्यास जे तयार, अशा लोकांस आईबापांनीं व सासूसासऱ्यांनीं, केवळ आपल्या हौसेखातर सजीव बाहुलाबाहुलींचीं लग्नें लावण्याचा खेळ खेळल्यापासून 'तुमचा खेळ होते, परंतु आमचा जीव जातो' असें म्हणण्यास कशी जागा सांपडते हें कळूं नये; हें अगदीं असावें तसेंच आहे. तसेंच एखाद्या चोरट्या सुनेस आळ लावण्याकरितां तापल्या पळीनें डागणें, किंवा तिला उलटी टांगून तिच्या पाठीची सालडी काढणें हें जसें सासूचें कर्तव्यच आहे, त्याप्रमाणें पुढें मागें वाईट पाऊल पडेल एवढ्या संशयाच्या आरोपावरून एखाद्य बालविधवेची न्हाव्याकडून धिंड काढविणें, हे केवळ यथान्याय आहे अशीच ज्यांची समजूत; अशा लोकांनीं बालविवाहाच्या कायद्याच्या आड यावें यांतही कांहीं विलक्षण नाहीं. व 'ही राष्ट्रीयसभा नुसत्या ब्राह्मणांचीच आहे व यापासून ब्राह्मणलोक आपलाच फायदा करून घेत आहेत' असे अजागळासारखे प्रलाप करणारे लोक वेडे आहेत म्हणून

जसें सरकारनें ते जमेस धरण्यासारखे नाहींत तसेंच वरील लोकांचीही सल्लामसलत घेण्याचें सरकारास कारण नाहीं. परंतु राजकीय गोष्टींत मत देण्यास ज्यांस अधिकार आहे, अशा सुशिक्षित लोकांत या बाबतींत केवळ एकमत जरी झालें नाहीं तरी कायदा असावा असें बहुमत झाल्यावांचून मात्र कायदा करणें योग्य होणार नाहीं हें उघड आहे.

आतां, ज्या गोष्टींत प्रत्यक्ष अन्याय किंवा जुलूम होत नसेल असे समाजांतील दोष कायद्यानें काढूं पहाणें योग्य नाहीं असें आम्हीं पूर्वी दर्शविलें असून या चालीच्या निरसनार्थ कायद्याची मदत घ्यावी असें कां म्हणतो, हें प्रथम सांगितले पाहिजे. बापानें मुलास, पंतोजीनें शिष्यास, किंवा भाडेकऱ्यानें आपल्या तट्टांस, ममतेनें, मन वळवून, चुचकारून मार्गास लावावे हा प्रथम पक्ष; परंतु तशानें सर्वच प्रसंगीं कार्यभाग होतो असें नाहीं. कधीं मुलास बागुलबोवाचें भय दाखवावें लागतें, कधी शिष्यास घोडीवर चढविणें भाग पडते, व तट्टास बाभळीच्या फोंकावांचून दुसरा उपाय अपुरा पडतो. तीच गोष्ट प्रस्तुत प्रसंगींही लागू आहे. लग्न म्हणजे पोरखेळ नव्हे, त्याचा व समाजाच्या हिताचा फार निकट संबंध आहे; तेव्हां एकदा कशी तरी पोरांचीं हाडें भाजून काढलीं कीं गंगेंत घोडें न्हालें असें समजून, काळ वेळ वगैरे कांहीं न पहातां, जीं आईबापें आपल्या मुलांमुलींस चतुर्भुज करण्याविषयीं अगदीं हावरीं झालेलीं असतात, त्यांनीं आपलें कर्तव्य जाणून स्वसंतोषानें हा 'पोरखेळ' सोडावा तर राजमार्ग. परंतु आईबापांच्या अज्ञानामुळें किंवा दुराग्रहामुळें तीं तसें करण्यास तयार नसतील, तर त्यांस कायद्याच्या बागुलबोवानें भिवविणें अर्थात अवश्य होतें. आतां नुसत्या आईबापांच्या धाकानें, किंवा शिक्षकाच्या दबकावणीनें मुलांची सर्व सुधारणा होणारी नाहीं, मुलानेंही कांहीं उमजलें पाहिजे हेंही खरें. परंतु चवदाव्या रत्नाच्या भीतीनें एकदां त्यास वळण लागलें, म्हणजे हळूंहळूं त्या वळणाच्या गोडीनेंच त्याची सुधारणा होत जाते. तसेंच बालविवाहाची चाल मोडून योग्य कालीं विवाह होऊं लागल्यास केवळ कायदा बस्स आहे असें आम्हीं मुळींच म्हणत नाहीं. कायद्यानें फारच थोडा टप्पा साधणार आहे, पुढचा सर्व मार्ग क्रमण्यास समाजाच्या पायांतच जोर पाहिजे, त्यावांचून तो आंवरणार नाहीं हें उघड आहे. कायदा फार झाले तर मुलीच्या बाबतींत १०-१२ वर्षांपर्यंत मजल मारील, किंवा मुलाच्या बाबतीत १६-१७ वर्षांपर्यंत विवाहमर्यादा नेईल. परंतु एवढ्यानेंच आपणांस समाधान मानून बसतां येत नाहीं. आपणास त्याच्या पुष्कळ पुढें गेलें पाहिजे. कायद्याच्या योगानें इतकेंच होईल कीं, १०-१२ व १६-१७ ही मर्यादा तरी कायमची झाल्यासारखी होईल. आजमितीस ज्या लोकांस या दुष्ट चालीचे परिणाम

माहीत नाहींत, तेच याच्या पूर्वी लग्नें करतात असें नाहीं; ज्या लोकांस आपली चूक पूर्णपणें दिसत असते अशाही लोकांस मुलगी ७-८ वर्षांची झाली नाहीं तोच व मुलास १२वें वर्ष लागलें नाहीं, तोंच त्यांच्या लग्नाच्या फिकीरींत पडावें लागतें. कारण, जातिभेदामुळें वधूवरांची निवड करण्यास फारच आंकुचित प्रदेश असल्यामुळें, व त्यांतल्या त्यांत नवीन शास्त्रार्थ मध्यें घुसून ब्राह्मणांतल्या ब्राह्मणांतच देशस्थ, कोकणस्थ, कऱ्हाडे, असे वर्ग उत्पन्न झाल्यामुळें आपण आपली मुलगी किंवा मुलगा वाढविला असतां, त्यास पुढें योग्य स्थळ कसें मिळेल, ही काळजी आईबापांपुढें दत्तासारखी उभी राहून त्यांचे सुधारणेचे सर्व विचार जागच्या जागीं थिजून जातात. एखाद्या मनुष्याचे हात बांधून टाकून तो कांहीं उद्योग करीत नाहीं म्हणून त्यास दोष देणें शहाणपणाचें नाहीं. तसेंच सुधारणा व्हावी असें इच्छिणाऱ्या व बोलून दाखविणाऱ्या लोकांच्या अडचणी दूर करतां येण्यासारख्या असूनही त्या दूर न करितां 'क्रियेवीण गोष्ट वाचाळता व्यर्थ आहे'' असा मोठ्या आढ्यतेनें उपदेश करीत बसणें, व जी गोष्ट आपल्या हातून घडत नाहीं, तीच दुसऱ्यांनीं न केल्याबद्दल त्यांचा उपहास करीत बसणें, केवळ चुकीचें होणार आहे. ज्या सुधारणेचा केवळ स्वतांपुरतांच परिणाम घडणारा असतो अशा गोष्टींत मनुष्यानें स्वतांस झीज लावून घेऊन, धैर्याचें उदाहरण जगास दाखवावें हें योग्य आहे. परंतु ज्या सुधारणेचा दुसऱ्याच्या हिताहिताशी प्रत्यक्ष संबंध पोहोंचतो अशा गोष्टींत, आपलें बोलणें खरें करून दाखविण्याकरितां, आपलें व आपणांवर अवलंबून असणाऱ्या मुलाबाळांचें नुकसान करण्यास प्रवृत्त होणें, सर्वथा योग्य आहे असें खात्रीनें म्हणतां येण्यासारखें नाहीं. तात्पर्य, बालविवाहाची चाल घातक आहे असा जरी पुष्कळांचा समज झालेला आहे, तथापि इतरांचाही तसा झाला आहे किंवा नाहीं याविषयीं साशंक असल्यामुळें, व आपल्या मुलाबाळांचें हिताहित पहाणें विशेष महत्त्वाचें कर्तव्य असल्यामुळें, त्या विचारांचा आचारावर परिणाम घडण्यास जी एक मोठी अडचण येते; ती ह्या कायद्यानें दूर होण्यासारखी आहे. सर्वच मुलींचीं लग्नें १०-१२ वर्षांच्या आंत होणार नाहींत किंवा सर्वच मुलांची १६-१७ वर्षांपूर्वी होणार नाहींत अशी कायद्यानें हमी घेतली असतां सर्वांचीच काळजी दूर होईल व आपलें एकतरी पाऊल पुढें पडलें असें खात्रीनें म्हणतां येईल. शिवाय १०-१२ वर्षांपर्यंत कांहीं मुली अविवाहित राहतात, व त्याबद्दल कोणी तक्रार करीत नाहीं, येवढ्यावरून असा कायदा करण्यास लोकांची धर्मसमजूत आडवी येते, असेंही म्हणतां येणार नाहीं. तात्पर्य, अशा बाबींत सामान्य दृष्टीनें पहातां कायद्याची मदत घेणें जरी सर्वांशीं ग्राह्य नाहीं, तथापि आमच्या समाजाचा पूर्व इतिहास व सांप्रतची स्थिति ही मनांत आणतां हें

आमचें निगरगट्ट तट्टू कायद्याच्या फोंकावांचून सहसा हलणार नाहीं असें आम्हास वाटतें.

आपल्या सुशिक्षित मंडळीस खरोखर आपली सुधारणा व्हावी ही गोष्ट जर इष्ट असेल तर आमच्या मतें त्यांनीं या कायद्याच्या आड येण्याचें कारण नाहीं. बाकी सुधारणाच नको असेल तर मग खुशाल 'थंडे सुधारक' व 'उतावळे सुधारक' वगैरे निरर्थक कोटिक्रम लढवून पांडित्य करीत बसावें. आम्ही जसा कायदा असावा असें सुचविलें आहे, त्यांत वावगें असें कांहीं एक नाहीं. त्याच्या योगानें समाजाच्या धर्मसमजुतीस धक्का पोहोंचण्याचें भय नाही, त्याच्या योगें पुष्कळांस इष्ट असणारी सुधारणा अनायासानें होणारी आहे, व तीही फारच नियमित असून सर्वांस संमत अशीच आहे. 'तुमच्या राष्ट्रीय सभेंत स्त्रियाही हजर आहेत, हें पाहून मला फार आनंद होतो' असे मि. ब्राडलाचे उद्‌गार ऐकून टाळ्यांचा गजर करून सोडणारे हिंदुस्थानच्या २५ कोटि प्रजेचे मुखत्यार जर अप्रामाणिक नसतील; तर या कायद्यानें विवाहमर्यादा कायमची १०-१२ वर्षांवर येऊन, तितका वेळ तरी, ज्यास जसें इष्ट असेल तसें मुलीस शिक्षण देण्याची सोय होणारी आहे, अशा विचारानें ते या कायद्याच्या आड येणार नाहींत अशी आम्हांस आशा आहे. १०-१२ वर्षांच्या पूर्वी विवाह न झाल्यानें पुष्कळ बालवधूंचें कुंकूं पुसलें जाणार नाहीं; अशा मुग्धवयांत सासरीं कसें वागावें हें न कळल्यामुळें त्यांच्या हातून ज्या चुका होतात, त्यांसही संधी राहणार नाहीं; व आईबापांच्या बेचाळीस कुळांचा उद्धार होण्याचें थांबून त्या लेकरांचाही पुष्कळ जाच अनायासें दूर होईल. पेनाच्या एका तडाख्यासरशीं सर्व सुधारणा करूं पहाण्याचा आरोपही या कायद्यावर आणतां येण्यासारखा नाहीं. बालविवाहाचा प्रघात खरोखर मोडण्यास समाजानेंच तयार झालें पाहिजे, ही गोष्ट हा कायदा विसरला नाहीं. बापाच्या घरीं मुलीस ऋतु प्राप्त झाला असतां बेचाळीस कुळया नर्कांत जाणार ही वेडगळपणाची समजूत दूर करणें, म्हणजे एकादा प्रचंड पर्वत जमीनदोस्त करण्यासारखें आहे, व या पर्वतावर आघात करीत बसण्याचें काम समाजासच केलें पाहिजे. तें मात्र कायद्यानें होणें अशक्य आहे. फार दिवसपर्यंत एकाच स्थितीशीं खिळून गेलेल्या या आमच्या समाजास प्रथम गती देण्याचें काम मात्र कायद्यानें होणारें आहे. आगगाडी चालूं लागण्यापूर्वी जसा थोडासा धक्का सोसावा लागतो, तसाच हा कायद्याचा कडक उपाय गौण असला तथापि तो पत्करला पाहिजे. एखादा मनुष्य रोगानें जर्जर झाला असतां नुसत्या मात्रेच्या वेढ्यानें त्यास पूर्ण उतार पडून तो धट्टाकट्टा होतो असें नाहीं, तर त्याच्या योगानें केवळ प्राण मात्र बचावतो, तशीच केवळ या कायद्याची गोष्ट आहे. यांत उतावळेपणाचा गंधही नाहीं. ज्या सरकारच्या

न्यायप्रियतेवर आमचा इतका विश्वास आहे कीं, आम्ही सर्वस्वी गुलाम बनलों आहों, तथापि त्याच्याच मदतीनें आम्ही स्वतंत्र ज्ञानपद होऊं असा आमचा पूर्ण भरंवसा आहे, ज्यांच्या केवळ भूतदयेनें असंख्य गुलाम आज स्वातंत्र्य भोगीत आहेत, व आम्हांसारख्या परधर्मी, भिन्नवर्णी, व हजारों कोसांच्या अंतरावर राहणाऱ्या लोकांच्या कल्याणासाठी अश्रांत श्रम करणारे मि. ह्यूम, मि. ब्राडलॉ, ह्यांच्या सारखे शेंकडों उदार महात्मे ज्या लोकांत निपजतात, त्या लोकांनीं नियंत्रित अशा हिंदुस्थान सरकारापाशीं आम्ही कायदा मागितला असतां काय परिणाम ओढवतील कोण जाणे; म्हणून बळेंच आपण भ्याल्यासारखें दाखवून दुसऱ्या असंख्य लोकांस भिववण्याचा प्रयत्न करण्यांतच जर थंडी सुधारणा असेल तर अशा थंड्या सुधारकांपासून ईश्वर आम्हांस वाचवो! आम्हांस त्यांची ही प्राणघातक माया नको! ज्यांच्याकरितां एखादी सुधारणा करावयाची त्यांच्यावर त्या सुधारणेनें प्रत्यक्ष जुलूम होत असूनही ती सुधारणा कोणी करूं पाहील तर त्याच्या आड येणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे. व अशा लोकांसच जर योग्य रीतीनें 'थंडे सुधारक' म्हणतां येईल तर मग बालविवाहाच्या दुष्ट प्रघातांत, लोकांवर प्रत्यक्ष जुलूम न करितां, अंशत: प्रतिबंध करण्यास साधनीभूत असा कायदा मागणाऱ्या लोकांस 'उतावळ्या सुधारकांत' ओढून, 'तुला न मला, घाल कुत्र्याला' असा प्रकार सुशिक्षित म्हणविणाऱ्या लोकांनी कां करावा, हें आम्हांस समजत नाहीं.

*

# सामाजिक सुधारणा परिषदेचे निंदक

राष्ट्रसभेच्या पाठीमागून सामाजिक विषयाचा विचार करण्याकरितां गेलीं दोन वर्षे, दोन सामाजिक परिषदा झाल्या. राष्ट्रसभेसाठीं एकत्र जमणाऱ्या लोकांना अनायासें सामाजिक गोष्टींविषयीं चर्चा करण्यास सांपडून, त्यासंबंधानें एकमेकांचे विचार एकमेकांस कळविण्यास व ताडून पहाण्यास सांपडावें, आणि जमल्यास एखादी विशिष्ट सुधारणा अमलांत आणण्यासाठीं सर्वांनी एकत्र बसून एखादी तोड काढावी, या हेतूनें गेल्या दोन सामाजिक परिषदा भरविण्यांत आल्या, हें सांगावयाला पाहिजे असें नाहीं. अशा प्रकारच्या सभांपासून व्हावा तितका फायदा तत्काळ होण्याचा संभव नाहीं, हें स्वल्प विचाराअंती ध्यानांत येण्यासारखें असतां, शिगें मोडून घेऊन वासरांत शिरणारे सुशिक्षित पण लोकरंजनपरायण, लौकिकाभिलाषी, दुराग्रही, व कांहीं अंशीं भेकड असे कित्येक लोक, अशा परिषदांचें आपणाकडून होईल तितकें अभिनंदन करण्याचें सोडून देऊन, त्यांवर तुटून पडूं लागले आहेत, हें पाहून कोणत्या समंजस मनुष्यास विस्मय व खेद होणार नाहीं? सामाजिक परिषदेचें काम नीट न झालें तर त्याबद्दल लाज कोणाला? ज्यांनीं ती स्थापून तिच्या द्वारें कांहीं सामाजिक हित झालें तर पहावें, म्हणून आपणांकडून होईल तितकी खटपट चालविली आहे; त्यांना? किंवा जे त्याला आणवेल तेवढा व्यत्यय आणतात त्यांना? 'अमुक प्रकारचे लोक अमुक रीतीनें सुधारणा करूं पहात आहेत, पण त्यांची ती रीत आम्हांस मान्य नाहीं,' असें म्हणून कांहींच न करणें, किंवा उपहास करीत सुटणें, हें फार सोपें आहे! शंका कोणाला घेतां येत नाहींत? दोष कोणाला दाखवितां येत नाहींत? पाडापाड व मोडतोड करण्याला कोणाला कष्ट पडतात? असलीं कामें कोणीही करूं शकेल! शंकांचें समाधान करणें, दोषयुक्त वस्तूंतील चांगला भाग ओळखून त्याला बळकटी आणण्याचा प्रयत्न करणें, व जें पडलें मोडलें असेल त्याची डागडुजी करणें किंवा कांहीं तरी नवीन बांधणें हें किती कठिण आहे? जो हें करील तोच खरा कसबी. अशाला 'दुर्धारक' म्हणून, जे आपणांस व्यंग्योक्तीनें 'खरे सुधारक' ही संज्ञा लाऊन घेतात, व दुर्धारकांवर दुःशब्दांचा प्रहार करीत सुटतात; त्यांनीं आजपर्यंत काय दिवे लाविले आहेत? आजकाल सामाजिक गोष्टींत जी जागृति

दृष्टीस पडूं लागली आहे, तींत यांचें किती अंग आहे? व तीबद्दल त्यांनी काय केलें आहे? स्त्रीशिक्षणासाठीं मुलींचीं हायस्कुलें घालणें चांगलें नसेल, पण या 'मित' सुधारकांनीं आपल्याच पद्धतीनें कां होईना, यासंबंधानें काय केले आहे? पाहिजे त्या वयाच्या गतभर्तृकेनें पुनर्विवाह करण्यास हरकत नाहीं, असें जर कधीं कोणी म्हटलें असेल तर त्यास अधीर ठरवून, या 'माफक' सुधारकांनी ऋतुस्नात होण्यापूर्वी जेवढ्यांस वैधव्य प्राप्त झालें असेल, तेवढ्या अनाथ कन्यकांस तरी सनाथ करण्याचा प्रयत्न कां केला नाहीं? लग्नाच्या वयाच्या इयत्तेविषयीं कायद्याचें बंधन करून घेणें हितावह नसेल, पण दहा वर्षांहून लहान वयाच्या मुलीचें लग्न करणें बरोबर नाहीं, हें जर या 'खऱ्या' सुधारकांस संमत असेल, तर दहा वर्षांच्या आंतील वयाच्या कोणत्याही मुलीच्या भालप्रदेशावरील कुंकुमांकास धक्का न पोहचूं देण्याविषयीं यांनी काय खबरदारी ठेविली आहे? ऋतु प्राप्त न झालेल्या स्वस्त्रीशीं गमन करणाऱ्या उतावीळ नवऱ्याला पीनल कोडानें अपराधी समजून शिक्षा ठोठावावी, असें म्हणणें अविचार असेल, पण जर अशा प्रकारचा संभोग निंद्य आहे, असें समाजाच्या या निष्कपट हितचिंतकांस वाटत असेल, तर त्यांनीं अशा प्रकारचा अनाचार न होऊं देण्याबद्दल आजपर्यंत काय तजविजी केल्या आहेत, त्या आज ते जगापुढें मांडूं शकतील काय? सर्वच गतभर्तृकांना वपन करून घेऊन कुरूप होणें संकटावह वाटत नसेल, पण ज्यांवर तो प्रसंग मूर्ख मातापितरांच्या किंवा निर्दय सासूसासऱ्यांच्या जुलमामुळें येत असेल, त्यांना त्यांतून सोडविण्याबद्दल दुर्धारकांच्या या निंदक सुधारकांनीं कोणते उपाय केले आहेत? मांडीवर मांडी ठोकून वल्गना करीत सुटणें, दुसऱ्याचीं व्यंगें काढणें, मूढ अविचारी लोकांकडून पाठ थोपटून घेण्यासारखा प्रलाप करणें, व कांहीं न करतां आपणांस देशहिताची मोठी कळकळ आहे, व तें साधण्यासाठीं आपण नेहमीं झटत आहों, असें दाखविणें फार सोपें आहे! जर असें नसतें, व अनेक युगें रूढ होऊन बसलेल्या अपायकारक आचाराविरूद्ध जाणें हें किती अवघड आहे, हें सहज समजण्यासारखें असतें, तर सामाजिक सुधारणा परिषदेसारख्या संस्थेच्या न्यूनत्वाची टिमकी वाजवीत न बसतां तें काढून काढून टाकून, तिला सुरूपता व हितकर्तृकता आणण्याचा प्रयत्न या 'माफक' व 'खऱ्या' सुधारकांनीं खचित केला असता!

✷

# अजून तरी सावध व्हा

गेल्या दीनबंधूंतील लेखकानें अन्वर्थ काम केलें. अनाथ, दीन, अबला गाईंस वैधव्याची जन्मभर आठवण देणारा जो न्हाव्यांचा वर्ग; त्यांस चार गोष्टी सांगून त्यांच्या हातून प्रत्यहीं जें अघोर कर्म होत आहे, तें स्वत: होऊन बंद करण्याचा उपदेश केला आहे. अहो, धर्मसमता ठेवणारे, वेदोक्त धर्माचे अभिमानी आचार्य दीक्षितांनो! आतां तरी कांहीं लाज धरा. तुमच्या लेकी, सुना, व भगिनी यांची दया तुमच्या शूद्र बंधूंस येऊन त्यांनीं सद्वासना धरली व अशरण स्त्रियांस तुमच्या धर्माच्या- अधर्माच्या असेंच म्हणणें सयुक्तिक आहे- चिखलांतून बाहेर काढून टाकण्याचें मनांत आणलें आहे, तें पाहून माना खालीं घाला. न्हाव्यांकडून कट झाला असतां, ब्राह्मण लोक भादरण्याचा धंदा पत्करून विधवावपनाची चाल कायम ठेवतील असें आम्हांस वाटत नाहीं. वेळेवर जागे व्हाल तर बरी गत आहे, नाहीं तर सुधारणेचा शकट आज जो ब्राह्मणांकडून बऱ्याच अंशानें हांकला जात आहे, तें सर्व फिरून आजपर्यंत अडाणी मानलेल्या लोकांकडे त्याचें धुरीणत्व जाईल, हें ध्यानांत धरा. ब्राह्मण स्त्रियांची दैना पाहून शूद्र लोकांस गहिंवर यावा व स्वलाभाची संधी सोडून म्हणजे आपल्या पोटावर बिब्बा घालून ब्राह्मण भगिनींचा उद्धार करण्याची खटपट करावी; अशीं उदाहरणें आपल्या डोळ्यादेखत घडत असतां, अजून कलियुगच आहे, या युगांत लोक नीतिभ्रष्ट होत जाणार, इत्यादी वृथा जल्पना करणाऱ्यांचे दांत त्यांच्या घशांत घातलेसें होत नाहीं काय? दीनबंधूनें सुचविल्याप्रमाणें न्हाव्यांत जर कट झाला, तर किती बरें मजा होईल?

धर्मांधकारांत लोळणाऱ्या स्त्रिया, पैशाच्या लालचीनें हजामत करणारे न्हावी, व अपवादभयानें नातेवाईक लोक, इतके सर्व पापाचरणामध्यें बुडत आहेत. यांपैकीं दोघांनी मन घट्ट केलें असतां, तिसऱ्याचें कांहीं न चालून त्यास गप्प बसावें लागेल. स्त्रियांनीं आपल्या संरक्षणाकरितां पुढाकार घेऊन या राक्षसी रीतीविरुद्ध बंड करावयाची वेळ येण्यास अजून बराच अवकाश आहे. राहतांपैकी राहिले दोन वर्ग. ज्या लोकांत केशवपनाची चाल आहे त्या जातींतील, म्हणजे ब्राह्मणवर्गांतील बरेच लोक आधुनिक शिक्षणाच्या जोरानें; स्त्रियांवर होणारा जुलूम पाहण्यास दिवसानुदिवस नाखुष होत आहेत, हा काय तो संतोषाचा भाग आहे?

आतां ह्याच अमानुष कृत्यांत ज्यांचा हात आहे, असा तिसरा वर्ग न्हाव्यांचा. दीनबंधूनें लिहिल्याप्रमाणें खरोखरच त्या वर्गाची हलाखी असल्यास, आपल्या दुष्कर्माचरणानें फिदा होणारी अक्काबाई त्याने लवकर लाथ मारून बाहेर घालवावी. कारण पतिशोकानें गताधार झालेल्या स्त्रीलतेवर वज्रभेदी शस्त्रानें तिच्या सौंदर्याचा विध्वंस करणाऱ्या कठोरहृदय न्हाव्यांच्या हातून प्रतिदिनी पातक होत नाहीं काय? तिचे ते पाषाणासही द्रव आणणारे करुण शब्द ऐकून त्याच्या-तो मनुष्यच आहे-मनाची काय स्थिति होत असेल? संसारापासून कोणाची निवृत्ति करावयाची असल्यास त्यास हा धंदा सांगावा म्हणजे झालें! असो. याप्रमाणें संसार असार आहे, अशी खातरी होत जाणाऱ्या नापितवर्गाची या मर्त्यलोकीं चलती चालत नाहीं, यांत काय आश्चर्य आहे? आपल्यावर पडणारी ही गदा घालविणे नापित वर्गाच्या हातांत आहे. त्यांनीं कट करून अनाथ गाईंचा आम्ही छल करणार नाहीं अशी सर्व जातीसमक्ष शपथ घेतल्यास काय गंमत होईल? दिवसानुदिवस मानसोन्नति होत जाणाऱ्या श्रेष्ठ लोकांचा, या पापकृत्यापासून होणारा संताप जर सद्धर्माने वर्तन करूं इच्छिणाऱ्या धनाभिलाषी न्हाव्यांच्या तिरस्कारास मिळाला; तर फार दिवसांपासून इष्ट वाटत असलेली सुधारणा सुरूं केल्याचें आपल्यास श्रेय येणार नाही काय? लोकापवाद कमी झाला व केशकर्तनकारांचा कट झाला तर गरीब बिचाऱ्या गाईंस धर्माचें पांघरूण घेणाऱ्या या भुताटकी चालीला, स्मशानभूमी दिसण्याचा दिवस जवळ जवळ येणार नाहीं काय?

सरकाराकडून कायदा मागण्याचा तरी हेतु हाच आहे. यामध्यें कोणत्याही विशिष्ट वर्गास दुखविण्याचें आमचें मानस नाहीं. जशी आपल्यामध्यें कांहीं कांहीं गोष्टींमध्यें सुधारणा करण्याचें बऱ्याच लोकांच्या मनांत येत आहे, त्याचप्रमाणें इतर वर्गांच्याही मनांत निष्पाप वर्तन करण्याचें आल्यास, या कामीं तरी सरकाराकडे जावें लागण्याचें कांहीं कारण राहील असें आम्हांस वाटत नाहीं.

सारांश, तात्पर्य इतकेंच घ्यावयाचें कीं, आमच्या श्रेष्ठ वर्गांतील स्त्रियांची सुटका करण्याचें इतर जातींच्या मनांत येत असतांनाही जर ज्यांचें नुकसान होत आहे अशा समजूतदार व श्रेष्ठ वर्णाच्या जातींत आपल्या येथील घाणेरडा तबेला धुण्याचें मनात येणार नाहीं; तर मात्र सरकाराकडे गाऱ्हाणें न्यावयास आम्हीं कधींही कमी करणार नाहीं. देवदयेनें सध्यांचा प्रसंग चांगला आहे; तेव्हां सगळ्यांनी सावध व्हावें.

*

# अनाथाचा वाली कोणी नाहीं!

अलीकडे आमच्या युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत जे फेरबदल होत आहेत त्याकडे पाहिलें असतां, त्या मंडळींत जे जबरदस्त आहेत त्यांनीं हवें तें करावें, व लोकांचें खरें हित ज्या अभ्यासांत आहे. त्याकडे कोणींच लक्ष देऊं नये, असा प्रकार घडत आहे, असें दिसून आल्यावांचून राहणार नाहीं. थोड्या वर्षांपूर्वी सर रिचर्ड टेंपल यांस आर्ट्स् कोर्समधील दोन परीक्षांच्या ऐवजीं तीन कराव्या असें वाटलें. खुद्द गव्हर्नराच्या व चॅन्सेलराच्या, व त्यांतही सर रिचर्डसारख्या गव्हर्नराच्या व चॅन्सेलराच्या मनांत कांहीं हुक्की आल्याबरोबर ती तडीस जाण्यास काय कठीण पडणार? युनिव्हर्सिटीचे लोक आपणांस मोठे सुशिक्षित व स्वतंत्र म्हणवितात, व जे त्यांवर जुलूम करीत नाहींत, त्यांपुढे ते आपल्या स्वतंत्रतेची ऐट मिरवितातही! पण सर रिचर्डपुढें त्यांचें कांहीं एक चाललें नाहीं. सेनेटच्या एका बैठकीला दोन परीक्षा मोडून त्यांचे जागी तीन केल्या, व आर्टस् कोर्स जितका कंटकमय करणें शक्य होतें, तितका करून सोडिला. ही तीन परीक्षांची व्यवस्था झाल्यापासून बी.ए. चा अभ्यास करणाऱ्यास कॉलेजांत प्रवेश केल्यापासून त्यांतून बाहेर पडेतोंपर्यंत दम टाकण्यात, एक दिवसाची फुरसत मिळेल तर ज्याचें नांव तें! एका परीक्षेच्या चरकांतून पार पडावें तों दुसरी 'दत्त' करून पुढें उभी आहेच! पूर्वी दीड वर्षानें एकेक परीक्षा घेतली जात असे, त्यामुळें अभ्यास मुरवण्यास वेळ सापडे. इतकेंच नाहीं, तर विद्यालयस्थ आयुष्यक्रम आतांहून अनेक प्रकारांनीं विशेष सुखावह करून घेता येत असे. पहिल्या कोर्समध्यें पहिली व चौथी टर्म; विद्यार्थ्यास खेळणें, पोहणें, हिंडणें, अभ्यासाच्या क्रमाच्या बाहेरचीं पुस्तकें वाचणें, नवीन ओळखी करणें वगैरे गोष्टींत घालवितां येत असे. सध्यां तसें मुळींच करतां येत नाहीं; कारण प्रत्येक वर्षाच्या अखेरीस एकेक परीक्षा ठेऊन दिली असल्यामुळें, कॉलेजाच्या संवस्तराच्या वर्षप्रतिपदेपासून त्याच्या फाल्गुन वद्य अमावस्येपर्यंत पुस्तकाच्या समागमांत अहोरात्र दंग असावें लागतें. याप्रमाणें विश्रांति न सांपडतां तीन वर्षेपर्यंत सारा वेळ मानसिक श्रम करावे लागत असल्यामुळें, हा कॉलेजांतर्गत त्रिवार्षिक शिक्षणक्रम अत्यंत कष्टावह झाला आहे, हें अशा प्रकारच्या गोष्टीकडे बिलकुल ढुंकून न पाहणाऱ्या लोकांशिवाय बाकीच्यांस पूर्ण विदित झालें आहे.

हें सर्व रिचर्ड टेंपल यांच्या आग्रहाचें फळ!

टेंपल व फर्ग्युसन साहेब जाऊन लॉर्ड रे आले. लोकशिक्षणाविषयीं यांनीं फार विचार केलेला, असा याचा लौकिक; यांचे पाय या देशास लागण्यापूर्वी येथें येऊन थडकला असल्यामुळें, हे आमच्या युनिव्हर्सिटींत कांहीं तरी विलक्षण फेरफार करतील असें वाटलें होतें. पण सुदैवानें तसें त्यांनीं केलें नाहीं. युनिव्हर्सिटीच्या अधिकारांत किंवा व्यवस्थेंत लार्ड रे यांनीं बिलकुल ढवळाढवळ केली नाहीं. सर्व परीक्षांचें अभ्यासक्रम व त्यांच्या मुदती जशा ते येण्यापूर्वी होत्या तशाच बहुश: अजून आहेत; व त्यांत जे अल्पस्वल्प फेरफार झाले आहेत, ते युनिव्हर्सिटीनें आपले आपण केलेले आहेत.

मध्यम व वरिष्ठ शिक्षणास लॉर्ड रे यांनीं बाहेरून जितकी मदत करवली तितकी केली. त्या शिक्षणाच्या अभ्यासक्रमांत त्यांनीं हात घातला नाहीं. यांत्रिक शिक्षण वाढलें पाहिजे; त्यात लोकांचें खरें हित आहे; अशी त्यांची पक्की खातरी होऊन गेली होती. पण या कामीं युनिव्हर्सिटीकडून म्हणण्यासारखी मदत मिळण्याचा संभव नाहीं, असें त्यांस तेव्हांच दिसून आल्यामुळें त्यांनीं तिचा नादच सोडून दिला, आणि मग स्वतंत्र यांत्रिक शाळा स्थापण्याकडे आपलें लक्ष्य लावलें. **व्हिक्टोरिआ ज्यू. टेक्निकल इन्स्टिट्यूट** ही त्या हेतूनें त्यांनीं केलेल्या दीर्घ परिश्रमाचें फळ होय. शास्त्रीय विषयांकडेही लोकांचें लक्ष विशेष लागावें, असें त्यास वाटत होतें; पण तें घडवून आणण्यांतही त्यांनीं बाहेरून बाहेरून जितकें करवलें तितकेंच केलें. सर रिचर्डप्रमाणें युनिव्हर्सिटींत आपली चॅन्सेलरगिरी बजावली नाहीं! सरकारी नोकरीवर जे लोक ठेवायाचें, त्यांत कोणत्या प्रकारचें शिक्षण मिळालेलें असावे याचा निश्चय करण्याचा अधिकार वाजवी रीतीनें सरकाराकडे येतो. या योग्य अधिकाराचा फायदा घेऊन, त्यांनी आमच्या मॅट्रिक्युलेशन परीक्षेस बिलकुल न दुखवितां युनिव्हर्सिटीकडून सरकारासाठीं युनिव्हर्सिटी- स्कूलफायनल नांवाची नवीन परीक्षा अस्तित्वांत आणविली, व तिच्या द्वारें आपला हेतू नेववेल तितका स्वतंत्रपणें तडीस नेण्याचा प्रयत्न केला. तसेंच, मेडिकल व सायन्स कॉलेजांस हवी तितकी मदत करून, व व्हाईस चॅन्सेलरच्या जागेवर रे. मि. म्याकिकन यांची नेमणूक करून शास्त्रज्ञानप्रसाराविषयीं आपली दीर्घ उत्कंठा त्यांनीं होईल तितकी व्यक्त केली. यापलीकडे त्यांचा व युनिव्हर्सिटीचा प्रत्यक्ष संबंध घडला नाहीं असें म्हटलें तरी चालेल. युनिव्हर्सिटीच्या कॉन्व्होकेशनांत त्यांनीं केलेलें भाषण व युनिव्हर्सिटीच्या बिलाविषयीं मुंबई सरकारचा अभिप्राय; यांचा युनिव्हर्सिटीच्या शिक्षणक्रमाशीं कोणत्याही प्रकारचा संबंध नव्हता, हें कोणास सांगितले पाहिजे असें नाहीं.

पण वारंवार होतें काय कीं, मूळ विचार करणारांपेक्षां अनुकरण करणारेच मोठी धांदल करून सोडतात! लॉर्ड रे गव्हर्नर झाले आहेत, व ते मोठे शास्त्रप्रसारेच्छू आहेत, असें दिसून आल्याबरोबर, ज्या त्या परीक्षेंत जमल्यास थोडेंबहुत पदार्थशास्त्र ढकलून देण्याविषयीं कित्येकजण उत्सुक झाले, व युनिव्हर्सिटीच्या आर्ट्स् शाखेचा अभ्यासक्रम बदलण्याविषयीं चर्चा सुरू झाली. हिला आरंभ होतांच ज्यांचे जे आवडते फेरफार होते, ते त्यांनी पुढें आणिले. इतिहास, अर्थशास्त्र, देशी भाषा वगैरेंचें बरेंच ज्ञान असल्याखेरीज कोणाला बी.ए. म्हणणें उचित नाहीं, अशी साधारण कल्पना झाल्यामुळें, बी. ए. चा अभ्यासक्रम वाढवा अशा सूचना येऊं लागल्या. या सूचनांबरोबरच वर्षांची संख्याही वाढविणें जरूर असल्यामुळें, तिहींच्या जागीं चार वर्षें असावी, असा बूट निघाला; व तो बहुतेकांस पसंत झाल्यासारखा होऊन नवीन अभ्यासक्रमाचा एक मसुदा तयार करण्यांत आला. या मसुद्यांत अर्थशास्त्र, इतिहास, पदार्थशास्त्र, व देशीभाषा यांची बरीच सोय केली होती. पण जें चांगलें; तें एकाएकीं प्राप्त झालें तर जगाची सुधारणा होऊन जाऊन करण्यासारखें पुढें कांहीं उरणार नाहीं, व उगीच माशा मारीत बसावें लागेल, अशी भीति कित्येकांस उत्पन्न होऊन, व आमच्या खंगू लागलेल्या शरीरशक्तीकडे त्यांचें लक्ष जाऊन, अभ्यास वाढविण्यास त्यांनीं अशी हरकत घेतली कीं, आहेत त्याच अभ्यासांचें ओझें विद्यार्थ्यांस निभेनासें झालें असून त्यांवर अधिक ओझें लादण्यास तुम्ही प्रवृत्त होतां, याचा अर्थ काय? बी. ए. चा क्रम चार वर्षांचा असून त्याचा अभ्यास प्रस्तुत कालीं आहे तितकाच असला, तर तो त्रास न पडतां पक्का होईल. ही प्रतिसूचना मताधिक्यानें ठाम होऊन पहिले सारे बेत मागें पडले, व आज संध्याकाळीं सेनेटपुढेंजो वाद होणार आहे; त्यांत चतुर्वार्षिक बी.ए. च्या परीक्षेसाठीं तयार केलेल्या नवीन मसुद्याची चर्चा व्हावयाची आहे. या मसुद्यांत बी.ए. च्या प्रस्तुतच्या अभ्यासक्रमांतील कांहीं विषय कमी करून इतिहास, अर्थशास्त्र, व इंग्रजी निबंध लिहिणें या विषयांस जागा केली आहे, व देशी भाषांस गचांडी देऊन अजिबात हुसकून लाविलें आहे. तिहींची चार वर्षें झालीं असून व इंग्रजी, संस्कृत, आणि गणित यांतील कांहीं पुस्तकें कमी करण्याचा विचार असून, हा मसुदा करणाऱ्यांस देशी भाषांस पाय ठेवण्यापुरती सुद्धां जागा करतां आली नाहीं काय? किंवा यांत त्यांच्याकडे तरी काय दोष काय आहे? अनाथाला कोण वाली मिळणार? ज्याप्रमाणें पूर्वीं एका **ग्रांटानें** या देशी भाषांचा पिच्छा पुरवून त्यांस युनिव्हर्सिटीतून पिटाळून लाविले, त्याप्रमाणें दुसरा एक **ग्रांट** अवतरून तो यांचा पक्ष घेईतोंपर्यंत त्यांस असेंच बाहेर भटकत रहावें लागणार, असें आम्हांस वाटतें! सिंडिकेटांतील महादेवास ही

अतिशय महत्त्वाची बाब आहे, असें अद्यापि न वाटू लागलें असल्यामुळें सेनेटांतील वामनदेवाचें कांहीं एक चालत नाहीं! देशांतील शिक्षणक्रम देशी भाषांत चालणें किती उचित आहे, हें ध्यानांत आणून तसें होण्याची खटपट करीत असणें हें एकीकडेच राहिलें; पण बाकीच्या विषयांप्रमाणें देशी भाषांस युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमाचा एक विषयही आम्हांस करतां येत नाहीं, यावरून आमची आस्था, धमक, निश्चित विचार, देशकल्याणाची खरी कल्पना आणि कोणत्याही गोष्टींत यश येईपर्यंत तिचा पाठलाग न सोडण्याचा निर्धार, हीं व्यक्त होतात! युनिव्हर्सिटी आपल्या अभ्यासक्रमांत देशी भाषांस घालीत नाहीं! युनिव्हर्सिटी अमकें करीत नाहीं! युनिव्हर्सिटी तमकें करीत नाहीं! असें रडगाणें आतां आम्ही किती दिवस गात बसणार? युनिव्हर्सिटी, सिंडिकेट, सेनेट, अभ्यासक्रम, शिक्षणालयें हीं सारी निश्चयानें परिश्रम केल्यास आपल्या हातीं येणार आहेत, व आपणांस त्यांना पाहिजे तें वळण लावितां येणार आहे, हें तुम्हांस केव्हां कळूं लागणार? अगोदर देशी भाषांचा अभ्यास होऊं लागण्यांत व पुढें त्या भाषांतच अभ्यास होऊं लागण्यांत या देशाचें खरें हित आहे अशी तुमची पक्की खात्री झाली असेल; तर युनिव्हर्सिटीचें नाक धरून तिच्याकडून या अप्रिय औषधीचा स्वीकार करविणें अशक्य आहे काय? ती मोठी सामर्थ्यवती आहे हें आम्ही कबूल करतों. पण अशीला जेरीस आणण्याचा खरा उपाय, तिच्यापुढें पदर पसरून 'यांत आम्हास भिक्षा घाल' अशी तिची दीनस्वरानें प्रार्थना करीत बसणें हा नव्हे. असें करूं लागलांत कीं, तिला अधिकच ताठा भरला म्हणून समजा. अभिमानाचा काटा अभिमानानेंच काढला पाहिजे. युनिव्हर्सिटीचीं सूत्रें सध्यां ज्यांचे हातीं आहेत, त्यांना देशी भाषांचा किंवा देशी भाषांत वरिष्ठ प्रतीचा अभ्यास होऊं लागल्यानें पाश्चिमात्य ज्ञानभांडारावर हल्ला करणें, व त्या हल्ल्यांत सापडलेल्या लुटीपासून आपलें हित करून घेणें- या गोष्टीस किती साहाय्य होणार आहे, हें अद्यापि नीट दिसूं लागलें नाही, कितीही समजाऊन सांगितलें तरी समजत नाहीं, कानाशीं कितीही ओरडलें तरी ऐकूं येत नाहीं? असल्या लोकांस समजविण्यास, पाहविण्यास, व ऐकविण्यास, लेचेपेचे प्रयत्न उपयोगी नाहीत. देशाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत चळवळ करून तिच्या दंग्यानें यांचीं डोकीं भणाणून सोडिलीं पाहिजेत; 'देशी भाषा युनिव्हर्सिटीच्या अभ्यासक्रमांत घातल्याच पाहिजेत व ज्यांना जे विषय त्यांच्याद्वारें शिकविण्याची इच्छा असेल त्यांना ते शिकविण्याची परवानगी दिली पाहिजे', अशा अर्थाचे अर्ज प्रत्येक खेड्यातून, तालुक्यातून, व जिल्ह्यातून मुंबईस रवाना होऊन, त्यांचे प्रर्वतप्राय भारे युनिव्हर्सिटीच्या हॉलांत येऊन पडले पाहिजेत, व लोकमत न पहाणाऱ्या

प्रस्तुत अधिकाऱ्यांना जातां येतां त्यांचे धक्के बसले पाहिजेत, म्हणजे ते डोळे उघडून पाहूं लागतील! अशा रीतीनें त्यांचे डोळे व कान यासंबंधानें आपापले व्यापार नीट करूं लागले म्हणजे त्यांचे मेंदूही स्वाभाविकपणें आपलें काम नीट करूं लागतील! पण त्या भरंवशावर केवळ स्वस्थ राहणें नीट नाहीं. त्यांच्यापुढें या विषयांची चर्चा करून त्यांची खात्री सोडण्यासाठी दूरदर्शी, विद्वान, बहुश्रुत, तारतम्यज्ञ व वाग्विदग्ध अशा प्रतिनिधींस हा कज्जा युनिव्हर्सिटीच्या कोर्टांत चातुर्यानें व नेटानें चालविण्याबद्दल वकीलपत्रें दिलीं पाहिजेत.

✷

# न करत्याचा वार शनवार

राजकीय हक्क संपादन करण्यास आम्हांस जितक्या नडी आहेत; तितक्या समाजसुधारणेस नाहींत. परंतु चमत्कार असा कीं, तेथेंही पहावें तों आपलें गुडघाभरच पाणी. आतां असें कां व्हावें यास पुष्कळ कारणें आहेत, व त्यांपैकीं कित्येक सयुक्तिकही आहेत. परंतु खऱ्या अडचणीमुळें आमचें पाऊल जितकें थबकून राहतें त्यापेक्षां खोट्या अडचणीमुळें आम्हांस अधिक माघार खावी लागते. ज्या वर्गावर सर्व प्रकारच्या सुधारणेचा बोजा साहजिकपणें येऊन पडला आहे, त्यांच्यांत जर कर्तव्यपराङ्मुखता नसती, तर खऱ्या अडचणी दूर करणें अशक्य नाहीं. परंतु एकतर आमच्या सुशिक्षित वर्गापैकीं कित्येकांस आपली जबाबदारी मुळींच कळत नाहीं, व दुसरें, ज्यास ती कळते; त्यांच्यापैकीं कित्येक लोक विशेष स्वार्थपरायण असल्यामुळें, परोपकारार्थ आपल्या स्वतांस अप्रिय करून घेण्याचें त्यांस कधींही सुचत नाहीं. सुधारक मानलेल्या लोकांनीं ज्या ज्या सुधारणा सुचविल्या आहेत, त्या सर्व अप्रयोजक आहेत, असें म्हणावें तर तें आपल्या विद्वत्तेस शोभत नाहीं. तशानें सुशिक्षित लोकांत आपला सर्वथैव उपहास होणार. बरें, त्यांचेंच मनोभावानें साह्य करावें तर सामान्य लोकसमुदायाकडून कांहीं काळपर्यंत तरी निंदा होणार. तेव्हां अशा स्थितींत काय करावें? दोहोंकडचा लोभ तर सुटत नाहीं. अर्थात त्यास उपाय एकच. ढोंगी बनावें म्हणजे झालें.

अशी आमच्या कित्येक सुशिक्षितांची अवस्था असल्यामुळें, आणलेल्या सोंगाची बतावणी करण्यास, त्यांस बऱ्यावाईट सर्व मार्गांचें अवलंबन करण्याची अर्थात् पाळी येते. आपली लबाडी उघडकीस येऊं नये म्हणून गारोडी जसा हरतऱ्हा करीत असतो, तसा यांचा प्रकार एकसारखा चालू असतो. 'करून कां दाखवीत नाहीं?' म्हणून जो एक अशा लोकांकडून प्रश्न येतो, त्यांचें इंगितही यांतच आहे असें आम्ही मागेंच एकदां दाखविलें आहे. आता यावर जर कोणी त्यांस उलट प्रश्न केला कीं, 'बरें, दुसरे मूर्ख ठरले तर ठरेनात. तुम्ही स्वतःच कांहीं दिग्विजय करून कां दाखवीत नाहीं?' तर त्यावरही त्याच्या पोतडींत शक्कल तयार आहेच. ''काय करावें हो! या पहिल्या मंडळींनीं अगदीं घाण करून टाकली. भलभलत्या गोष्टी विचार न करतां यांनी केल्या. लोकांचा विश्वास

उडाला. आतां फिरून लोकांचा आमच्यावर विश्वास बसण्यास फार काळ गेला पाहिजे. ही उतावळी सुधारक मंडळी आमचे पुढारी नव्हेत, हे आमचे कट्टे शत्रू आहेत, आमचा यांच्यावर अगदीं विश्वास नाहीं, अशी जेव्हां आम्ही लोकांची खातरी करूं, व या सर्वांस हुसकून लावूं, तेव्हां लोकांचा आमच्यावर विश्वास बसूं लागेल. मग पहा! 'चल चल' म्हणतां सुधारणाच सुधारणा! उगाच घाई करून सगळी घाणच करून टाकावयाची कीं नाहीं? दमादमानें घेतलें पाहिजे. 'पी हळद कीं हो गोरी' असें कोठें झालें आहे!''

वरील शक्कल खरोखर योग्य आहे किंवा 'आपल्याला कांहीं करावयाला नको' याचेंच हें सुधारलेलें भाषांतर आहे, हें ज्यांस पहाणें असेल, त्यांनीं 'ज्ञानदीप' मासिक पुस्तकाचे १८८७ सालचे शेवटचे दोन अंक नुकतेच प्रसिद्ध झाले आहेत, ते पहावे. त्यामध्यें पुनर्विवाहाच्या प्रसारार्थ झालेल्या उद्योगाचा संक्षिप्त इतिहास दिला आहे. यामध्यें दिलेला इतिहास जर खरा असेल, व तो तसा आहे असें आम्हांस वाटतें, तर मग या पुनर्विवाहाच्या बाबतींत आमच्या पूर्वीच्या पिढींतील लोकांनीं भलभलते प्रकार केलें, असा त्यांच्यावर आणलेला आक्षेप वाजवी नाहीं असें आम्हांस म्हणावें लागते. हा पुनर्विवाहाचा विषय पुढे आल्यास आज ५०-६० वर्षें झालीं. परंतु तेव्हांपासून आतांपर्यंत घडलेल्या सर्व गोष्टींचा उल्लेख करण्याची आम्हांस अवश्यकता नाहीं. आमचा उद्देश इतकाच आहे कीं, मागल्या पिढींतील पुढारी लोकांस उतावळे सुधारक हें नांव किती अंशानें लागूं होण्यासारखें आहे, हें या इतिहासांतील कांहीं ठळक गोष्टींच्या साह्यानें वाचकांस दाखवावें. याप्रांती पुनर्विवाहाविषयीं विशेष प्रयत्न करणारे विष्णु परशुरामशास्त्री पंडित यांचें नाव सर्व आबालवृद्धांस माहीत आहे.पुनर्विवाहाचा प्रचार पाडणें युक्तिदृष्ट्या कितीहि अवश्यक असलें, व तो करण्याची स्त्रियांस परवानगी नसणें म्हणजे केवळ अन्याय होय ही गोष्ट जरी कितीही उघड असली, तथापि या गोष्टीचा संबंध धर्माशीं पोंचत असल्यामुळें पुनर्विवाह शास्त्रसंमत आहे, अशी लोकांची खात्री करून देणें अवश्य आहे, ही गोष्ट शास्त्रीबोवा विसरले नव्हते. प्रथमत: पुस्तकरूपानें व वर्तमानपत्रद्वारा लोकांची समजूत घालण्याचे प्रयत्न त्यांनी केले, व नंतर याविषयीं कोणास शंका असेल तर त्यांनीं वादास उभे रहावें, अशा अर्थाचे जाहीरनामे शहरोशहरीं स्वत:च्या सहीनिशी लावले. परंतु उपयोग झाला नाहीं. विधवेचें गोत्र कोणतें धरावें, तिचें दान कोणी करावें, अशौचाचा निर्णय कसा, दायभागाचा निर्णय कसा, वगैरे बारीक शंकांचीं उत्तरें देण्याची जी शास्त्रीबोवांनीं मेहनत घेतली, ती उतावळेपणाचीच साक्ष असली तर नकळे! इतकेंच करूनही विरुद्धपक्षाची मंडळी वाद करण्यास उभी राहीनात. तेव्हां अर्थात् ज्या प्रचाराच्या

सशास्त्रतेबद्दल त्यांची खात्री झाली होती, तो प्रचार सुरू करण्याचा 'पुनर्विवाहोत्तेजक मंडळी'नें निश्चय केला, हेंही साहजिकच झालें. १८६९ सालीं जो प्रसिद्ध विवाह, सदर मंडळीनें घडवून आणला; त्यांतील वधूचें वय १६ वर्षांचे असून, तिच्या दोन बंधूंच्या विचारानें ती विवाहास तयार होती. विवाह होण्याच्या अगोदर दोन दिवस 'हिंदुधर्म व्यवस्थापक सभे'कडून पुनर्विवाहाच्या सशास्त्रतेबद्दल वाद करून, सशास्त्र ठरल्यास हा विवाह व्हावा, व तोंपर्यंत तो तहकूब ठेवावा, अशा अर्थाचें पत्र आलें होतें हें खरें. पण इतक्या दिवस विधिपक्षाची मंडळी वादास तयार असून कोणी वादास आलें नाही, व आयत्या वेळीं ही मंडळी वादास बोलावतात, त्या अर्थी कोणीकडून तरी या विवाहास विघ्न आणावें असा त्यांचा उघड हेतु दिसतो, असें समजून मंडळीनें विवाह करण्याचा निश्चय कायम ठेवला यांत नवल नाहीं. लोक आपणांस वाळींत टाकणार याविषयीं जरी विधिपक्षास संशय नव्हता, तथापि शास्त्रीबोवांनीं एकंदर विवाह हिंदुधर्मशास्त्राप्रमाणें चालविला, व यावरूनही त्या मंडळींचा उतावळेपणा सिद्ध होत नाहीं. उलटपक्षाच्या मंडळींनीं शास्त्रीबोवास 'तुमच्या छापखान्यास आग लावूं' अशी धमकी दिली असतां, मॅजिस्ट्रेटाकडून त्यांनीं त्यांचे मुचलके घेतले यांतही त्यांचा दोष दिसत नाहीं. परंतु मुचलके घेण्यापलीकडे शास्त्रीबोवा गेले नाहींत. उलटपक्षाच्या मंडळींनीं तर रा. ब. विष्णु परशराम रानडे, रा. बाळ मंगेश वागळे, नारायण महादेव परमानंद वगैरे मंडळींवर सभेमध्ये मारामारी केल्याबद्दल कोर्टांत फिर्याद लावली. परंतु कांहीं निष्पन्न झालें नाहीं. विवाहपत्रिकेवर सह्या करणारे ७ गृहस्थ, वधूवर, व वधूचे दोनही बंधू यांस हिंदुधर्म व्यवस्थापक मंडळीनें बहिष्कार घातला. पुनर्विवाह अशास्त्र आहे असें ठरेंपर्यंत हा बहिष्कार आम्हांस मान्य नाहीं म्हणून पुण्यांतील सुशिक्षित मंडळींनीं आपल्या सह्यानिशीं वर्तमानपत्रांतून जाहीर केलें. या सह्यांची संख्या १७२ पर्यंत येऊन ठेपली, तेव्हां विरुद्ध पक्षास भीति वाटूं लागली, व त्यांनीं १८७० च्या मार्च महिन्यांत श्रींची स्वारी पुण्यांत आणली. प्रत्येक पक्षास पांच पांच पंच होते. त्यांच्या बहुमतावर निकाल ठरावयाचा होता. निषेधपक्षाकडील पांचही पंच पुनर्विवाहाच्या विरुद्धच होते. पैकीं एका पंचानें तर भरसभेंत असें बोलून दाखविलें कीं, आम्हांस सत्यासत्य पाहण्याची गरज नाहीं. आम्हांस कोणीकडून तरी प्रतिपक्षाचा पाडाव करावयाचा! परंतु इतकें झालें तरी पुनर्विवाह अशास्त्र ठरण्यास बहुमत झालें नव्हतें. तेव्हां येनकेनप्रकारेण तें करण्याचा निषेधपक्षानें प्रयत्न केला. वे. व्यंकटशास्त्री हे मोठे सत्त्वस्थ गृहस्थ होते. त्यांनीं स्वतः शास्त्रीबोवास पुनर्विवाहाबद्दल शास्त्राधार काढून दिला होता. त्यावरून अर्थात त्यांचे मत विधिपक्षास अनुकूल होतें. परंतु कित्येक

शास्त्री मंडळींनीं व खुद्द शंकराचार्यांनीं त्यांस उलट मत देण्याविषयीं आग्रह केला. धर्मराज देखील खोटें बोलले, मग अशावेळीं तुम्हांस खोटें बोलण्यास काय हरकत आहे, असा त्या भोळ्या म्हाताऱ्यास उपदेश करून त्यांच्याकडून स्वामींच्या पायांची शपथ वाहून घेतली. तेव्हां अशा निर्लज्जपणानें पुनर्विवाह अशास्त्र ठरविण्याचा झालेला प्रयत्न पाहून विधिपक्षाच्या मंडळीस पराकाष्ठेचा राग यावा, व सरकारदरबार व्हावेत व कित्येक मंडळींच्या मनांतून शंकराचार्यांवर फिर्याद करण्याचा विचार यावा, य़ांत विलक्षण असें आम्हांस कांहींच दिसत नाहीं.

वरील सर्व गोष्टींवरून पुनर्विवाहाचा एक प्रचार पाडतांना त्यांतल्या त्यांत जातिभेद मोडावा, हिंदुधर्मशास्त्रांतील वेडगळ विवाहपद्धतीस झुगारून द्यावें, गणगोत पाहूं नये वगैरे उतावळेपणामुळें लोकांस चीड आली, ही गोष्ट सर्वथैव खोटी होय. १६ वर्षाच्या कोंकणस्थ विधवेचा २५ वर्षांच्या कोंकणस्थ वराशीं तिच्या स्वत:च्या भावांनी विवाह लावण्यास तयार असावें, सर्व विधि धर्मशास्त्राप्रमाणें व्हावा, यांत सर्व सुधारणा एकदम करूं पाहण्यासारखें कांहींच झालें नाहीं. आतां इतका प्रयत्न करूनही व इतकी खबरदारी घेऊनही प्रतिपक्षाचा दुराग्रह सुटत नाहीं. आपलें म्हणणें (मग तें वाकड्या मार्गानें का होईना) सिद्ध करण्याचा निश्चय करून त्यांनीं तो शेवटास नेला, ही गोष्ट जेव्हां ठरल्यासारखी झाली, तेव्हां त्यापुढें जे पुनर्विवाह झाले त्यांत लौकिकाचा फारसा विचार न करितां, ज्यांस जो प्रकार योग्य व निर्दोष वाटला तो त्यांनीं केला. एवीतेंवी लोकांची मदत मिळत नाहीं, आपणास वेगळी जात तर करावी लागते, व बहिष्काराची पूर्ण छलना सोसावी लागते ती लागतेच. मग इतक्या अडचणी सोसण्याचें ज्यांनीं धैर्य केलें, त्यांनीं लोकांची खुशामत करण्यास कबूल कां व्हावें? त्यांस जर जातिभेद, विवाहविधि, गणमैत्री वगैरे प्रकार ईश्वरकृत नसून मनुष्याच्या अज्ञानापासून झालेले आहेत हें उघड दिसत असलें, तर मग लोकांची पर्वा कां ठेवावी? हें आम्हांस कळत नाहीं. समाजानें जर त्यांस थोडीशी मदत केली असती, तर समाजाच्या समजुतीस मान देण्यास तेही तयार झाले असते. जेव्हां समाजानें त्यांस टाकून दिलें, तेव्हां त्यांनींही तो धिक्कारिला, हें यथास्थितच झालें. तात्पर्य, सुधारकांनीं या गोष्टींविषयीं चर्चा सुरू करण्यापासून शेवटपर्यंत जितकें करून समाजांत फूट पडणार नाहीं, तितके प्रयत्न केले; परंतु त्यांचा उपयोग झाला नाहीं; याचा दोष त्यांच्याकडे नाहीं, बाकीच्या समाजाकडेच आहे. अमुक एकानें पुनर्विवाह कां केला नाहीं? हा प्रश्नही वरच्या माळकेपैकींच होय. नुसती हजामत करावयाची झाली तरीही 'छे, आज एकादशी आहे, बाबा रागावतील' अशी ज्यांची स्थिति, त्यांनीं दुसऱ्या एखाद्यानें पुनर्विवाह न करण्यास अशींच

कांहीं कारणें असतील हा विचार कां करूं नये? बरें, एकाच्या हातून चूक झाली, त्याच्या अंगीं बोलण्याप्रमाणें चालण्याचें धैर्य नाहीं; परंतु त्याशिवाय ज्यांनीं बोलण्याप्रमाणें आचरण करण्याकरतांच उतार वय झालें असूनही पुनर्विवाह केला, अशी शास्त्रीबोवांसारखीं उदाहरणें लोक पुढें कां आणीत नाहींत? उलट तेवढेंच उदाहरण पुढें कां आणतात?

आतां; कोणतीही गोष्ट मनुष्य करूं लागला असतां चुका ह्या होणारच. मागच्या लोकांनीं त्या चुका पाहून पाहिजे तर शहाणपण शिकावें व कमी चुका करण्यास झटावें. परंतु आपण कांहीं न करतां दुसऱ्यांवर नुसती टीका करण्याचें काम नामर्दपणाचें आहे. सगळेच पुराणिक चातुर्मासांत वांगीं सोडतात असें नाहीं. कित्येकांस अनेक कारणांमुळें पुराणांतलीं वांगीं पुराणांत ठेवावीं लागतात. वैराग्याचा उपदेश करणारे सर्वच हरदास दिगंबर नसतात. म्हणून तेवढ्यावरून सर्व पुराणिक व सर्व हरदास जनसमुदायाचे शत्रू आहेत, असें कोणी मानीत नाहीं; मग मागल्या पिढींतील लोकांनीं एकादी चूक केली असली, तथापि त्यांनीं केलेले सर्व प्रयत्न व्यर्थ झाले, असें म्हणतां येणार नाहीं. त्यापासून आपल्या पुढील कार्यभागास मदतच झाली पाहिजे. त्यांनीं आमची हानि केली म्हणून आम्हांस हातपाय बांधून बसावें लागतें, हें म्हणणें 'न करत्याचा वार शनवार' यापैकींच आहे.

असो. वर निर्दिष्ट केलेल्या निबंधांत जितका इतिहास दिला आहे, तेवढ्यावरून आजपर्यंत या बाबतींत कसकसे व काय काय प्रयत्न झाले, याची बरीच चांगली अटकळ होते. तथापि याहून सविस्तर माहितीचें पुस्तक झाल्यास नव्या पिढीस अधिक फायदा होण्याचा संभव आहे, व तसें करण्यास निबंधकारास बरींच साधनें आहेत, असें आम्हांस वाटतें. म्हणून पुढें मागें जमल्यास त्यानीं हा प्रयत्न अवश्य करावा, इतकें सुचवून आम्ही तूर्त हा लेख संपवितों.

*

# हलवायाचे दुकानावर ब्रह्मार्पण

येथील सरकारी नोकरींत जे इंग्लिश लोक आहेत त्यांचे सनदी व बिनसनदी असे दोन वर्ग आहेत, हें आमच्या वाचकांस ठाऊक असेलच. यांपैकीं पहिल्या वर्गांतील नोकर आमचे व सरकारचे शुद्ध जांवई आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांच्या जागा, यांचे पगार, यांच्या बढत्या, यांच्या बदल्या, व यांचीं पेन्शनें यांविषयीं जे नियम ठरलेले आहेत, त्यांचें उल्लंघन करण्यास कोणीही समर्थ नाहीं! अलीकडे दुसऱ्या वर्गांतील लोकही या जावयाचे हक्क कमावूं पहात आहेत! या कामांत यश येण्यासाठीं त्यांनीं जे भगीरथ प्रयत्न चालविले आहेत, ते पाहून या इंग्लिश लोकांच्या दीर्घोद्योगाची तारीफ न करणें अशक्य आहे. दोन-तीन वर्षांच्या खटपटीनें येथून इंग्लंडापर्यंत त्यांनीं असा घाट उडवून दिला आहे कीं, पहावें तें वर्तमानपत्र, घ्यावा तो मुत्सद्दी, व म्हणावा तो पार्लमेंटचा सभासद यांच्या मुठींत आल्यासारखा दिसतो! हिंदुस्थानांतील रुपयाची किंमत उतरली असल्यामुळें आपल्या पगारापासून आपला जितका व्हावा तितका फायदा होत नाहीं; इंग्लंडास पैसे धाडण्यांत जी हुंडणावळ द्यावी लागते तीमुळें आपलें फार नुकसान होतें, व पेन्शनास तर फारच मोठा छाट बसतो, अशी यांची तक्रार आहे. जे लोक यांच्या वतीनें बोलतात; ते असें म्हणतात कीं, सरकारच्या अशा इमानी नोकरांस असंतुष्ट ठेवण्यांत सरकारचा बिलकुल फायदा नाहीं. सरकारानें आपल्या नोकरांच्या पाठीवर हवे तितकें कोरडे ओढून पाहिजे तितकें काम खच्चून करून घ्यावें, पण त्यांच्या पोटावर मारूं नये. या सर्व बिनसनदी नोकरांचा संतोष राखण्यास फार झालें तर तीन चार लाख रुपये लागणार आहेत. येवढी रक्कम सरकारास पाहिजे तेथून काढतां येईल. हिची काटकसर करणें म्हणजे काडीसाठीं पाडी गमावण्यासारखें होय! हें सर्व एका दृष्टीनें बरोबर आहे. पण हे तीन लाख रुपये उत्पन्न होणार कोठून? याचा विचार कोणीच करीत नाहीं. गेल्या वर्षी सेक्रेटरी ऑफ् स्टेटनें या लोकांस असें उत्तर दिलें कीं, तुमची तक्रार बिलकुल ऐकली जाणार नाही. कारण अमुक किंमतीच्या रुपयांनीं तुमचे पगार व पेन्शनें दिलीं जातील, असें सरकारानें बंधन करून घेतलेलें नाहीं. हिंदुस्थानांत जो व जसला रुपया चालू असेल, तो व तसला रुपया तुम्हाला पत्करला पाहिजे. तुमची

तक्रार ऐकणें म्हणजे हिंदुस्थानच्या गरीब प्रजेवर नवीन बोजा लादणें होय. हें सेक्रेटरी ऑफ स्टेटचे गतवर्षीचें उत्तर. यावर्षी तोच अधिकारी असें म्हणतो कीं, तुमची तक्रार वाजवी आहे व तिची चौकशी करण्याकरितां लौकरच पार्लमेंटरी कमिटी नेमण्याचा आमचा विचार आहे! काय करील बापडा? बाकीचे प्रधान, पार्लमेंटचे सभासद, वजनदार वर्तमानपत्रें, देशांतील ठळक लोक, व हिंदुस्थानांतील मोठमोठे अंमलदार, इतक्यांनीं तुमची तक्रार विचारणीय आहे, असें आश्वासन दिल्यावर ती तशी नाहीं, असें म्हणण्याची हिंदुस्थान सेक्रेटरीची प्राज्ञा आहे काय? ज्याप्रमाणें बैलाची वेंसण धरून किंवा गाढवाचा कान धरून आपण त्यास पाहिजे तसें वागवितों, त्याप्रमाणें इंग्लंडासारख्या देशांत लोकमत सरकारी अधिकाऱ्यांस वागवितें. थोड्या दिवसांत या बिनसनदी नोकरांच्या खटपटीला निदान थोडें तरी यश येईल, याबद्दल आम्हांस बिलकुल शंका नाहीं. आतां आमची स्थिति पहा. जीं कामें बिनसनदी नोकर करतात, तीं आमच्यानें होण्यासारखीं असून आम्ही सरकारास असें विचारीत नाहीं कीं, असले तक्रारी नोकर तुम्हीं लावता तरी कशासाठीं? देऊं केलेल्या पगारांत यांचें समाधान होत नसेल तर त्यांचे काका दुसरे कां लावीत नाहीं? रुपयाची किंमत कमी न होऊं देणें ही सरकारच्या ताब्यांतली गोष्ट नाहीं. तेव्हां तीपासून जें नुकसान होईल ते सर्वांनीं निमूटपणें सोसलें पाहिजे. रुपयाची किंमत उतरल्यानें आम्हां नेटिवाचें नुकसान होत नाहीं काय? युरोपिअन लोकांसच पैशाची किंमत कळते, व ऐषआरामाची लज्जत समजते, असें तर नाहींना? मग या बिनसनदी नोकरांचीच तक्रार ऐकणें हा पक्षपात नव्हे काय? व या पक्षपाताबद्दल गरीब रयतेचें तट्टू हवें तसें ताबडीत सुटणें हा अन्याय व पाप नव्हे काय? पण हें सारें पहातो कोण? नेटिव्ह लोकांस उच्च प्रतीचीं कामें करतां येत नाहींत, व त्यांच्या खर्चास फार पैसे लागत नाहींत, हीं दोन प्रमेयें प्रत्येक युरोपिअनाच्या मनांत वज्रलेप होऊन गेलीं आहेत, व आम्ही नेटिव्ह त्यांचे निराकरण करण्याचा मुळींच प्रयत्न करीत नाहीं. तेव्हां आमचें कोणी ऐकत नाहीं, व मुक्या रयतेवरील कराचा बोजा प्रतिवर्षी वाढत आहे, हे कांहीं आश्चर्य करण्यासारखें नाहीं. वास्तविक पाहतां, या बिनसनदी नोकरांच्या चळवळीबरोबर आम्हां लोकांतही चळवळ सुरू व्हावयाला पाहिजे होती. पण आम्हीं पडलों कर्णाचे कर्ण! जे आम्हीं साऱ्या राज्यावर उदक सोडून बसलों आहों ते आम्ही पांचचार लाख रुपयांसाठीं अनुदारता प्रगट करण्यास तयार होऊं काय? ही उदारता व ही शांती आम्हांस किती भोंवणार आहे हें कोणाच्यानेंही सांगवणार नाहीं!

*

# राजकीय संनिधानाचें अपायकारकत्व

मनुष्य हा एकांतवासप्रिय प्राणी नाहीं; समाज करून राहिल्याशिवाय त्याला सुख होण्याचा संभव नाहीं. समाज संस्थापनास श्रमसंयोगाची अवश्यकता आहे, व श्रमसंयोग होऊं लागल्यास समाज पाहिजे, म्हणजे त्या उभयतांचें अन्योन्यावलंबन आहे; श्रमसंयोग चांगला चालण्यास सामाजिक संनिधान (Social organization) पाहिजे; हे संनिधान दोन प्रकारचें आहे- एक स्वायत्त, व दुसरे परायत्त; स्वायत्त संनिधानापासून व्यक्तीचें हित होतें; समाजाचें हित प्रथम साधणें हा परायत्त संनिधानाचा मुख्य उद्देश होय; समाजाच्या आद्य स्थितींत परायत्त संनिधानाशिवाय समाजाचें संरक्षण व प्रगति व्हावयाची नाहीं; परायत्त संनिधानापासून राजकीय संस्थांची उत्पत्ति होते, व समाजाच्या प्रथमावस्थेंत या संस्थांचा अंमल सक्तीनें चालविणें अवश्य असतें; तसें न झाल्यास समाजाची वाताहात होऊन, कोणाचेंच कल्याण होत नाहीं; वगैरे गोष्टींचेविवरण मागल्या लेखांत केलें आहे. राजकीय संस्थांच्या सक्त अंमलामुळें लोकांचे कोणत्या प्रकारचें नुकसान होतें हें आज दाखविण्याचा विचार आहे.

हवा, पाणी, व अन्न ही शरीररक्षणास अवश्य लागणारीं द्रव्यें आहेत; पण यांचें फाजील सेवन झालें असता तीं अपायकारक होतात, याचा प्रत्येकास अनुभव आहे. एका व्यक्तीनें दुसऱ्या व्यक्तीशीं व एका पोटसमुदायानें दुसऱ्या पोटसमुदायाशीं सलोख्यानें वागून समाजांत श्रमसंयोग उत्पन्न होऊं द्यावा, व तो होण्यासाठीं कोणाचा तरी सर्वांवर सक्त अंमल चालावा, ही गोष्ट निर्विवाद आहे; व अशा प्रकारच्या सक्त अंमलापासून होणारा फायदा आम्हांस पूर्णपणें मान्य आहे. पण यावरून असें समजतां कामा नये कीं, ही सक्ती जेवढी अधिक करावी तितकी समाजसुधारणेस अधिक मदत होते. या सक्तीसही सीमा आहे. या सीमेचें उल्लंघन केलें असतां ती समाजहितवर्धक न होतां, समाजहितविघातक होते. सारांश, समाजाचें आकलन करण्यास कोणत्याही प्रकारचें सरकार नसल्यामुळे जे परिणाम होतात, तेच सरकारच्या फाजील सक्तीपासून होऊं लागतात. सरकारी अधिकाऱ्यांचा चरितार्थ आणि ते जीं कामें करतात त्यांचा खर्च प्रजेनें दिलेल्या करांपासून होत असतो. हे कर जर प्रजेच्या सामर्थ्याबाहेर गेले, किंवा ते; तीपासून

काढण्यापासून सरकारी अंमलदार तीस दु:सह पीडा देऊं लागले, तर जिकडे तिकडे मारामाऱ्या, दंगेधोपे, व तंटे सुरूं होऊन सर्वत्र अनवस्था होणार नाहीं काय? प्रजा कितीही राजनिष्ठ असली तरी अचेतन वस्तूप्रमाणें पाहिजे तसली वागणूक ती हवा तेवढा वेळ सहन करील, असें समजणें हें शुद्ध मूर्खपण होय. कांहीं केलें तरी जाचांतून सुटण्याची आशा नाहीं, अशी खात्री झाली असतां, अगदीं क्षुद्र व क्षीण व्यक्ती देखील बिथरून जाऊन आपला छल करणारास शासन करण्यासाठीं, बेफाम होऊन त्याच्या नरडीचा घोंट घेण्यास धाऊन जाते, असें अनेक प्रसंगीं दिसून येतें. हा एका व्यक्तीनें दुसऱ्या व्यक्तीवर केलेल्या फाजील जुलमाचा परिणाम होय. जेव्हां कोणत्याही देशांतील सरकार आपल्या प्रजेशीं अशा प्रकारचें वर्तन करतें, तेव्हां तीही कितीही सहनशील असली तरी अंमलदारांचा जुलूम दु:सह झाला असतां, राजनिष्ठा झुगारून देऊन, त्यांस दंड करण्यासाठीं बंड करण्यास प्रवृत्त होते. सरकारी अंमलदारांचा जुलूम असह्य झाल्यामुळें लोकांनीं हत्यारांस हात घालून छल करणाऱ्या राजास आणि त्याच्या साथ्यांस कंठस्नान घातल्याचीं उदाहरणें पुष्कळ आहेत. सरकारी अंमलदारांच्या जुलमापासून होणारे दुष्परिणाम या आशिया खंडांतील प्रत्येक देशांत पूर्वीपासून दृष्टीस पडताहेत. युरोपखंडाच्या सुधारणेपेक्षां आशियाखंडांतील सुधारणेस आरंभ अगोदर झाला असून ती आजमितीस इतकी मागें पडली आहे, याचें बऱ्याच अंशीं येथील राजांचा जुलूम; हें कारण आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं.पूर्वेकडील राजांचा अनियंत्रितपणा सर्व पृथ्वीवर गाजत आहे. या अनियंत्रितपणामुळें होणारी विपत्ति अनवस्थेपासून उत्पन्न होणाऱ्या विपत्तीपेक्षां कधीं कधीं अधिक असते, यांत संशय नाही. रोमन लोकांनीं मिसरदेश काबीज केल्यावर, तेथें जो सक्तीचा अंमल बसविला, त्याची गोष्टही अशीच आहे. ज्याप्रमाणें सध्यां आम्हांस हिंदुस्थान सरकारच्या व प्रांतिक सरकारांच्या खर्चाबद्दल नानाप्रकारचे कर द्यावे लागतात, त्याप्रमाणें इजिप्तच्या लोकांसही द्यावे लागत असत. तसेंच, आतां ज्याप्रमाणें इंग्लिश लोकांनीं आपल्या फायद्यासाठीं ब्रह्मदेशांत, अफगाणिस्थानांत, व चीनांत, युरोपांत, किंवा आफ्रिकेंत युद्ध मांडिलें असतां आम्हांस मनुष्यांचा व पैशाचा पुरवठा करावा लागतो, व आम्हीं त्याबद्दल कितीही ओरडा केला तरी त्याकडे हिंदुस्थान सरकार किंवा ब्रिटिश पार्लमेंट लक्ष देत नाहीं, त्याप्रमाणें रोमन लोक जीं जीं युद्धें करीत, त्यांबद्दल इजिप्शीयन लोकांस भुर्दंड करावा लागे. वरचे अधिकारी खालच्या अधिकाऱ्यांपासून इतका पैसा उकळीत कीं, त्यांस आपल्या जागांचा राजीनामा देणे किंवा सदसद्विवेक एकीकडे गुंडाळून ठेऊन तरवारीच्या धारेवर प्रजेपासून होईल तेवढी माया

काढण्यास तयार होणें भाग पडत असे. मांडलिकांनीं एक वर्षी स्वसंतोषानें दिलेला नझराणा पुढल्या वर्षी करभार होऊन बसे, व तो कोणी न दिल्यास त्यावर रोमन पलटणी चाल करून जात! ठरींव कर तर निमुटपणें द्यावे लागतच; पण त्याशिवाय सैन्याच्या अन्नपाण्याचा, वस्त्रपात्राचा, व सामानसुमानाचा पुरवठा प्रजेस करावा लागे! अशा स्थितींत प्रजेचे किती हाल होत असतील, याची वाचकांनींच कल्पना करावी. तथापि रोमन पादशाहीस उतरता पाया लागला असतां रोमन अधिकाऱ्यांनीं फ्रान्स देशांतील लोकांचा जो छल केला, त्याचा इतिहास याहूनही हृदयद्रावक आहे. त्या काळीं त्या देशांत रोमन अधिकाऱ्यांचा सुळसुळाट इतका झाला होता, व करांचें ओझें इतकें वाढलें होतें कीं, मजूर लोकांच्या अंगांत काडीचा देखील तक्वा राहिला नाहीं, सुपीक प्रांत ओसाड पडले, व ज्या ठिकाणीं नेहमीं नांगर चालत असत; त्या ठिकाणीं भयंकर रानें वाढली! प्रत्येक प्रांतावर व शहरावर अंमलदारांचा येवढा वर्षाव होत असे कीं, त्यांच्या संख्येचें अनुमान करणें अशक्य होऊन गेलें होतें. चाबकाच्या 'चप चप' शब्दानें आणि ज्यांच्या पाठीवर ते झडत आहेत त्यांच्या आक्रोशानें वातावरण सर्वकाळ भरून गेलेलें असे. विश्वासू गुलामानें आपल्या धन्याविरुद्ध, बायकोनें आपल्या नवऱ्याविरुद्ध, व मुलानें आपल्या बापाविरुद्ध पुरावा द्यावा, म्हणून त्यास चांप लावण्यांत येत असत. एक तालुकदार पाठवावा व त्यानें कांहींएक जमाबंदी करावी; ती पुरेशी न वाटून त्यास बडतर्फ करावें, आणि त्याहून अधिक खरमरीत दुसरा तालुकदार त्याच्या पाठीमागून पाठवावा; व असें किती वेळां करावें आणि त्यांनीं किती जुलूम करावा, याला कांहींच सुमार नसे. अशा जाचामुळें गुरें आणि माणसें पटापट मरत; पण जे मागें राहत त्यांस आपल्या वांट्याचे व मेलेल्यांच्या वांट्याचे कर दिल्याशिवाय गत्यंतर नसे! अशा संकटावस्थेंत रोमन प्रजेस कर गोळा करणारापेक्षां शत्रूच बरा वाटे, व संधि सापडल्याबरोबर ते अंमलदारांस सोडून शत्रूस जाऊन मिळत, हें किती स्वाभाविक होतें बरें? रोमन पादशाहीचा ऱ्हास झाल्यावर फ्रान्स, स्पेन वगैरे देशांत व्हॅन्डाल्स, गॉथ्स वगैरे लोकांनीं लहान लहान स्वतंत्र राज्यें स्थापिलीं. प्रथमारंभीं या स्वल्प संस्थानांच्या नायकांची सत्ता फार संकुचित असे. त्यांनां आपल्या सरदारांचा नेहमीं धाक असे. कालांतरानें या सरदारांचें अधिकार नष्ट होऊन राजांची सत्ता प्रबल झाली, व रोमन पदपादशाहीचा इतिहास आणखी एकवार घडून आला. या प्रबल झालेल्या गॉथिक बादशहांनीं किंवा राजांनीं रोमच्या बादशहांप्रमाणें आपल्या प्रजेस छळण्यास व नाडण्यास आरंभ केला. ज्या त्या गोष्टींत सरकार हात घालूं लागलें. कोणीं कोणता धंदा करावा. कोणीं कोणता पेहराव वापरावा, कोणीं कोणत्या प्रकारें ईश्वरपूजा करावी,

कोणत्या शेतकऱ्यांनीं कोणता जिन्नस किती उत्पन्न करावा, कोणत्या कारखानदारांनीं किती मजूर पदरीं ठेवावे, किती मजुरी द्यावी, किती भांडवल कोणत्या व्यापारांत घालावें, व कोणता माल किती उत्पन्न करावा [illegible] [illegible] नियमांवर नियम व कायद्यांवर [illegible] होऊं लागले, व त्याचा अंमल पोषणासाठीं नानाप्रकारच [illegible] आणि नवे नवे अधिकारी अस्तित्वांत आणून त्यांच्या कोठेंही दाद लागेनाशी झाली, व जिकडे [illegible] येऊं लागले. रयतेच्या तक्रारींची बोजाखालीं सारे लोक चीत होऊन गेले, आणि त्यांतून [illegible]. कराच्या करावे, हें कोणास कळेनासें झालें! याप्रमाणें सारी प्रजा बेजार होऊन गेल्यावर काय प्रसंग गुदरतो, याचें उदाहरण फ्रान्स देशांत १७८९ सालीं जी प्रचंड राज्यक्रांती झाली; ती देत आहे! शंभर वर्षापूर्वी फ्रान्स देशांत लोकसंतापाग्नीचें जें भयंकर होमकुंड पेटलें त्यांत कित्येक शतकेंपर्यंत अनाथ प्रजेवर जुलूम करणाऱ्या अधिकाऱ्यांच्या आणि सिंहासनस्थ राजाराणीच्या आहुती पडल्या! तात्पर्य, सामाजिक संनिधानास नियामक अशी राजसत्ता जरी अवश्यक आहे, तरी या सत्तेचा अंमल फाजील तीव्र झाल्यास समाजघटकांचें कल्याण न होतां अकल्याण होणें शक्य आहे. फ्रान्स देशांत १७८९ सालीं जो भडका पेटला त्याचें इंगित ज्यांस समजून घेण्याची इच्छा असेल, त्यांनीं ही गोष्ट लक्षांत ठेवावी कीं, दोनशें वर्षांच्या आंत फ्रेंच राजांनीं आपली जमाबंदी ११ कोटींपासून ३ अब्ज ११ कोटी केली! प्रस्तुत कालींही अशा प्रकारच्या जुलमाचीं उदाहरणें दृष्टीस पडण्यासारखीं नाहींत, असें नाहीं. जो कोणी नैल नदीच्या कांठानें थोडाबहुत प्रवास करील त्याला असें दिसून येईल कीं, जेथें जेथें सुलतानाचा अंमल नीट चालत नाहीं; तेथील प्रजा त्याचा अंमल चांगला चालत आहे अशा प्रांतांतील प्रजेहून विशेष सुखी आहे. पण या गोष्टीच्या सिद्धतेसाठीं या रानटी तुर्क लोकांकडेच पहावयास पाहिजे असें नाहीं. ब्रिटिश लोकांनीं कितीही बढाया मारल्या तरी येथील नेटिव संस्थानांतील प्रजा ब्रिटिश अंमलांतील प्रजेपेक्षां एकंदरीनें अधिक सुखी आहे, असें दाखविणें फारसें कठिण पडणार नाहीं. मि. लीवार्नरसारखे एककल्ली लोक ब्रिटिश राज्याचे कितीही पवाडे गावोत, एल्फिन्स्टन कॉलेजचे प्रिन्सिपाल मि. वर्डस्वर्थ यांसारखे विचारी गृहस्थ असें कबूल करतात कीं, इंग्लिश लोकांनीं येथें जी स्वराज्यव्यवस्था स्थापिली आहे, तीबद्दल आम्हां हिंदु लोकांस जबरदस्त किंमत द्यावी लागत आहे.

यासंबंधानें स्पेन्सरसाहेबांच्या ग्रंथांतील एक वाक्य, खालीं फूट नोटेंत

जसेंच्या तसेंच दिलें आहे.[१] कोणी असें म्हणतील की, हें लिहिणें इंग्लंडांत बसून लिहिणाऱ्या तत्त्ववेत्त्याचें आहे; म्हणून त्याला विशेष वजन देतां येत नाहीं. नसेल [illegible]चित्! पण डॉ. हन्टरसारख्या अधिकाऱ्याचा अभिप्राय तरी सर्वांस मान्य असला पाहिजे. या सरकारी प्रमुख [illegible]स्टिकवाल्याचें असें म्हणणें आहे की, हिंदुस्थानांतील अर्ध्या लोकांस प्रति दिवशीं अर्धपोटीं झोंपीं जावें [illegible] [illegible]गार टापटिपीचा अंमल हटकून सुखावह असेल[illegible], तार ऑफिसें, पोस्ट ऑफिसें, नाहीं. आगगाड्या, तारायंत्रें, टोलेजंग इमारती, प्रचंड बाजार, दरारा उत्पन्न [illegible]टी, हे आणि अशा प्रकारचे सुधारणेचे दुसरे दागिने घालून हिंदुस्थानासारखा परकी अंमलांतला देश कितीही नटला; तरी तो अंतर्यामीं सुखी असेलच, असें खात्रीनें म्हणवणार नाहीं. एखादे प्रसंगीं मयासुरानें निर्माण केलेल्या मायावी बाजारांत खरेदी करून बनलेल्या गिऱ्हाईकाप्रमाणें आमची स्थिती होण्याचा संभव आहे!

*

1. Notwithstanding the boasted beneficence of our rule in India, the extra burdens and restraints it involves, have the effect that the people find adjacent countries preferable; the ryots in some parts have been leaving the homes and setting in the territory of the Nizam and in Gualior.

# सामाजिक घडामोड

एका घराचे दगड काढून दुसऱ्या घरास लावायचे असले तर किती त्रास पडतो, हें सर्वांस माहित आहेच. पण हेच दगड चुन्यात पक्के बसविलेले असले तर फारच त्रास पडतो; आणि त्यांतही पहिली इमारत बांधल्यापासून बरींच वर्षे लोटलीं असलीं, व चुन्याचा आणि दगडांचा एकजीव होऊन गेला असला, तर एकेक दगड सोडविण्यास किती मारामार पडते, हें कोणास सांगावयाला पाहिजे, असें नाहीं, तात्पर्य, कोणत्याही जड द्रव्यांचा संनिकट संयोग करून त्यांपासून एक पिंड केला असतां, तो पिंड मोडून त्याच्या घटकांचा निराळा पिंड बनविणें हें अतिशय कष्टाचें काम आहे, हें प्रत्येकानें कबूल केलें पाहिजे.

सामाजिक घडामोडीचाही असाच प्रकार आहे. प्रथम व्यक्तीच्या शरीररचनेचा विचार करा. आरंभीं हें शरीर समजातीय द्रव्यांचें झालेलें असून, पुढें तें जसजसें वाढत जातें तसतसें त्यांत विषमजातित्व उत्पन्न होतें; व ज्या मानानें त्यांत विषमजातित्व उत्पन्न होतें, त्या मानानें त्यांत अधिकाधिक दार्ढ्य उत्पन्न होऊन बाह्य संस्कारांस तें अधिकाधिक प्रतिबंध करूं लागतें. कोळे वेळू, लहान झाडांच्या खांद्या, किंवा तरुण मुलांचे अवयव यांत किती लवचिकपणा असतो बरें; वाढ खुंटून प्रत्येक अवयवांत काठिण्य आल्यावर, कोणत्याही मनुष्यास चांगली कसरत शिकतां येत नाहीं, ही प्रत्येकाच्या पाहण्यांतली गोष्ट आहे. सामाजिक शरीरांतही परिणतीमुळें अशाच तऱ्हेचें काठिण्य उद्भूत होतें. कोणताही समाज एकदां वाढीस लागला, आणि श्रमविभागामुळें त्यास भिन्नावयावित्व प्राप्त झालें व त्यांत निरनिराळे वर्ग उत्पन्न होऊन ते निरनिराळ्या क्रिया करूं लागले म्हणजे त्याचें रुपांतर करूं पाहाणाऱ्या गोष्टींस त्याकडून मोठा प्रतिबंध होऊं लागतो. राज्य, धर्म, सैन्य, लोकाचार यासंबंधानें ज्या रीति एकदां रूढ होऊन जातात, त्यांत फिरून बदल करणें अत्यंत दुरापास्त होऊं लागतें. पूर्वापार चालत आलेल्या चालींत विचारदृष्ट्या कितीही विसंगतता दिसली तरी त्या सोडणें किती जिवावर येतें, हें बालविवाह, केशवपन, सुतक इत्यादि प्ररूढ चालींचा विचार करतां, तेव्हांच लक्षांत येणार आहे. समाजांतील शेंकडा नव्याण्णव लोकांची स्थिति अंधपरंपरेप्रमाणें असते. मळलेल्या वाटेच्या बाहेर एक पाऊल टाकल्यानें

सद्दां आपणांवर मोठा भयंकर प्रसंग गुदरेल, असा धाक त्यांस क्षणोक्षणीं वाटत असतो.

याच संबंधानें आणखी एक गोष्ट लक्षांत ठेव[illegible]
ज्याप्रमाणें व्यक्तीच्या शरीरांतील निरनिराळे अवयव आपापलीं कार्यें पृथक्पणा[illegible] करून एकमेकांस साहाय्य करतात, त्याचप्रमाणें सामाजिक शरीरांतील निरनिराळे भागही आपापलीं कार्यें स्वतंत्रपणें करून इतरांस मदत करीत असतात. पण पुढें असाही प्रकार घडनू येतो कीं, समाजाच्या एका स्थितींत ज्या वर्गाची अवश्यकता असते तो वर्ग समाजाचें स्थित्यंतर झाल्यामुळें अगदीं निरुपयोगी झाला तरी सहसा नाहींसा होत नाहीं. उदाहरणार्थ बडोद्यासारख्या संस्थानांतील बारगीर घ्या. यांचें आतां कांहीं एक प्रयोजन नाहीं; पूर्वी यांच्याकडून जी कामगिरी होत असे तिची आतां गरज राहिली नाहीं. तथापि त्यांचा चरितार्थ चालविणें संस्थानास भाग पडत आहे. या बारगिरांप्रमाणेंच आमच्या बहुतेक संस्थानिकांची, जहागीरदारांची, त्यांच्या सैन्यांची, निरनिराळ्या ठिकाणच्या देवस्थानांची, धर्माधिकाऱ्यांची व त्यांच्या मठांची, कित्येक धंदेवाल्यांची, आणि अनेक आचारांची गोष्ट आहे. ज्याप्रमाणें वार्धक्यामुळें श्रम करण्यास अयोग्य ठरलेल्या लोकांस नोकरीवरून दूर करून त्यांचे जागीं नवीन लोकांची योजना केली, तरी पेन्शनदार करून ठेवावें लागतें, त्याप्रमाणें समाजाचे स्थित्यंतर होऊन त्यांतील कोणताही वर्ग निरुपयोगी ठरला तरी त्याचा बोजा बरींच वर्षे समाजास वहावा लागतो. कारण ज्याप्रमाणें कोणत्याही व्यक्तीस आपण होऊन पंचत्वास मिळणें आवडत नाहीं, त्याप्रमाणें समाजाच्या कोणत्याही अवयवास तें आवडत नाहीं. व्यक्तीप्रमाणेंच समाजाचे अवयवही आपापलें अस्तित्व दीर्घतम करण्याविषयीं झटत असतात.

येथपर्यंत सांगितलेल्या गोष्टीं वरून समाजाचें रूपांतर होण्यास किती प्रत्यवाय असतात, हें वाचकांच्या लक्षांत बरेंच आलें असेल. तथापि ज्यांच्या मनांत ही गोष्ट अजून बरोबर उतरली नसेल त्यांच्या समजुतीसाठी आणखी एकदोन गोष्टी सांगतों. समाजांतील लोकांचें नियामक आणि नियत किंवा शास्ते आणि शासित असे मुख्य दोन भाग असतात, हें मागें सांगितलेंच आहे. या भागांपैकीं नियामक भाग समाजाच्या परिणतीबरोबर विस्तृत होत गेला तर त्या मानानें नियत भाग क्षीण होत गेला पाहिजे हें उघड आहे. ज्या देशांत सरकारी अधिकाऱ्यांची संख्या आणि सरकारनें चालविलेलीं खातीं वाढत जातात; त्या देशांतील प्रजा अधिकाधिक दुर्बल व परतंत्र होत जाते. सरकारी अधिकारी कोणत्याही खात्यांतले असले तरी त्या सर्वांचा चरितार्थ प्रजेनें दिलेल्या करांवर होत असतो. त्यामुळें होईल तितकी जमाबंदी वाढविणें आणि सक्तीचा अंमल

सर्वांस खालीं पाहण्यास लावतो. ज्यानें अशा प्रकारचा केलेला संभोग कोणत्याही कारणामुळें बाहेर पडला, त्या दुखापतीबद्दल शिक्षा होणें किंवा जबरीच्या संभोगाबद्दल शिक्षा होणें, यांत विशेष अंतर आहे, किंवा कमी-अधिक बेअब्रू आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. समजा कीं, एका मुलीचें बारावें वर्ष फाल्गुन वद्य अमावास्येस संपते, व दुसरीस त्याच दिवशीं तेरावें वर्ष लागतें. कायद्याप्रमाणें एकीस 'बारा वर्षांची' आणि दुसरीस 'तेरा वर्षांची' असें म्हटलें पाहिजे. समजा कीं दोघींच्याही घोडनवऱ्यांनीं दोघींवर बलात्कार केल्यामुळें एकाच प्रकारचा परिणाम घडून येऊन, दोनही खटले कोर्टापुढें आले; अशा स्थितींत वर सुचविलेला फेरफार पीनल कोडांत केला असल्यास, पहिलीच्या नवऱ्यास कायद्याप्रमाणें दुखापतीबद्दल व दुसरीच्यास जबरीच्या संभोगाबद्दल येवढाच भेद काय तो होणार आहे. पण या भेदामुळें या दोघा कल्पित राक्षसांच्या निर्दयपणांत, कामांधतेंत, किंवा बेअब्रूंत काय अंतर दाखवितां येईल, हें आम्हांस कळत नाहीं. पाहिजे त्या वयाच्या मुलींची लग्नें करण्याची मोकळीक असण्यापासून घडणारे अनर्थ संभोगाच्या कायद्यांत लहान लहान फेरफार केल्यानें टळण्याचा संभव नाहीं. ज्या उल्लूंस हा गुन्हा करावयाचा असतो तो जबरीचा संभोग आणि दुखापत यांतील भेद पाहून तदनुसार वर्तन करणारे नसतात! जे अत्यंत निंद्य किंवा क्रूर कर्म करण्यास प्रवृत्त होतात; ते त्यांना ठेवलेल्या शिक्षांतील अंतर पाहण्यास कधींही थांबत नाहींत! असें कर्म करतांना ते बेफाम होऊन गेलेले असतात, व त्यांच्या मद उतरेतोंपर्यंत ते कामातुर पशूप्रमाणें वागत सुटतात. अशांच्या ताब्यांत स्त्रीच्या रूपानें लहान मुली देण्याचा प्रघात जोंपर्यंत चालू राहील तोंपर्यंत सुधारलेल्या लोकांनीं आमच्या तोंडावर थुंकण्यासारखे किंवा त्यांत शेण घालण्यासारखे असले निंद्य प्रकार घडल्याशिवाय राहणार नाहीत! आणि विवाहकालाची मर्यादा तर कायद्यानें वाढवून घेण्यास आम्ही तयार नाहीं. तींत परक्या सरकारानें हात घालतां कामां नये. शिक्षणानें लोकांची मनें विकसित होऊन, ती जसजशी वाढत जाईल तसतशीच वाढूं दिली पाहिजे. दहा किंवा बारा वर्षांच्या आत मुलींचीं लग्नें करूं नये, असा कायदा करून घेतला, तरी असले अनर्थ कसे टाळतां येणार आहेत? वरातीहून घरीं आल्याबरोबर आपल्या बारा वर्षांच्या बायकोशीं एखादा घोडा असें कर्म करण्यास कशावरून प्रवृत्त होणार नाही? पण इतकें तरी कशाला? स्त्रिया ऋतुस्नात झाल्यावर जरी त्यांचे विवाह होऊं लागले तरी ज्याला असलें कर्म करावयाचें असेल त्याच्या तावडींत कोणी तरी मुलगी सांपडेलच. तेव्हां यासंबंधानें कायद्याचा कांहींएक उपयोग नाहीं, असें या बेकायदेवाल्यांचें म्हणणें आहे. धन्य त्यांच्या अकलेची, कोटिक्रमाची, स्वातंत्र्याभिमानाची आणि कर्तृत्वाची!!!

*

# समजत नाहीं तें हें

'तिशी उलटलेला हरी मोहन अत्युत्कट विषयवासनेमुळें बेफाम होऊन पुमोनीवर चालून गेला, व ज्याप्रमाणें भुकेनें अत्यंत क्षुब्ध झालेला एखादा क्रूर व्याघ्र कोठें तरी नि:शंकपणें फिरत असलेल्या किंवा पडून राहिलेल्या शेळीवर उडी घालून आपल्या तीक्ष्ण दंष्ट्रांनीं तिच्या शरीराचें विदारण करतो आणि आपली क्षुधा भागवितो; त्याप्रमाणें हरी मोहनानें आपल्या कौमारावस्था धर्मपत्नीशीं राक्षसी आचार करण्यास सुरुवात केली, व त्याच्या दु:सह यातना न सहतां आल्यामुळें तिनें फोडलेला हंबरडा ऐकून, तिला सोडविण्यास निघालेली तिची आई तिच्यापाशी येऊन पोहोचण्यापूर्वीच त्यानें आपल्या भडकलेल्या कामकुंडांत तिची आहुती टाकली, आणि तिच्या जीविताबरोबरच आपल्या लौकिकाची रांगोळी केली-' वगैरे प्रकार ऐकून सदय मनुष्याच्या अंत:करणांत त्या हतभाग्य कुमारिकेविषयीं करुणा उत्पन्न होणें, आणि हरी मोहनासारखे जे अधम असतील त्यांस फाडून खावें किंवा हाल हाल करून मारून टाकावें, असें वाटणें हें फार साहजिक आहे; तसेंच अशा प्रकारचा पुण्य प्रकोप खवळून गेला असतांही, ज्यांच्या वृत्तींतील विचारशीलतेचा निखालस लय होऊं शकत नाहीं, अशांनीं अशा प्रकारच्या भयानक गोष्टीचा विचार क्षणभर एकीकडे ठेवून, असे प्रकार पुन: पुन: न घडूं देण्याबद्दल काय करावें, याच्या विचारास लागणें हेंही अत्यंत स्वाभाविक आहे; पण जगाची जी खरी स्थाईक सुधारणा होते, ती विपत्तीच्या दर्शनानें उत्पन्न होणाऱ्या आकस्मिक हृत्क्षोभानें; किंवा त्या विपत्तीच्या निरसनार्थ आवेशाच्या भरांत कांहीं तरी सुचविलेल्या उपायानें होत नसते. विपत्तीचें निर्मूलन करण्याची प्रवृत्ति होण्यास ती पाहून खेद झाला पाहिजे, व त्या खेदाबरोबर ती घालविण्याचा कांहीं तरी उपाय करावा, असें वाटलें पाहिजे, व त्या दोन गोष्टी प्रथम झाल्याखेरीज मनुष्याच्या हातून कोणत्याही प्रचंड विपत्तीचें निर्मूलन होणार नाहीं हें खरें आहे. पण येवढ्या दोन गोष्टी झाल्या म्हणजे तें निर्मूलन होईलच असेंही खात्रीनें सांगतां येत नाहीं. आपण ज्या जगांत आहों तें अनेक प्रकारच्या दारुण विपत्तीनीं ओतप्रोत भरलें आहे, हें खरें आहे, आणि त्या विपत्तींची संख्या थोडी कमी झाल्याखेरीज आमची येथील वस्ती सुखावह होण्याचा संभव नाहीं, हेंही

खरें आहे. पण येवढ्यावरून विपत्ति दृष्टीस पडली कीं, ती नाहीशीं करण्यासाठीं प्रथमदर्शनीं जो उपाय सुचेल तो करीत सुटावें, असें सिद्ध होत नाहीं. कधीं कधीं अशा प्रकारच्या उपायांनीं नफा न होतां उलट नुकसान होतें. सगळ्या झाडाला कीड लागून जाऊन तें अगदी वठून गेलें असलें, व त्याचीं फळे आळ्यांनीं भरून जात असलीं तरी त्याच्या वरच्या सालीवर किंवा फळांवर औषधोपचार करून काय फायदा होणार आहे? क्षारोदकादि ज्या उपायांची योजना करावयाची असेल त्यांचा परिणाम त्यांच्या अंतर्सालीवर किंवा मुळावर झाला, तरच त्यापासून कांहीं फायदा होण्याचा संभव आहे. ज्याप्रमाणें हाडापर्यंत जाऊन भिडलेला व्रण त्याच्या तोंडावर चोपडलेल्या तेलांनीं किंवा मलमाच्या पट्टयांनीं बरा होण्याची आशा नाहीं, त्याप्रमाणें समाजाच्या हाडापर्यंत जाऊन खिळलेल्या व शेंकडों वर्षे वहात असलेल्या अमंगलाचाररूप व्रणांचें निराकरण भलत्याच प्रकारच्या कायद्यांनीं होण्याचा संभव नाहीं. पुमोनीचें हृदयद्रावक वर्तमान ऐकल्यापासून परमपूज्य रघुनाथरावाप्रमाणें, आमचें अंत:करणही कळवळत आहे. असला भयंकर मृत्यु कोणत्याही आर्यकुमारिकेस इतउपर न यावा, असें **हिंदूप्रमाणें सुधारकासही** नाभिमूलापासून वाटत आहे; पण ज्या उपायांनीं अप्राप्तयौवन कन्यकांवर येणारें हें विघ्न टाळतां येईल असे त्या मद्रपूरस्थ सुधारकाग्रणीस किंवा पत्राग्रणीस वाटत आहे, ते उपाय फारसे फलद्रूप होणार नाहींत, **अशी सुधारकास** भीति पडली आहे; हें त्याचें मोठें दुर्दैव होय!

**मद्रास** येथील **विवाहपरिषदेचें** (Marriage Association) असें म्हणणें आहे कीं, दुर्दैवी वंगकन्येचें हें खेदजनक उदाहरण लोकांच्या डोळ्यापुढें आहे तोंपर्यंत सर्व सुधारणेच्छू सुशिक्षितांनीं व इतर सदस्य लोकांनीं सरकारकडे अर्ज करून, 'जो नवरा आपल्या बायकोशीं १४ वर्षांच्या आंत (म्हणजे बायकोस चवदावें वर्ष लागण्यापूर्वीं) संभोग करील, त्यानें तिच्याशीं जबरीचा संभोग केला असा आरोप त्याच्यावर ठेवून, त्याला जबरीच्या संभोगास सांगितलेली शिक्षा देण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेटास येईल, अशा प्रकारचा फेरफार पीनल कोडांत करून घ्यावा' आमच्या मतें असा अर्ज करण्यास फार लोक तयार होणार नाहींत, झाले तरी सरकार तो मान्य करून त्याप्रमाणें पीनल कोडाचें कलम फिरवणार नाहीं, व त्यांनीं तें फिरविलें तरी त्यापासून म्हणण्यासारखा फायदा न होतां, बराच त्रास होईल. कसा तो पहा. या देशांतील मुली बहुधा बारापासून चवदा वर्षांपर्यंत ऋतुमती होतात. त्यापुढें अस्नात रहाणाऱ्या अशा मुली फार आढळणार नाहींत. मुली ऋतुमती झाल्या कीं त्यांचेंगर्भाधान केलेंच पाहिजे, असा प्ररूढ आचार आहे, व शेंकडा नव्याण्णव बाबींत त्याचें परिपालन होत आहे. तिजवराची, बिजवराची,

किंवा घोडनवऱ्याची तर गोष्ट राहूं द्या. कारण 'माझी प्रिया पातळ नेसून मला भेटेल केव्हां' असें त्यास झालेलें असतें, व ऋतुशांतीचा मुहुर्त फार तर नाहींच, पण एका आठवड्याच्या लांबणीवर टाकण्याची भीड खुद्द ब्रह्मदेवानें घातली तरी देखील ती मान्य करण्यास तो तयार नसतो! तेव्हां नहाण आल्यावर, पण चवदा वर्षांच्या आंत, अशांनीं स्वस्त्रियांशीं केलेला जो संभोग; त्यास तुम्ही आपल्या कायद्यांत 'संमत संभोग' म्हणा, किंवा 'असंमत संभोग' म्हणा, ते म्हणून त्याचा अनुभव घेतल्याशिवाय राहवयाचे नाहींत! प्रबुद्ध कामवासना, सुखोपभोगाची उत्कंठा, धर्मबंधन, रूढाचार, व लोकमत इत्यादि कारणांनीं असे लोक एकांतप्रियादर्शनाविषयीं मोठे आतुर झालेले असतात! पण ज्या मुलाची अजून शाळा सुटली नाहीं, ज्याला 'अरे' वाचून कोणी बोलत नाहीं, ज्याच्या पाठीमागचा मास्तराचा धाक सुटलेला नाहीं, ज्याच्या तोंडावर यौवनारंभाचें कोणतेंही चिन्ह दिसूं लागलें नाही, ज्याच्या निद्रेचा विषयचिंतेनें भंग होऊं लागला नाहीं, व ज्याला त्या सुखाची खरी गोडी समजण्याचा संभव नाहीं, अशा लुस्कान पोरास देखील, गर्भाधानाचा सुखसोहळा पाहण्याविषयीं कासावीस झालेल्या आया, सास्वा, नणंदा, भावजया, जावा, व इतर स्त्रिया जबरीनें मदनपाशांत बद्ध करून टाकतात, हें आपण नित्य पहात असून, चवदा वर्षाच्या आंतील संभोगास जबरीचा संभोग म्हणावें, आणि त्या गुन्ह्यास सांगितलेली शिक्षा न्हाणवलीच्या नवऱ्यांस देण्याचा अधिकार मॅजिस्ट्रेटाला असावा; अशा अर्थाचें कलम पीनल कोडांत घालून द्या, अशी सरकारास पदर पसरून प्रार्थना करणारे किती हिंदु निघतील कोण जाणे! जे असें करण्यास तयार होणार असतील त्यानीं सरकाराकडे तरी जाण्याची काय गरज आहे? त्यांनीं चवदा वर्षापर्यंत आपल्या मुलींचीं लग्नेंच करू नयेत किंवा तसें होणें शक्य नसल्यास तें वर्ष उलटतोंपर्यंत निदान त्यांना त्यांच्या सासरीं तरी पाठवूं नये. पण तेंही न घडल्यास त्या अवधीच्या आंत, त्या आपल्या नवऱ्याच्या तावडींत न सांपडतील, अशाविषयीं तरी पक्का बंदोबस्त करावा म्हणजे झालें! पाहिजे त्या वयांत मुलींचीं लग्नें करण्याची चाल ज्या देशांत रूढ आहे, व जेथें ऋतुमती झालेल्या स्त्रीचें गर्भाधान करण्याचा धर्माचार व लोकाचार प्रचलित आहे, अशा देशांत चवदा वर्षांच्या आंत नवऱ्यानें ऋतुस्नान स्वस्त्रीशीं केलेल्या संभोगास जबरीचा संभोग म्हणावें, अशी सूचना कोणीं केली असतां, ती ऐकून वरच्या सारखा विनोद करण्याची प्रवृत्ति होणें स्वाभाविक नाही काय? पीनल कोडांत असें कलम घातल्यास तें केवळच 'मृताक्षर' होऊन बसणार नाहीं असें जे कित्येक लोक मनांतल्या मनांत म्हणत आहेत, ते आमचे ध्यानांत केव्हांच येऊन चुकलें आहे! ज्या मुली तेराव्या वर्षी ऋतुमती होऊन चवदाव्या

वर्षी गर्भवती किंवा अपत्यवती होतील, त्यांच्या नवऱ्यावर जबरीच्या संभोगाचे खटले करण्यास त्यांचीं अपत्यें बेमालूम पुरावा होतील, यांत शंका नाही! मात्र अशा प्रकारचे खटले करण्याचें श्रेय पोलिसांनें आपल्या शिरावर घेण्यास तयार झालें पाहिजे; कारण नुकत्याच अपत्यवती झालेल्या किंवा होण्याचीं चिन्हे दिसूं लागलेल्या मुलींच्या किंवा सुनांच्या नवऱ्यांवर जबरीच्या संभोगाच्या फिर्यादी लावणारे मुलींच्या सासरचे किंवा माहेरचे आप्त उत्सुक असतील, असें आम्हांस वाटत नाहीं. तेव्हां तो बोजा सर्व प्रकारें लोकांच्या नीतीचें व कायद्यांचें संरक्षण करण्यास नेमिलेल्या पोलिसाच्या डोक्यावर येऊन पडणार आहे. व तो उचलतांना भल्या गृहस्थांची अब्रू घेण्याची किंवा बेकायदेशीरपणें दोन पैसे मिळविण्याची त्यांस चांगली सवड होणार आहे! ही सत्यवती आणि अपत्यवती मुलींची व त्यांच्या नवऱ्यांची गोष्ट झाली. यांच्या संबंधाने न छापविण्यासारखा पुरावा पोलिसाच्या हातीं येण्याचा संभव असल्यामुळें असलीं दंपत्यें कोर्टापुढें खेंचून आणून त्यांपैकीं गुन्हेगारांस शिक्षा ठोंठावतां येणार आहे, हें कबूल आहे. पण चवदाव्या वर्षापर्यंत, नहाण आले नसून किंवा तें आल्यावर, जे कच्चे किंवा पक्के युवे आपापल्या 'स्त्रियांशीं बिनबोभाट समागम करीत असतील, त्यांचा समाचार हें पोलिस कसा घेणार? नवरा केवढाही असला तरी नहाण आल्यावर पुमोनीसारखा त्याच्या स्त्रीचा परिणाम होण्याचा संभव नाहीं;व तो तितक्या विकोपास गेला नाहीं तर तो बाहेर येण्याचाही संभव नाहीं; व तो बाहेर आला नाहीं म्हणजे पोलिसाच्या हातून कांहींएक होणार नाहीं! पुमोनीच्या प्रकारासारखा प्रकार उघडकीस आला म्हणजे संताप येणें व कांहीं निर्बंध करावा, असें वाटणें वाजवी आहे पण तो करण्यापूर्वी त्यांचा उपयोग कितपत होणार आहे, हें शांतपणे पाहिलें पाहिजे. आपलें ''फूल नाहीं तर फुलाची पाकळी'' या न्यायानें विवाहकाल तर वाढवितां येतच नाहीं, तेव्हा जबरीच्या संभोगाची घालवेल तितकी दहशत घालून जेवढा फायदा होईल; तितक्यांतच समाधान मानून घ्यावयाचें असेल तर मग आमचें कांहींएक म्हणणें नाहीं. ''माझ्या बायकोच्या वयास चवदावें वर्ष लागलें नसून, मी तिच्याकडे जाण्यास निघालों आहे, पण जर करतां माझी वासना मला आयत्या वेळी अनावर होऊन माझ्या हातून दुखापतीचा प्रकार घडला व तो बाहेर आला, तर मला दुखापत केल्याबद्दल शिक्षा न होतां जबरीचा संभोग केल्याबद्दल शिक्षा देऊन माझी सर्व जगभर बेअब्रू होणार आहे; तेव्हां तें चवदावें वर्ष लागेतोंपर्यंत त्या वाटेलाच जाऊं नये, हा उत्तम मार्ग,'' असा विचार करून जे अशा कर्मापासून पराङ्मुख होतील, ते या तुमच्या पीनल कोडांतील कलमाच्या भीतीनें तर झाले, असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण तुमच्या त्या कलमाचा असा परिणाम कोटींतून

एकावर तर होईल किंवा नाहीं, याचा संशय आहे! अशा कलमानें कोटि मुलींतून फार झालें तरी एका मुलीच्याच अब्रूचा व जीविताचा बचाव होणार आहे, यासाठीं तें कलम पीनल कोडांत घालूं नये असें आमचें म्हणणें नाहीं. खुशाल घालावें. पण त्यापासून किती उपयोग होणार आहे, हें नीट ध्यानांत आणून घालावें, म्हणजे तें घातलें गेल्यास आपण मोठी फुशारकी मिरविण्याजोगी किंवा कृतकृत्यता मानण्याजोगी सुधारणा केली, असा वृत्तींत गर्व उत्पन्न होणार नाहीं, व पुढें अजून विपत्तीचा पर्वत आहे; असें ध्यानांत वागेल. वारंवार होत काय असतें कीं, जी सुधारणा आपण हातीं घेतलेली असते, किंवा जिचें आपणांस मोठें महत्त्व वाटत असतें, ती घडून आली असतां बहुतेक विपत्ति नाहींशी होईल असा आपणास भ्रम होत असतो, व तसेंच यासंबंधानेंही होण्याचा फार संभव आहे. तसें न व्हावें, म्हणून पुनरुक्तीच्या दोषास न भितां, आम्हीं आणखी एक वेळ असा प्रश्न विचारतों कीं, वर निर्दिष्ट केलेला फेरफार पीनल कोडांत करून टाकला असें मानिलें, तरी आजमितीस जे लहान किंवा थोर नवरे आपापल्या चवदा वर्षांच्या आंतल्या नहाण आलेल्या किंवा न आलेल्या बायकांकडे बिनबोभाट जात आहेत, जे पूर्वी गेले व आपल्या मूर्खपणाचा परिणाम करून चुकले व जे येथून पुढें गुपचिपपणाने जातील, त्यांचा बंदोबस्त कसा करावयाचा? ज्यांना अतींद्रिय ज्ञान आहे, असे पोलिस पैदा झाल्याशिवाय, अशा प्रकारचें अपायकारक पण बिनबोभाट संभोग- जबरीचे संभोग- बंद करतां येणार नाहींत, किंवा कोर्टापुढें आणितां येणार नाहींत. असा प्रकारचे संभोग प्रतिदिवशीं हजारों होत आहेत, हें कोणत्याही सत्यशील हिंदूंस नाहीं म्हणतां येणार नाहीं. तेव्हां जर ते बंद व्हावे अशी खरोखर इच्छा असेल, तर या जबरीच्या संभोगाच्या सुधारलेल्या कलमावर फारसा भरंवसा ठेवण्यांत अर्थ नाहीं. ते बंद करण्यास निदान आम्हांस तरी एकच उपाय दिसतो, तो हा कीं, **विवाहकालाची मर्यादा वाढविणें. ही पाहिजे तितकी** वाढविण्यास आम्ही पाहिजे तसला कायदा करून घेण्यास तयार आहों; व ही वाढल्यानें आमच्या अनेक रोगांस उतार पडणार आहे, अशी आमची खातरी आहे. मुली बापाच्या घरी लग्नाआधी बरींच वर्षे राहिल्या, तर ममतेनें त्यांना शिक्षण देण्यास पुष्कळ अवधी सापडेल; प्रपंचाचें लगडें त्यांच्या पाठीमागें अल्प वयांत न लागल्यामुळें त्यांची वाढ चांगली होऊन पुढें त्यांचीं मुलें सुदृढ निपजतील; प्रपंचाचा भार त्यांस सहज वाहतां येईल; पुष्कळांच्या कपाळाचें वैधव्य टळेल; स्वयंवरपद्धति, गांधर्वविवाह, किंवा स्वाभिमतविवाह यांचा प्रघात हळूं हळूं पडूं लागेल; पुरुषांस साहसाचीं कामें करण्यास उमेद राहील; संतती अधिकाधिक कार्यक्षम निपजत जाईल; सर्वत्र उद्योग उत्साह यांची वृद्धि होईल- सारांश, ज्या

कारणांनीं ऐहिक संसारयात्रा सुखावह होते त्यांपैकीं बरींच कारणें या मंदभाग्य देशांत दिसू लागतील! पण हें सारें व्हावें कसें? पीनल कोडांतील जबरीच्या संभोगाच्या कलमांत फरक केल्यानें खचित नाहीं; केव्हां ना केव्हां तरी मुलींचीं लग्नें चवदापंधराच्या पुढें होऊं लागलीं पाहिजेत. हें होण्यास्तव आम्हीं धर्मबंधनाकडे दुर्लक्ष करण्यास, किंवा त्यांनीं आम्हांस आपल्या पोटांत घेण्यास तयार झालें पाहिजे! हें घडवून आणण्यांस साम आणि संग्राम असे दोन उपाय आहेत. सामानें हेतु सिद्ध होणार असेल तर वर्दळीस येण्यांत कांहीं अर्थ नाहीं. सामाच्या बाजूनें प्रयत्न करण्यास आरंभ करणें म्हणजे निदान दहा वर्षांच्या आंत मुलींचीं आणि सोळा वर्षांच्या आंत मुलांचीं लग्नें करण्याविषयीं कायद्याचा प्रतिबंध करून घेणें, व या शेवटच्या पायरीवरून पुढें निभेल त्या रीतीनें चढत जाणें, असें जें राजे सर टी. **माधवराव** यांचे म्हणणें आहे; तें आम्हांस प्रशस्त वाटतें. एवढेंही करण्यास जे तयार नसतील, ते कपटी समाजहितचिंतक किंवा मिथ्या सुधारक होत!

*

# आमच्या स्त्रियांचा पेहराव

विशेष बदल न होतां ज्या अनेक गोष्टी आमच्या लोकांत पुरातन कालापासून चालत आल्या आहेत त्यांतच आमच्या स्त्रियांच्या पेहरावाची गणना करतां येईल, असें वाटतें. पूर्वीच्या ऋषिपत्न्या ज्या प्रकारचीं पातळें किंवा वल्कलें वापरीत आहेत, त्याच प्रकारचीं पातळें किंवा लुगडीं वानप्रस्थाश्रमाचें आचरण करणाऱ्या आमच्या गतभर्तृका वापरीत असत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. देशपरत्वें व जातिपरत्वें येथील स्त्रियांच्या पोषाखांत थोडाबहुत फरक आहे, हें प्रत्येकास कबूल केलें पाहिजे. पण कोणत्याहि विवक्षित प्रांतांतील किंवा जातींतील स्त्रियांच्या वस्त्रांचा इतिहास पाहिला तर त्यांत विशेष अंतर पडलें आहे, असें दाखविणें फार कठिण होईल.

पोषाखांत वस्त्रें आणि अलंकार या दोहोंचा समावेश होतो. प्रस्तुत निबंधांत स्त्रियांच्या फक्त वस्त्रांचा विचार करण्याचा इरादा आहे.

या निबंधाच्या मथळ्यावरील शब्द वाचूनच कित्येकांचें पित्त खवळून जाईल, हें आम्हांस पक्कें ठाऊक आहे. पण आम्हांस त्याची भीति कशाला पाहिजे? सुलतानी किंवा मोगलाई अंमल असता, आणि पथ्यकारक पण अप्रिय भाषण करणारास दंड होत असता, तर अशा प्रकारचे लेख लिहिण्यांत किती धाडस करावें, हा विचारणीय प्रश्न झाला असता. पण सांप्रत कालच्या उदार व सुधारलेल्या राज्यांत मतस्वातंत्र्याचा अलौकिक उपभोग आम्हांस मिळत असल्यामुळें, ज्यांनीं **सुधारक** हें नांव धारण केलें आहे त्यांनीं लोकापवादभयानें लोकांच्या आचरणांतील दोष न दाखविणें, व सुधारणेचे नवीन मार्ग न सुचविणें, हें भित्रेपणाचें काम होय. रूढ गोष्टींच्या चांगलेवाईटपणाचा यत्किंचित् विचार न करतां, त्या रूढ आहेत येवढ्यासाठींच त्यांचें मंडन करणें, आणि नवीन सुधारणा नवीन आहेत, येवढ्यासाठींच त्या सुचविणारावर तुटून पडणें, हें अविचारीपणाचें कृत्य कोणत्या देशांतील असमंजस व हट्टी लोकांच्या हातून घडत नाहीं? फेर म्हणून कोणत्याही गोष्टींत फेर करावा, असें आमचें म्हणणें नाहीं. पण जर कोणत्याही फेरापासून अधिक सुख होण्याचा संभव असेल, तर त्याच्या आड येणें यासारखें वेडेपण नाहीं. आज कित्येक वर्षे अव्याहत चालत आलेल्या

आमच्या स्त्रियांच्या पोषाखांत म्हणण्यासारखें दोषस्थल नाहीं, व असलें तरी तें काढून टाकण्यासारखें नाहीं, असें जर कोणी समाधानकारक रीतीनें सिद्ध करून देईल; तर आम्ही यासंबंधानें जे लिहिणार आहों, तें आनंदानें परत घेऊं. पण तसें न झाल्यास आम्ही ज्या सुधारणा सुचविणार आहों, त्या हळू हळू अंमलांत आणण्याचा विचार लोकांनीं अवश्य केला पाहिजे.

प्रथम, स्त्रियांप्रमाणें पुरुषांचा पोषाख कायम राहिलेला नाहीं, हें अगोदर लक्षांत आणिलें पाहिजे. उद्योगाच्या, पदवीच्या व राजकर्त्यांच्या सोयीप्रमाणें पुरुषाच्या पेहरावांत फरक झाले आहेत व होत आहेत. आंगरखा आमचा नव्हे; मुसलमानांचा आहे, हें उघड आहे. तसेंच रामायणांतील किंवा महाभारतांतील योद्धे तुमान घालीत होते किंवा नाहीं, याची शंका आहे! श्रुतिस्मृतिकालांत किंवा पुराणकालांत निरनिराळ्या वर्गांतील स्त्री-पुरुषें कोणत्या प्रकारचीं वस्त्रें परिधान करीत होतीं व कोणत्या प्रकारच्या भूषणांनीं आपलीं शरीरें नटवीत होतीं, हें जर कोणी पुराणविद्याविद् साधार दाखवून देतील, तर त्यांनीं एक मोठी उपयुक्त कामगिरी बजावली असें खचित होणार आहे. पण जोंपर्यंत तशा प्रकारचा लेखक पुढें आला नाहीं तोंपर्यंत भरंवसा अनुमानांवरच ठेवणें भाग आहे; व हीं अनुमानें बहुश: खोटीं ठरण्याचा संभव नाहीं. कारण आमचा नाइलाज झाल्याखेरीज कोणत्याही गोष्टीत आपण होऊन फेरबदल करणारे आम्ही लोक नाहींत. हिंदुस्थानच्या सभोंवतीं उल्लंघन न करण्यासारखा खंदक किंवा भिंती असत्या, आणि दुसऱ्या कोणत्याही लोकांचा आणि आमचा संबंध न घडता, तर वेदकालापासून आतांपर्यंत व आतांपासून कालांतापर्यंत आम्ही जसेच्या तसेंच असतों, यांत काडीयेवढा संशय नाहीं. कारण विचारशक्ति असून विचारशक्ति नसलेल्या व केवळ उपजत बुद्धीच्या धोरणानें आचरण करणाऱ्या मनुष्येतर प्राण्यांप्रमाणें आमची वृत्ति आहे. आमच्या वस्त्रप्रावरणांत किंवा आचारविचारांत मधून मधून जे कांही फरक झाले आहेत, ते दुसऱ्या लोकांचें आमच्याशीं संघटन झाल्यामुळें झाले आहेत; व सध्यां जे होत आहेत तेही त्याच कारणामुळें होत आहेत. आम्ही म्हणजे अमुक एक गोष्ट चांगली नाहीं, असें आपण होऊन ठरवून ती रद्द केली आहे, आणि तिच्या जागीं दुसरी कोणती तरी करूं लागलों आहों, असें सहसा आढळणार नाहीं; असो.

स्त्रियांच्या पेहरावाचा विचार करतांना उपयुक्तता आणि दर्शनीयता हे दोन गुण डोळ्यांपुढें ठेविले पाहिजेत. तसें न केलें तर त्यावरील टीकेंत अनेक प्रमाद होणार आहेत. उपयुक्ततेच्या दृष्टीनें पहातां निरनिराळ्या धंद्यांतील स्त्रियांचे पोषाक निरनिराळ्या तऱ्हांचे पाहिजे आहेत, हें उघड आहे. पण ही गोष्ट आजपर्यंत

कोणाच्याही लक्षांत आली नाहीं, असें वाटतें. भंगीण, सुतारीण, कासारीण, परटीण, शेतकरीण, स्वयंपाकीण, दळपीण, कांडपीण, गौळण, कुंभारीण, भटीण—सारांश, ईणप्रत्ययांत पाहिजे ती धंदेवालीण घ्या, 'लुगडेंचोळी' हा साऱ्यांचा, साऱ्या ऋतूंतला व सार्वकालिक पोषाख! यांत कोणी कोणी अल्पस्वल्प फेरफार करतात, पण त्यास फेरफार म्हणावें की काय, हें आम्हांस समजत नाहीं. कित्येक प्रांतांतील खालच्या प्रतीच्या बायका चोळया मुळींच घालीत नाहींत, हा एक फेरफार आहे! तसेंच कित्येक प्रांतांतील कुणब्यांच्या बायका कासोटा मुळींच घालीत नाहींत, हा दुसरा एक फेरफार आहे! पण या किंवा अशा प्रकारच्या इतर फेरफारांस फेरफार म्हणणें म्हणजे मिठांत तिखट व तिखटांत मीठ घातल्यानें नवीन तोंडींलावणें झालें, असें म्हणण्यासारखें होय! पोषाख असा असावा कीं, जो घातला असतां कोणतेंही काम करतांना हस्तपादादि अवयवांचे चलनादि व्यापार सहज होऊन, शरीरास कोणत्याही प्रकारचे कष्ट होऊं नयेत, किंवा त्यांत वैरूप्यता दिसूं नये. जो पोषाख क्षणोक्षणीं सावरला नाहीं, तर ज्यापासून हातीं घेतलेल्या कामांत वारंवार हरकत होणार किंवा शरीर उघडें पडणार, असा पोषाख काय कामाचा? स्त्रीची मान आणि कंबर यांमधील मागला पुढला भाग नीटपणें झांकला जाऊन, कोपरापासून त्यांचे दोनही हात पाहिजे तें काम करण्यास हवे तिकडे फिरवितां येण्यासारखें असावें, या गोष्टीस बहुधा कोणीही 'ना' म्हणणार नाहीं, असें आम्हांस वाटतें. हें जर खरें असेल तर आम्ही आपल्या वाचकांस व इतरांस त्यांच्या गळयाची शपथ घालून असें विचारतों कीं, हात सव्वाहात खणाची चोळी आणि डाव्या खांद्यावरून उजव्या खांद्यावर अथवा उजव्या खांद्यावरून डाव्या खांद्यावर घेतलेल्या पदरानें हें काम होण्यासारखें आहे काय? आपल्या बायकांचा पदर सावरण्यांत किती वेळ जातो, व तो वरचेवर अंगावरून सरत असल्यामुळें त्यांना किती त्रास पडतो, हें ज्यांच्या पाहण्यांत आलें असेल, त्यांच्यानें वरील प्रश्नास 'हो' म्हणवणार नाहीं असा आमचा समज आहे. ही, चोळीलुगडें वापरण्याचा ज्यांना अधिकार आहे; अशा सभर्तृकांची गोष्ट झाली. पण आमच्या गतभर्तृकांची स्थिती याहूनही विशेष शोचनीय आहे. त्यांच्या पदराला चोळीचें सुद्धां पाठबळ नाहीं! त्यानें दगा दिला कीं, त्या उघड्या पडल्याच! शिवाय, गतभर्तृकांच्या पदरास त्यांचें डोकें झांकून ठेवण्याचें आणखी एक फाजील काम असतें! यासंबंधानें या हतभाग्य स्त्रिया एकसारख्या कांचणींत असतात, असें म्हटलें तरी चालेल. आपल्या अंगाचा पाहिजे तो भाग उघडा पडला तरी हरकत नाहीं, पण आपलें डोकें उघडे पडतां कामा नये, कारण तें उघडें पडलें असतां आपल्या छलकांचा निर्दयपणा व आपल्या धर्माचा अधर्मीपणा उघडा पडेल,

अशी भीती त्यांच्या मनांत सर्वकाळ वागत असते. यामुळें अडचणीच्या वेळीं अशा स्त्रियांच्या पाठी दिसतात, पण डोकीं कधींही दिसत नाहींत. यासंबंधानें परवां आम्ही एक मित्राशीं बोलत असतां, त्याचें असें म्हणणें पडलें कीं, गतभर्तृकांच्या केशकलापावर न्हाव्यांची लोखंडी फणी चालू न देण्याचें सामर्थ्य आम्हांस येईल तेव्हां येवो, पण तें येईतोंपर्यंत त्यांना तेवढ्या चोळया घालूं देण्याचा प्रघात जरी पडला, तरी देखील त्यांची पुष्कळ दैना वांचणार आहे.

आतां कोणी असें म्हणतील कीं, लुगड्याचा पदर उर:स्थलावर मोकळा खेळूं दिल्यानें त्यास ज्या सुरकुत्या पडतात, त्यामुळें युरोपिअन स्त्रियांच्या वक्ष:स्थलांप्रमाणें आमच्या स्त्रियांचीं वक्ष:स्थलें उठून दिसत नाहींत, आणि हा या ढिल्या पदरापासून होणारा एक मोठा फायदा आहे; तसेंच, ज्या वेळेस स्त्रियांना आपले दोनही हात विशेष रीतीनें अव्यापृत ठेवण्याची गरज असते, त्या वेळेस त्या आपले पदर एका खांद्यावरून मागें नेऊन दुसऱ्या हाताखालून पुढें आणितात. आणि डाव्या बाजूस त्यांचें शेवट घट्ट खोंचून ठेवतात. यावर आमचें असें म्हणणें आहे कीं, कोणत्याही कारणानें स्त्रियांचीं वक्ष:स्थलें उठून दिसणें हा आमच्यांत मर्यादेचा गौण प्रकार मानिला असता तर कांडतांना, न्हाऊं घालतांना, मोठमोठ्या मेजवान्यांत वाढतांना किंवा अशाच प्रकारच्या इतर प्रसंगी आमच्या स्त्रियांची जी नीटनेटकी व ठाकठीक आकृति दिसते, ती आम्हांस कधींच रुचली नसती! तसेंच, मोठमोठ्या भारतीय कवींनीं आर्यमहिलांच्या उरोजविस्तारांची केलेलीं असंख्य वर्णनें आम्हीं मिटक्या मारीत कधींच वाचलीं नसतीं! तेव्हां या बाबतींत युरोपिअन लोकांत व आम्हांत रुच्यंतर नाहीं, हें उघड आहे. तथापि, स्त्रियांचे हे प्रांत अस्पष्ट असणें हेच उत्कृष्ट शिष्टसंप्रदायास उचित आहे असें मानिलें, तरी पदराच्या सुरकुत्यांचें घसरतें 'हाफजाकिट' बनविण्यापेक्षां, चोळी न घालतां किंवा घरच्या घरीं तयार केलेलें प्रत्यक्ष हाफजाकिट घालण्यास काय हरकत आहे? हीं हाफजाकिटें दोन प्रकारचीं असावीं, एक काम करतांना घालण्याचीं, व दुसरीं बाहेर जातांना घालण्याचीं. बाहेर जातांना घालावयाच्या जाकिटांच्या अस्तन्या बऱ्याच लांब असाव्या, आणि त्यांचा रंग बहुधा लुगड्यांच्या रंगासारखा असून, त्यांचीं शेवटें लुगड्यावर पडावीं. पण यासंबंधानें कदाचित् मतभेद होण्याचा संभव आहे! जाकिटें घालण्याचा प्रघात पडल्यावर, पदर काढण्याची मुळींच गरज पडणार नाहीं, व त्यामानानें लुगड्यांची लांबी कमी केली तरी हरकत नाहीं. लुगड्यांच्या पदरांवरील नकशीचें काम कमरेसभोंवतीं खुलेल अशा रीतीनें दाखवितां येणार आहे. खोटा देशाभिमान एकीकडे ठेऊन चोळीपदराच्या जागीं, किंवा चोळीच्या वरतीं ही जाकिट घालण्याची पद्धत पाडिली असतां अनेक फायदे होणार आहेत.

पदर सांवरण्याचें काम वारंवार हातांनीं न करावें लागल्यामुळें ते मोकळे राहून स्त्रियांच्या अंगीं कार्यक्षमता अधिक येईल; कमरेवरील त्यांचा कोणताही भाग उघडा पडण्याची भीति राहणार नाही; थंडीच्या दिवसांत चौघडीचें अवजड पांघरून घेण्यापेक्षां, फलाणीची बंडी घातल्यानें पाठीच्या व पोटाच्या हाडांतील ऊब सहज राखतां येणार आहे. लुगड्याच्या पदरापेक्षां जाकिटावर हरतऱ्हेच्या नकशीचें काम करून, तें सुलभ रीतीनें दाखवितां येणार आहे. पण या सर्वांहून मोठा फायदा हा आहे कीं, बायकांच्या गळ्यांतले एकूणएक दागिने पटवेकऱ्यांच्या कसबासकट मागेंपुढें सबंध दाखवितां येऊन, दुसऱ्यांनीं आपणांस श्रीमंत म्हणावें, आणि आपलें स्वरूप खुलून दिसावें, हा जो दागिने घालण्याचा मुख्य उद्देश; तो पूर्णपणें सफल होईल! सध्यांच्या पदरामुळें आमच्या बायकांच्या गळ्यांतील दागिन्यांचा जेवढा भाग उजवा खांदा आणि मान यांच्या दरम्यान दिसतो, तेवढ्यांतच आम्हांस आपले समाधान करून घ्यावें लागतें! पण यापुढें जाकिटें घालण्याचा प्रचार पडल्यास, टिका, ठुशा, सरी पुतळ्यांच्या माळा, कंठा, तन्मणी, पेट्या, चंद्रहार वगैरे अलंकारांनीं आमच्या प्रियकरणींची वक्ष:स्थलें मंडित होऊन आतांपेक्षां शेंकडोंपट आल्हादजनक होतील, यांत काय संशय आहे? तसेंच खुद्द जाकिटेंही ताप्त्याची, मखमालीची, किंवा अशाच एखाद्या उंची कपड्याची करून, त्यांच्या अस्तन्यांवर व पुढील भागावर जरीच्या किंवा रेशमाच्या वेलबुट्टीचें कारागिरीचें काम केलें तर त्यानें दागिन्यांची शोभा दुणावेल, किंवा त्यांच्या अभावीं तेंच काम अत्यंत शोभादायक होईल! बोलून चालून नटण्याचें काम सर्व लोकांनीं स्त्रियांकडे सोपविलें आहे. तेव्हां जोंपर्यंत हें त्यांना व आम्हांस संमत असेल तोंपर्यंत त्यांचें लावण्य जितक्या थोड्या खर्चांत त्यांना जितकें अधिक सुखावह व आमच्या दृष्टीस जितकें अधिक रमणीय होईल, तितकें करणें हेंच आमच्या प्रबुद्धत्वास उचित आहे. यावरून कोणीं असें समजूं नये कीं, मडमांचा पोषाख आम्हांस मान्य आहे, व त्याचें अनुकरण आमच्या स्त्रियांनीं करावें, असें आम्ही सुचवीत आहों. मडमांच्या पेहरावाचा बराच भाग, विशेषत: त्यांचा झगा आम्हांस बिलकुल पसंत नाहीं. तथापि त्यासंबंधानें व आमच्या स्त्रियांच्या पोषाखाच्या इतर भागांच्या संबंधानें आजच लिहिण्याचें प्रयोजन नाहीं.

*

# आमच्या स्त्रियांचा पेहराव

## नंबर २

मागल्या लेखांत आमच्या स्त्रियांच्या पदराविषयीं चर्चा करून तो आम्ही नापसंत ठरविला आहे, व त्याचे जागीं जाकिट घालण्याचा प्रघात पडेल तर फार बरें होईल, अशी इच्छा प्रदर्शित केली आहे, हें वाचकांच्या स्मरणांत असेलच. आतां आमच्या स्त्रियांच्या पोषाखाच्या इतर भागांविषयीं विचार करून, सवड असल्यास दागिन्यांचाही थोडा विचार करावयाचा, असा इरादा आहे.

पदर लुगड्याचा काढतात; तेव्हां पदरानंतर स्वाभाविकपणें लुगड्याचा विचार करणें जरूर आहे. हें आमचें लुगडें आम्हांस पूर्ण संमत आहे. याच्या जागीं लहंगा, परकर, झगा किंवा दुसरें कोणतेंही अधोवस्त्र वापरण्याचा प्रघात पडावा, असें आम्हांस वाटत नाहीं. हें आमचें लुगडें दिसण्यास व शोभेस जितकें चांगलें असावें, तितकें आहे. शिवाय, त्यापासून दुसरा असा एक फायदा आहे कीं, हें नेसण्यास मुळींच पंचाईत पडत नाहीं. एक लुगडें सोडून दुसरें लुगडें नेसणें ही गोष्ट आमच्या स्त्रियांस शरीराचा कोणताही भाग उघडा पडूं न देतां पाहिजे तेथें करतां येण्यासारखी आहे. झग्याची व इतर अधोवस्त्रांची तशी गोष्ट नाहीं. तसलीं वस्त्रें वापरण्यास स्त्रियांना एकांतस्थलीं जावें लागतें. झगे वापरणाऱ्या स्त्रियांस आमच्या स्त्रियांप्रमाणें नदीच्या काठी, लग्नमंडपांत किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांच्या समक्ष वस्त्रांतर करतां येत नाहीं; कोणताही पोषाख असा असावा कीं, तो वापरणाराच्या ताब्यांत असावा; वापरणाराला त्याचें गुलामपण काढण्यास न लागावें. या दृष्टीनें युरोपियन स्त्रियांच्या झग्याहून गैरसोईचें वस्त्र शोधून काढूं म्हटल्यास सांपडावयाचें नाहीं. आमच्या कलावंतिणींचे झगे किंवा मारवाडणींचे लहंगे याच धर्तीचे आहेत; पण ते त्यांपेक्षां पुष्कळ बरे. युरोपीय स्त्रियांच्या झग्यांस फाजील कापड लागून हिंडण्याफिरण्यास त्यांना मोठा त्रास पडतो. थोडेसें झपाट्यानें चालावयाचें म्हटलें, किंवा ज्या जमिनीवरून चालावयाचें ती साफ नसली कीं, हे झगे एका हातानें किंवा दोन हातांनीं वर सांवरून धरावे लागतात! जों जों श्रीमंती अधिक तों तों या झग्याचा विस्तार

मोठा! साऱ्या मडमा आपापले झगे वर उचलून न धरतां जमिनीवर पडूं देतील, तर घरांत व रस्त्यांवर केरसुण्यांचें काम फारसें पडणार नाहीं. ज्याप्रमाणें हिंदुस्थानांतील बहुतेक खेड्यांतल्या भंग्यांचें काम कुत्रीं करतात, त्याप्रमाणें युरोप खंडांतल्या झाडूंचें काम या झग्यांच्या फरपटण्यानें होऊं लागेल! शिवाय, एक झगेवाली स्त्री यथास्थितपणें बसावयाची म्हणजे तिला किती तरी जागा लागते! पुरुष हा उद्धट प्राणी आहे, तेव्हां त्याला होईल तितक्या दूर अंतरावर ठेवावें, अशा बुद्धीनें तर पाश्चिमात्य स्त्रियांनीं या लहानशा कापडी कोटांत आपणांस कोंडून घेण्याचा प्रघात पाडला नसेल ना? एकंदरींत स्त्रियांनीं इतकी जागा अडवावी, हें आम्हांस बरें दिसत नाहीं. परंतु युरोपिअन लोक आम्हांहून स्त्रियांस विशेष मान देणारे व भजणारे आहेत; तेव्हां कदाचित् त्यांनीं जाणूनबुजून त्यांचा या कामांत वरचष्मा होऊं दिला असेल! किंवा बाहेरून दिसण्यांत ''आम्ही तुम्हांस अधिक जागा व्यापूं देतों; म्हणून स्वत:पेक्षां आमचें तुम्हांवर विशेष प्रेम आहे.'' असें त्यांस आमिष दाखवून सर्वकाळ त्या आपल्या ताब्यांत राहण्यासाठीं त्यांनीं, ही त्यांचें स्वातंत्र्य हरण करण्याची तर युक्ति काढली नसेल ना? आम्ही असें ऐकतों कीं, या झग्यांचा त्रास त्यांच्या विस्तारानेंच संपत नाहीं. त्यांच्या आंत चोळण्यासारखें किंवा चड्डीसारखें दुसरें एक वस्त्र वापरण्याची सभ्य स्त्रियांची चाल आहे. असें असले तर मग फारच त्रास! अशा स्त्रियांना वस्त्रांतर करतांना केवढा अट्टाहास करावा लागत असेल, याची वाचकांनींच कल्पना करावी. आणि येवढें कशासाठीं, तर कंबर बारीक दिसावी म्हणून! आमच्याप्रमाणें युरोपिअन लोकांतही सिंहकटीचें मोठें महत्त्व आहे. पण आम्ही ती दाखविण्यासाठीं विशेष खटपट करीत नाहीं. युरोपियन लोकांत जी जात्या मृदंगकटी असेल तिला देखील सिंहकटी दाखविण्याचे अनेक उपाय काढले आहेत, असें म्हणतात! कमरेखालीं झगे फुगविण्यासाठी व कमरेचा परिघ जेवढा लहान होईल तेवढा करण्यासाठीं, कमरेभोवती कित्येक स्त्रिया लोखंडाचा पट्टा करकचून आंवळतात, असें सांगतात! हें खरें असेल तर लोहबंधनामुळें कोठा आणि कूस यांच्यावर दाब पडून, अन्नपचन होण्यास व गर्भाचें संवर्धन होण्यास अडथळा होत असेल, व सुइणीच्या मदतीशिवाय प्रसूत होणें फार कठिण पडत असेल. खेरीज नेहमीं नेहमीं कंबर फारच आंवळली तर कुबड निघण्याचा संभव असतो, हें एक निराळेंच अरिष्ट! तसेंच या झगेदार बायकांस पुरुषांप्रमाणें किंवा आमच्या स्त्रियांप्रमाणें दोहोंकडे दोन पाय सोडून घोड्यावर बसतां येणें बहुतेक अशक्य असल्यामुळें, एकाच बाजूस दोनही पाय सोडून बसण्यासारखीं खोगरें तयार करणें त्या लोकांस भाग पडलें! या खोगरांस साइड सँडल्स असें म्हणतात. या खोगरावर बसण्यास

शिकणें म्हणजे एका प्रकारची बिकट कसरत करण्यास शिकण्यासारखेंच आहे! या प्रकारच्या आरोहणापासून घोडा व बसणारीण या उभयतांसही मोठा त्रास पडत असेल, असा आमचा तर्क आहे. खरें काय असेल तें त्या मडमांच्या व घोड्यांच्या जीवाला ठाऊक! एकंदरींत, हा झगा आमच्या स्त्रियांच्या बिलकुल कामाचा नाहीं, असें आम्हांस वाटतें. तसेंच, युरोपिअन स्त्रियांत जाकिटें घालण्याची चाल जरी रूढ आहे, तरी विशेष थाटाच्या प्रसंगी त्या ज्या प्रकारचीं जाकिटें वापरतात, तींही आम्हांस नको आहेत. ऐन थंडीच्या दिवसांत रात्रीच्या प्रसंगी उर:स्थलाचा बराच भाग व खांद्याखालचा हातांचा बराच भाग अनावृत्त ठेवण्यांत काय सुख किंवा मौज आहे, हें आम्हांस समजत नाहीं. या प्रचारामुळें थंडीच्या दिवसांत तिकडील स्त्रियांस मोठे क्लेश होतात, व कधींकधीं त्यांना त्यापासून शीतविकार जडतात, असें आम्ही ऐकतों. असें असून शेंकडों शतकें हा प्रघात तिकडे रूढ असेल तर 'बलवान लोकाचारा, तुला साष्टांग नमस्कार असो,'' याशिवाय दुसरें काय म्हणावें? तात्पर्य, युरोपखंडांतील लोकांनीं आपल्या स्त्रियांच्या पाठीमागें जो पोषाख लाविला आहे, त्यांत त्यांनीं त्यांच्या सुखाकडे किंवा सोईकडे न पाहतां, त्या आपल्या नजरेस खूप मौजेच्या कशा दिसतील येवढ्याच गोष्टीचा विचार केला असावा असें दिसतें. नाहीं तर इतका बोजड किंवा अवजड पेहराव ते कधींही मान्य न करते. सामान्यपणें आम्हीं आपल्या पाषाणाच्या देव्यांस ज्याप्रमाणें सजवितों, त्याप्रमाणें ते आपल्या स्त्रियांस सजवितात, असें वाटतें. गंगा, लक्ष्मी, अंबिका वगैरे देवतांच्या मूर्तीचे पोषाख बांधावयाचे आहेत असें आम्ही म्हणतों, व ते बांधण्यांत पदराचा झोळ, निऱ्यांची गर्दी, चापचोपी वगैरे गोष्टींकडे आम्ही जितकें लक्ष देतों, तितक्या या चालत्याबोलत्या मडमा आपल्या पेहरावाकडे देत असाव्या, आणि तसें करणें त्यांच्या पुरुषांच्या आग्रहामुळें त्यांस भाग पडत असावें, असें आमचें अनुमान आहे.

युरोपिअन स्त्रियांच्या पोषाखावर वास्तविक पाहतां येथें इतकी टीका करीत बसण्याची गरज नव्हती. पण अलीकडे ''आपलें तें सारें चांगलें'' असें प्रतिपादणाऱ्या कित्येक आग्रही व अविचारी लोकांनीं सत्यास पराङ्मुख होऊन, ''सुधारकमंडळीस जेवढें भारतीय तेवढें ओंगळ वाटतें, व जेवढें पाश्चात्य तेवढें अनुकरणीय वाटतें'' असा जो पुकारा रात्रंदिवस चालविला आहे, तो किती मिथ्या आहे, हें अनेक उदाहरणांपैकीं एका उदाहरणानें वाचकांच्या नजरेस आणण्यासाठीं आम्हीं हें यत्किंचित् विषयांतर करण्यास प्रवृत्त झालों. बाकी, युरोपिअन लोकांवर या टीकेचा कांहींएक परिणाम होण्याचा संभव नाहीं, हें आम्हीं पक्कें जाणून आहों. कारण, ज्या लोकांस जो पोषाख मानवलेला असतो, व ज्याच्याशी त्यांच्या

सुरेखपणाच्या कल्पना खिळून गेलेल्या असतात, ते दुसऱ्या लोकांच्या टीकांनीं त्यांत फेरबदल करण्यास कधींही राजी होत नाहींत. शिवाय, त्यांच्या पोषाखांत ज्या गैरसोई आहेत त्या त्यांच्यापैकींच कांहींच्या नजरेस येऊं लागल्या आहेत, व त्या आपल्या लोकांच्या नजरेस आणण्यास तिकडील टीकाकार हवे तितके खबरदार आहेत! त्यांना आमच्या मदतीची बिलकुल गरज नाहीं. तथापि येथें येवढें म्हटल्यावांचून राहवत नाहीं कीं, युरोपिअन स्त्रिया आपला झगा टाकून देऊन आमच्या स्त्रियांच्या लुगड्यासारखें एखादें वस्त्र वापरूं लागतील, तर त्यांचा पोषाख कमी खर्चाचा आणि कमी त्रासाचा होईल. इतकेंच नाहीं, तर सौंदर्य व सुख या कल्पनांत साऱ्या मनुष्यतेस पसंत पडेल असा कांहीं भाग असेल तर त्याकडे त्यांची थोड्याबहुत प्रमाणानें प्रवृत्ति झाली असें होऊन, इतर खंडांतील लोकांच्या, व कदाचित् युरोपखंडांतील लोकांच्याही दृष्टीस, त्या आतांहून रमणीय वाटूं लागण्याचा संभव आहे.

येथपर्यंत आमच्या स्त्रियांच्या चोळीलुगड्याचा विचार झाला; आणि हाच मुख्य महत्त्वाचा होता. आतां थोडा वेळ त्यांच्या डोक्याकडे आणि पायांकडे पाहूं म्हणजे झालें. आमच्या साहेबलोकांच्या मडमांप्रमाणें आमच्या बायकांच्या डोक्यांवर शिप्तरी टोप्या चढविण्याची कांहीएक गरज नाहीं. तथापि उन्हांत पावसांत, किंवा वाऱ्यांत जातांना त्यांच्या डोक्यास कांहींतरी शिरस्त्राण घालण्याची चाल पडेल, तर बरें होणार आहे. सध्यां पदराशिवाय दुसरें कांहींही असत नाहीं. फारच झाले तर पदरावर शालजोडी किंवा शेला घेण्यांत येतो. पण सर्वांचें पर्यवसान हात आडवून ठेवणें आणि सर्व शरीर एखाद्या उंच कापडाच्या पोत्यांत गुंडाळण्यासारखें करणें- अशावर होतें. हें कांही प्रशस्त नाहीं. बुरखा घेण्याचे दिवस गेले. ऊन व पाऊस यांपासून संरक्षण करण्याचा जो सामान्य उपाय तो आम्हीं स्त्रियांस करू देत नाहीं, ही मोठ्या शरमेची गोष्ट होय. आम्ही धट्ट्याकट्ट्या पुरुषांनीं काश्मिरी चोगे घालावे. बूटस्टॉकिंग्स चढवावे, कानास रुमाल गुंडाळावे किंवा पागोट्यावरून कानपट्ट्या बांधाव्या, सकलादीच्या टोप्या घ्याव्या, आणि या सर्वांच्यावर छत्र धरावें, आणि त्या बिचाऱ्या अबलांनीं भर पावसांत एखाद्या चौघडीनिशीं किंवा शालजोडीनिशीं अथवा नुसत्या पदरावरच रस्त्यानें अनवाणी भिजत जावें, ही आम्हांस मर्यादेची अमानुष कल्पना वाटते. उन्हांत व पावसांत स्त्रियांनीं छत्री वापरण्यास आम्हांस बिलकुल हरकत दिसत नाहीं. तसेंच त्यांस घरांतील स्वच्छ जमिनीशिवाय दुसऱ्या कोठेंही चालण्याची संवय नसल्यामुळें, उन्हानें तापलेल्या किंवा पाण्यानें किंवा थंडीनें गारठलेल्या जमिनीवरून चालतांना त्यांना पराकाष्ठेचे क्लेश होऊन, कधीं कधीं उष्णाचे आणि थंडीचे विकार होतात.

हे टाळण्यासाठीं सर्व स्त्रियांनीं घराबाहेर पडतांना जोडे वापरण्यास काय हरकत आहे, हें आम्हांस समजत नाहीं. तसेंच, मोठ्या थंडीत प्रवास करावयाचा असल्यास, त्यांनीं हातमोजे व पायमोजे घालण्यास आणि घोड्यावर बसावयाचें असल्यास किंवा लांबीची मजल मारावयाची असल्यास, मऊ कातड्याचे बूट घालण्यास आम्हीं त्यांस अडथळा कां करावा, हें सांगतां येणें फार कठिण आहे. पण **शास्त्रात् रूढिर्बलीयसी** या न्यायाचे आम्हीं सारे गुलाम होऊन गेलों आहों. लोकांच्या कानाशीं कटकट करतां करतां हिच्या शृंखला झुगारून देऊन, जो मार्ग सुखावह व सुगम असेल त्यानें जाण्याचें धैर्य ज्या दिवशीं आमच्या अंगीं येऊं लागेल; तो सुदिन म्हणावयाचा. कोणीं कांहीं केलें व म्हटलें तरी तो एकदां येणार आहे, याविषयीं आम्हांस शंका नाहीं. अविचाराच्या व दुराग्रहाच्या प्रत्यवायामुळें तो थोडासा दुरावणार आहे, येवढेंच काय तें!



# अलंकारमीमांसा

मनुष्यांच्या हातून ज्या अनेक असंबद्ध किंवा परस्परविरोधी गोष्टी होत असतात, त्यांतच अलंकारांचा समावेश करण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं. बोलण्यांत साधेपणाची तारीफ करीत नाहीं, असा कोण आहे? तथापि मौल्यवान वस्त्रें परिधान करून, व जेथल्या तेथें नानाप्रकारचे अलंकार चढवून ठुमकत जाणारी तरुण रमणी नेत्रपथांत आली असतां, ज्यानें अभिलाषपूर्वक तिजकडे पाहिलें नाहीं, किंवा पाहून ज्याचा अंतरात्मा क्षणभर आनंदित झाला नाहीं, असा कोण पुरुष आहे? दागिन्यांत कांहीं अर्थ नाहीं; दागिने घालण्यासाठीं नाकाला, ओठाला, कानाला भोंकें पाडणें हा रानटीपणा होय; दागिन्यामुळें चोरांपासून त्रास होतो; लहान मुलांच्या अंगावर सोनें घातल्यानें त्यांच्या जिवास अपाय घडतो; दागिन्यांत पैसे अडवून ठेवल्यानें देशांतील उत्पादक भांडवलापासून व्हावा तितका फायदा होत नाहीं- वगैरे पोकळ वेदांताच्या गप्पांत आम्हांस बिलकुल हांशील वाटत नाहीं. दागिने घालावयाचे नाहींत, चांगलीं वस्त्रें वापरावयाचीं नाहींत, सुग्रास अन्न खावयाचें नाहीं. सुरेख घरांत राहावयाचें नाहीं, तर करावयाचें तरी काय? सकाळपासून संध्याकाळपर्यंत जे कष्ट करावयाचे ते ओलीकोरडी भाकर, जाडाभरडा कपडा आणि थंडीवाऱ्याचें निवारण होण्यासारखें एखादें मजबूत खोपट, यासाठींच काय? यावर कोणी असें उत्तर देतील की, कोणतीही गोष्ट फाजील करूं नये. फाजीलपणापासून नुकसान आहे. पण यावर आमचें प्रत्युत्तर असें आहे कीं, या उपदेशाची विशेष गरज नाहीं. एखादा मनुष्य अत्यंत उपयोगी वस्तूंकडे दुर्लक्ष करून, अलंकारांकडे आपली सर्व प्राप्ती लावीत असला, म्हणून अलंकार घालण्याच्या पद्धतीवर चाल करून जाणें अगदीं अप्रशस्त आहे. सर्व ठिकाणचे रानटी लोक, सुधारलेल्या राष्ट्रांतील सर्व अज्ञान लोक, सुशिक्षित कुटुंबांतील स्त्रिया व मुलें - या साऱ्यांस अलंकारांची मोठी हौस असते, हें अल्प अवलोकनावरून दिसून येणार आहे. उतार वय झालेल्या कांहीं मोठमोठ्या व विचारी विद्वानांस मात्र प्रत्यक्ष आपल्या अंगावर अलंकार घालण्यांत मोठीशी हौस वाटत नाहीं. तेव्हां जी गोष्ट अनादिकालापासून सर्व प्रकारच्या, सर्व स्थितींतल्या व सर्व वयांच्या स्त्रीपुरुषांस कमी अधिक प्रमाणानें प्रिय होऊन बसली आहे, तींत

कांहीं तात्पर्य नाहीं, असें म्हणणें व तिच्यापासून जे क्वचित अनर्थ घडतात ते न घडण्यासाठीं ती अजिबात टाकून द्या, असा मंत्रोपदेश करीत सुटणें म्हणजे मनुष्यस्वभावाचें आणि मनुष्यसुधारणेचें पूर्ण अज्ञान प्रकट करण्यासारखें होय. कोणी काय पाहिजे ते म्हणो, अलंकारांची हौस समूळ नाहींशी होण्याचा संभव नाहीं. एका प्रकारचे अलंकार नाहींसें केलें तर दुसऱ्या प्रकारचे अस्तित्वांत येतील. उच्च धातू वापरण्याचा प्रघात कमी झाल्यास लत्ताकपड्यावर अधिक खर्च होऊं लागेल; व दोहोंच्याही फेऱ्यांतून सुटलों तरी घरांवर, घोड्यांवर, नोकरांवर, किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या कोणत्या तरी ताब्यांतल्या वस्तूंवर अलंकार व वस्त्रें चढवून त्या आपल्या सभोंवतीं ठेवण्यांत व त्यांकडे पाहण्यांत मनुष्यांना आनंद वाटत राहील.

ज्याच्या योगानें वस्तूचें रूप विशेष खुलल्यासारखें वाटतें, त्यास आपण अलंकार असें म्हणतों. या व्याख्येप्रमाणें शोभा देणाऱ्या प्रत्येक वस्तूची अलंकारांतच गणना केली पाहिजे. पण प्रस्तुत लेखांत अलंकारांची थोडी मर्यादित व्याख्या करणें जरूर आहे; नाहीं तर विषयप्रतिपादनाची मोठी पंचाईत पडेल. मूळचें स्वरूप अधिक चांगलें दिसण्यासाठीं मौल्यवान् धातूंच्या व पाषाणांच्या ज्या नानातऱ्हेच्या चिजा स्त्रीपुरुषें अंगावर घालतात, त्यांसच येथें अलंकार असें समजून त्याविषयीं थोडी चर्चा करूं.

अलंकारांपासून स्वाभाविक सौंदर्याच्या मोहकपणांत भर पडते, असा सर्वांचा अनुभव आहे. कित्येक पाश्चिमात्य व पौर्वात्य कवींनीं नग्नसौंदर्याची मोठी प्रशंसा केली आहे. पण सध्यां आमचीं जीं मनें आहेत त्यांनीं वस्त्ररहित आणि अलंकाररहित अशा अत्यंत लावण्यवती स्त्रीचें किंवा सुंदर पुरुषाचें रूप डोळ्यापुढें आणण्याचा प्रयत्न केला, तर त्यांना तें रूप हिडिस वाटतें! ''नष्टनंदनवनांतील'' लतामंडपांतल्या पुष्पशय्येवर विलास करतांना, मनुष्यांच्या आद्यमातेस आपल्या पतीचें नग्नसौंदर्य पाहून काय वाटलें असेल तें असो, किंवा मनुष्यांच्या आद्य पूर्वजास आपल्याच हाडामांसापासून निर्माण केलेल्या नग्न रमणीस दृढालिंगन देतांना काय आनंद झाला असेल तो असो; आतांच्या मनास नग्न स्त्री-पुरुषांची कल्पना ओंगळ वाटते, आणि नग्नसौंदर्याच्या मनोहारित्त्वाविषयीं कोणी केवढ्याही थापा मारल्या, तरी ॲडॅम ईव्ह यांचें अनुकरण करण्यास अर्वाचीन माणसें कधींही तयार होणार नाहींत. अलंकारांविषयीं लोकांचीं मतें स्थिर नाहींत व सारखीं नाहींत, हें कबूल आहे. देशकालाप्रमाणें त्यांत फरक असतो व होत जातो. तिसऱ्या किंवा चौथ्या शतकांतील दागिन्यांत आणि आतांच्या दागिन्यांत बराच बदल झाला असला पाहिजे; तसेंच, कोणत्याही दोन राष्ट्रांतील लोकांच्या दागिन्यांत फारच

थोडें साम्य असतें, हें कोणास सांगावयाला पाहिजे, असें नाहीं. पण जेथें दागिन्यांची बिलकुल हौस नाहीं, असें एक देखील राष्ट्र मिळावयाचें नाहीं. आपण दुसऱ्याला प्रिय व्हावें, अशी मनुष्याच्या मनाची स्वाभाविक प्रवृत्ति आहे. पण ह्या प्रवृत्तीचें विशेष प्रदर्शन स्त्रीपुरुषांकडून एकमेकांस प्रिय होण्यासाठीं चालविलेल्या वर्तनांत दिसून येतें. सौंदर्याला सर्वत्रच मान आहे. पण पुरुषांच्या सौंदर्याला स्त्रियांत आणि स्त्रियांच्या सौंदर्याला पुरुषांत विशेष मान असल्यामुळें; त्या सौंदर्याला खुलवणारे अलंकार वापरण्याची इच्छा उभयतांतही स्वभावसिद्ध होऊन बसल्यासारखी झाली आहे. दागिन्यांमुळें स्वाभाविक सौंदर्यात खरोखरीच भर पडेनाशी होईल, निदान पडत नाहीं असें वाटूं लागेल, तेव्हांच हा मनुष्यास लागलेला दागिन्यांचा नाद सुटण्याचा संभव आहे. मोठ्या प्रयासानें हा थोडासा कमी अधिक करतां येईल, पण जोंपर्यंत स्त्रीपुरुषें एकमेकांस प्रिय होण्याचा प्रयत्न करीत असतील, तोंपर्यंत दागिन्यांचा थोडाबहुत नाद सर्वत्र दृष्टीस पडल्यावांचून राहणार नाहीं.

दागिन्यांवर मनुष्यांचें इतकें प्रेम बसण्याचें दुसरें एक कारण असें आहे कीं, त्यांमुळें आपण श्रीमंत आहों, असें इतरांस सहज रीतीनें दाखवितां येतें. दहापांच हजारांच्या नोटा आंगरख्यावर किंवा लुगड्यावर चिकटवल्या तर तो हेतु सिद्धीस जाणार आहे, हें खरें आहे. पण तसें केल्यानें सौंदर्यांत भर न पडतां, तें उलट विद्रूप दिसण्याचा संभव आहे. तेव्हां सौंदर्याला मदत होऊन पुन: श्रीमंती दाखवितां येण्यास अलंकार घालण्यासारखें दुसरें साधन नाहीं. शिवाय, एकदा दागिन्यांचा पक्का नाद लागला म्हणजे काटकसर करण्याची सवय लागते, आणि तीमुळें दुर्व्यसनांत किंवा दुसऱ्या कोणत्याही वाईट गोष्टीकडे खर्च करण्याची इच्छा होत नाहीं, हा आणखी एक फायदा आहे. तसेंच, एखादा प्रसंग गुदरला असतां दागिने जसें उपयोगी पडतात, तसें दुसरें कांहीं एक उपयोगास येण्याचा संभव नाहीं. व्यापारांत घातलेला पैसा पाहिजे तेव्हां हातीं येऊं शकत नाहीं; इतकेंच नाहीं, तर बुडण्याची भीति असून, त्याचे योगानें रूपाला मोहकता आणण्यास काहींच साहाय्य मिळत नाहीं. ब्यांकेतला पैसा पाहिजे तेव्हां हाती येण्यासारखा असतो, पण ठुशीच्या जागीं कां 'ब्यांकबुक'' घालतां येणार आहे? तात्पर्य, दागिने ही एक प्रकारची अत्युत्तम ठेव आहे. ह्या ठेवीपासून सौंदर्यवृद्धि होत असून खेरीज अनेक फायदे होतात. म्हणून दागिने वापरण्याची हौस मनुष्यांतून सहसा जाण्याचा संभव नाहीं, हें सिद्ध आहे.

कोणी असें म्हणतात कीं, दागिन्यांत पैसा घालण्यापेक्षां तो वस्त्रप्रावरणांत खर्चणें विशेष इष्ट आहे; कारण कापड दागिन्यापेक्षां विशेष उपयोगाचें व सुखाचें आहे. पण यास एक असें उत्तर आहे कीं, शीतकटिबंधांतले लोक अवश्यकतेमुळें

आपल्या पैशांचा चूर पेहरावांत करतात, म्हणून आम्हीं उष्ण कटिबंधांतील लोकांनींही तसेंच करीत सुटावें; हें योग्य नाहीं अवश्य असेल तेवढा पैसा कपड्यांत खर्च करण्यास आमची हरकत नाहीं. पण अवश्यकतेबाहेर जितका पैसा वाचेल तितका सारा कपड्यांपेक्षां असंख्यपट अधिक टिकाऊ आणि उपयोगी अशा अलंकारांत खर्चणें हेंच प्रशस्त आहे. यावर कोणी असें म्हणतात कीं, कपड्यावर केलेल्या खर्चानें दागिन्यांवर केलेल्या खर्चापेक्षां व्यापारास अधिक उत्तेजन मिळते. पण आमच्या मतें ही विचारसरणी चुकीची आहे. कापडखरेदी केल्यानें कोष्ट्यांस व शेतकऱ्यांस उत्तेजन मिळतें; दागिने करविल्यानें खाणींतून मौल्यवान् धातू काढणारांच्या आणि सोनारांच्या धंद्यास आश्रय देण्यांत येतो! तेव्हां दागिने घाला किंवा उंची लत्ता कपडा वापरा, कोणत्या तरी व्यापारास उत्तेजन हें मिळतेंच! पण कपड्यांत पैसा, उधळून बसण्यापेक्षां तो दागिन्यांत वेंचण्यांत विशेष फायदा आहे. तो असा कीं, कपडा दागिन्यांइतका टिकाऊ नसल्यामुळें त्यांतील पैशाचा व्यय लौकर होतो व दागिन्यांतील पैसा फार दिवस टिकतो. वस्त्र जुनें झालें म्हणजे त्यांपैकीं कांहींच हातीं लागत नाहीं; जुन्या दागिन्यांपासून रुपयाचे आठ आणे तरी मिळतात! तेव्हा वस्त्रावर फार खर्च न करितां तो दागिन्यांत करणें विशेष प्रशस्त आहे, हें सहज लक्षांत येणार आहे.

दागिन्यांमुळें चोऱ्या व खून होतात म्हणून दागिने घालूं नये, असें म्हणणें म्हणजे आगगाड्या व आगबोटी यांस अपघात होऊन प्राणहानि होते, म्हणून प्रवासाच्या कामीं त्यांचा कधीं उपयोग करूं नये, असें प्रतिपादण्यासारखेंच होय. लोकांच्या दृष्टीस पडणार नाहीं, चोरतां येणार नाहीं, व कोणत्याही अपघातानें नष्ट होणार नाही, अशा रीतीनें संपत्तीचें रक्षण करणें बहुधा अशक्य आहे. सर्व पैसा व्यापारांत किंवा जमिनींत घालून बसून, आयत्या वेळेस त्याची गरज लागली तर कोणाच्या तोंडाकडें पहावें? व्यापारांत तोटा आला किंवा शेत पिकलें नाहीं म्हणजे जें नुकसान होतें तें चोरीच्या नुकसानापासून फारसें निराळें नाहीं, असें वाटतें. शिवाय, ज्या घरीं व ज्या माणसाच्या अंगावर कांहीं माया असेल त्यावर उड्या पडण्याचा संभव आहे, हें जरी खरें आहे, तरी लोकांची गरिबी, अज्ञान, व स्वाभाविक दुर्गुणप्रवृत्ति या गोष्टीही चोऱ्या व खून या अरिष्टांस कांहीं कमी कारण नाहींत. लोक दरिद्री नसतील व सुशिक्षित आणि सद्गुणी असतील, आणि पोलिसाचा बंदोबस्तही चांगला असेल, तर सुदाम्याच्या घराप्रमाणेंच कुबेराचें घर व शरीर कां सुरक्षित असूं नये, हें सांगतां येणार नाहीं. ऐषआरामाच्या वस्तूंत दागिन्यांचा समावेश होतो. जेथें राष्ट्र आहे तेथें थोडाबहुत ऐषआराम असलाच पाहिजे. देशकालानुरोधानें या ऐषआरामाची तऱ्हा निराळी असेल; पण जेथें मुळींच

ऐषआराम नाहीं, असें राष्ट्र सांपडावयाचें नाहीं. आम्ही हिंदु लोक दागि
म्हणजे एका प्रकारच्या ऐषआरामांत थोडाबहुत पैसा खर्च करतों, हें खरें
पण हा खर्च प्राप्तीच्या मानानें इतर लोकांच्या ऐषआरामाकडे होत असे
खर्चाहून फार कमी असून, प्रसंग पडेल त्या वेळेस या खर्चाच्या बऱ्याच भा
पैसा करतां येतो, हा यांत एक विशेष फायदा आहे, असें प्रसिद्ध दा
नवरोजी यांनीं आपल्या एका निबंधांत सिद्ध करून दाखविलें आहे. "का
सोनें बांधून काशीपासून रामेश्वरपर्यंत सुरक्षितपणें प्रवास करतां येण्यासा
पोलिसाचा बंदोबस्त सरकार ठेवील, तर चोऱ्यांच्या आणि खुनांच्या हरक
दागिने वापरूं नयेत, असें म्हणता येणार नाहीं, हें उघड आहे.

तथापि, या वादग्रस्त विषयाच्या संबंधानें आम्ही थोड्याबहुत स
येण्यास, म्हणजे आमच्या प्रतिपक्ष्यांस रुचेल तर त्यांशीं तह करण्यास,
आहों. कारण, कांहीं म्हटलें तरी जनसमूहास एकाएकीं सुशिक्षित, सुच
निर्लोभी करणें जितकें अशक्य आहे, तितकेच 'काठीला बांधलेल्या सो
कोणीं हात लाऊं नये असा बंदोबस्त होणेंही अशक्य आहे. तेव्हां दागिन्या
होणारा फायदा तेवढा साधून नुकसान टाळतां येईल अशा युक्ती कोणी सुच
तर ती स्वीकारण्यास लोकांनीं एका पायावर उभें असलें पाहिजे. ही युक्ति
सोपी आहे. **'खरे दागिने न घालतां खोटे दागिने घालावे म्हणजे झा**
असें केलें असतां, श्रीमंतापासून गरीबापर्यंत पाहिजे त्याला दागिन्यांपासून सौं
होणाऱ्या मदतीचा फायदा घेतां येऊन, शिवाय आपापल्या मगुदरा
लत्ताकपड्यावर अधिक खर्च करण्यास सवड सांपडेल इतकेंच नाहीं, तर देश
बरेंच धन दागिन्यांत अडकून पडल्यामुळें त्याचें नुकसान होत आहे असें
म्हणणें आहे, त्यांची ही दागिने वापरण्यास असलेली बहुतेक हरकत दूर
येणार आहे! एकदां हा खोटे दागिने घालण्याचा प्रघात रूढ झाला,
त्यांसाठीं घरें फोडण्यांत कांहीं अर्थ नाहीं; हें चोरलोकांस समजून येईल,
मारवाड्यासारखे द्रव्यलोलुप लोक लहान मुलांचे खून करण्यास प्रवृत्त
नाहींत! यावर कोणी असा आक्षेप घेतील कीं, लहानथोरांच्या बायका सार
श्रीमंत दिसूं लागल्या, तर धनाढ्यांनीं आपली श्रीमंती कशी दाखवावी?
दागिने घातल्यानें सौंदर्यास होणारें साहाय्य साधेल खरें, पण श्रीमंती दाखवि
व ती दाखविल्यापासून मनास होणाऱ्या आनंदाचा लाभ खोट्या दागिन्य
कसा करून घेतां येईल? या प्रश्नास आमचें प्रत्युत्तर येवढेंच आहे कीं, अलंक
देह अलंकृत करणें हा त्यांचा आद्य उपयोग आहे. त्यांपासून होणारीं इतर
केवळ आनुषंगिक आहेत. तेव्हां त्यांचेकडून मुख्य काम करून घेऊन, बा

कामें साधण्यास दुसऱ्या तोडी काढाव्या, हें योग्य आहे. श्रीमंतांनीं पाहिजे तर आपल्या लत्त्याकपड्यानें आपली श्रीमंती दाखवावी, अथवा लोंकर व कापूस आणि यंत्रें यांच्या समृद्धीमुळें श्रीमंती दाखविण्याचें तें द्वारही बंद झालें असेल तर त्या लोकांनीं आपल्या कपाळावर "आमच्यापाशीं इतकी माया आहे", अशा अर्थाचीं अक्षरें गोंदून घ्यावीं, किंवा त्यांना सुचेल तसला दुसरा एखादा उपाय काढावा, अथवा जबाबदारी पतकरून खरे दागिने वापरीत राहावे! मात्र तसें करतांना इतकें ध्यानांत ठेवावें कीं, दिसण्यांत खऱ्या व खोट्या दागिन्यांत म्हणण्यासारखा फरक दिसत नाहीं, इतकेंच नाहीं, तर सौंदर्याची उठावणी करण्यांतही दोहोंचा सारखाच उपयोग असल्यामुळें, गरीबांच्या बायका श्रीमंतांच्या बायकांप्रमाणें कसले बसले सारे दागिने वापरूं लागल्या, म्हणजे श्रीमंतांच्या बायकांच्या अंगावर असलेल्या खऱ्या दागिन्यांपासून त्यांस म्हणण्यासारखा कोणताही फायदा होणार नाहीं! असो; पुढें एखादे प्रसंगी हाच विषय पुनः हातीं घेऊन, आपल्या दागिन्यांपैकी त्याज्य व रक्ष्य किती आहेत या मुद्याचा आणखी कांहींसा विचार करूं.



# म्हणण्यासारखा उपयोग नाहीं

हव्या तेवढ्या वयाच्या वराशीं हव्या तितक्या लहान वयाच्या वधूचा विवाह करावा, व मग त्या घोडनवऱ्यानें उतावीळ होऊन आपल्या ऋतु प्राप्त न झालेल्या भार्येशीं राक्षसी विलास करून, तिच्या प्राणांचा किंवा प्रकृतीचा आणि आपल्या लौकिकाचा होम करावा, आणि त्यामुळें लोकांचीं मनें उदास होऊन त्यांना अगदीं लहानपणीं लग्नें करणें बरोबर नाहीं, असें वाटूं लागावें; पण तीं एकाएकीं बंद करण्याची छाती होत नसल्यामुळें तीं तशींच कायम ठेऊन, त्यापासून होणारे घोर परिणाम न घडूं देण्याबद्दल प्रथम बारीकसारीक कायदेशीर प्रतिबंध करीत रहावे-असा या प्रश्नाचा सार्वत्रिक इतिहास असेल, व याहून दुसऱ्या कोणत्याही पद्धतीनें ही बालविवाहाची दुष्ट चाल नाहींशी करणें शक्य नसेल, तर कित्येक सामाजिक सुधारकांनी संमति वयाची इयत्ता वाढविण्यासाठीं हिंदुस्थान सरकारास अर्ज करण्याचा जो विचार केला आहे, तो केवळ वावगा आहे, असें म्हणतां येणार नाहीं. ''बारा वर्षांच्या आंत आपण आपल्या बायकोशीं समागम केला, आणि त्यापासून भयंकर परिणाम होऊन तो जगापुढें आला, तर आपणांस असंमत उपभोगास सांगितलेली शिक्षा भोगावी लागेल; करतां आपण त्या समागमसुखाविषयीं उत्कंठ होऊं नये'' असा परिणाम जितक्या घोडनवऱ्यांच्या मनांवर होईल, तितक्या मानानें संमतिवय वाढविल्यापासून फायदा होणार आहे, यांत बिलकुल संशय नाहीं. पण हें मान पराकाष्ठेचें क्षुल्लक आहे. येवढ्यासाठींच कायदा करण्याची मोठीशी आवश्यकता नाहीं. यावर कोणाचा असा आक्षेप येईल कीं, संमतिवयाचें प्रमाण दहापासून बारा केल्यानें असंमत उपभोगांचा म्हणण्यासारखा प्रतिबंध होण्याचा संभव नाहीं. हें जरी खरें आहे, तरी जे उतावीळ नवरे हा गुन्हा करतील, त्यांना दोन वर्षांहून अधिक शिक्षा ठोठावण्याचा न्यायाधीशास अधिकार असणें जरूर आहे. कामवासना अनावर होऊन वयाचा व प्रकृतीचा मगदूर न पहातां, अल्प वयाच्या मुग्ध कन्येवर बलात्कार करून तिच्या शरीराची, अब्रूची, आणि प्राणांची दुर्दशा करणाऱ्या मनुष्याचा अपराध फार मोठा आहे, व अशा मोठ्या अपराधास मोठी शिक्षा असणें हें योग्य आहे. यावर आमचें प्रत्युत्तर असें आहे कीं, कोणत्याही अपकृत्यास जी शिक्षा ठरवायची

ती त्यापासून होणाऱ्या परिणामांच्या अनुरोधानेंच नेहमीं ठरवितां येत नाहीं. ज्याच्या हातून तें अपकृत्य घडलें त्याचा हेतु कसा होता, हें पाहणें अनेक प्रसंगीं अवश्य असतें. असें समजा कीं, एखाद्या अचरट मनुष्यानें घरांतल्या घरांत पिस्तुलानें गोळी घालण्याचा नेम शिकण्याचा विचार करून, आपल्या परमप्रिय बायकोशी लडिवाळपणाने खेळत असलेल्या घराच्या भाटीवर कांहीं छर्रे सोडले, आणि ते त्या प्रियकरणीस लागून तिचा अंत झाला, तर अशा भावी गोलंदाजास बायकोचा खून केल्याबद्दल फांशीं देणें बरोबर होईल काय? अर्थात् नाहीं.त्याप्रमाणेंच जो घोडनवरा वयांत न आलेल्या आपल्या बायकोशीं राक्षसीं वर्तन करतो, तो तिचा प्राण जावा किंवा तिच्या शरीरास आमरण दु:सह व्यथा जडावी, अशा बुद्धीनें तें करीत नाहीं. ज्याप्रमाणें दारूनें झिंगलेला मनुष्य पाहिजें तें करीत सुटतो त्याप्रमाणें उत्कट कामवासनेनें बेफाम होऊन गेलेला मनुष्य तसें कर्म करण्यास प्रवृत्त होतो. बायको मरावी असा त्याचा हेतु मुळींच नसतो; कसेंही करून आपली वासना तृप्त करावी, येवढाच त्याचा विचार असतो. सबब, अशा अपराधाबद्दल पराकाष्ठेच्या वाईट अविचाराच्या कृत्यास जी शिक्षा सांगितली असेल, तीच देणें योग्य आहे. पंचवीस तीस वर्षांच्या दांडग्या मनुष्याच्या ताब्यांत आठदहा वर्षांची पोर बायको म्हणून द्यावयाची, आणि त्यानें अविचाराचा प्रकार केला म्हणजे, त्याच्या पाठीमागें दहाबारा वर्षांचा कारागृहवास किंवा काळें पाणी लावायचें, हें फारच शहाणपणाचें कृत्य होय! वास्तविक पाहतां, अशा रीतीनें मुलींचा विक्रय करणाऱ्या आईबापांस किंवा पालकास आणि विकत घेणाऱ्या सासूसासऱ्यास किंवा नवऱ्यास चांगलासा दंड करणें न्याय्य आहे! आठनऊ वर्षांच्या मुली पंचेचाळीस वर्षांच्या घोड्यांना अगोदर देतां कां? आणि मग रडत बसतां कां? बारा वर्षांच्या करूनच कां देत नाहीं?

यासंबंधाने हिंदुस्थान सरकारास पाठविण्यासाठीं जें पत्र तयार झालें आहे, त्याचा मसुदा आमच्या पाहण्यांत आला आहे. या मसुद्यांत संमतिवय वाढविणें इष्ट आहे, असें सिद्ध करण्यासाठी जितकी कुशलता दाखविणें शक्य होतें; तितकी दाखविली आहे, व आजमितीस दहांच्या जागीं बारा वर्षे केली असतां लोकमतावर चांगला परिणाम होऊन, चौदाव्या वर्षापर्यंत नवऱ्याने आपल्या बायकोकडे जाऊं नये, असा प्रतिबंध करून घेण्यास त्यांच्या मनाची हळूंहळूं तयारी होणार आहे, वगैरे गोष्टींचा यांत मोठ्या चातुर्यानें जातां जातां उल्लेख केला आहे. परंतु प्रश्नांतील वादाचें जे मुख्य स्थल त्यांत प्रवेश न करतां, त्याच्या सभोंवतालच्या अवांतर गोष्टींची मुद्देसूद व सप्रमाण चर्चा करून त्या दूष्य ठरविल्यानें, हिंदुस्थान सरकारास किंवा इतरांस असला कायदा करणें जरूर आहे,

असें वाटण्याचा विशेष संभव नाहीं. बारा वर्षांच्या आंतील मुलीचा किंवा कोणत्याही वयाच्या मुलीचा; नवऱ्यानें केलेल्या जुलमाच्या संभोगानें उपहास होऊं नये, ही गोष्ट जितकी कायदा मागणाऱ्या लोकांस इष्ट आहे; तितकीच ती न मागणाऱ्यांस, किंवा त्यापासून फायदा होणार नाहीं, असे म्हणणाऱ्यांस इष्ट आहे. तेव्हां जेणेंकरून कामांध नवऱ्यास आपल्या बायकोची अशा तऱ्हेनें विटंबना करतां येणार नाहीं, अशी कांहीं तोड निघाल्यांस ती सर्व पक्षांस मान्य होईल, असें वाटतें.सरकारनें प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें आमच्या धर्मांतर्गत विवाहपद्धतींत एक दोन महत्त्वाचे कायदे करून हात घातला आहे, म्हणून या बाबतींतही तसें करण्यास कांहीं हरकत नाहीं, असें म्हणून सरकारचें किंवा या भावी कायद्याच्या प्रतिपक्ष्यांचें समाधान होणार नाहीं. सती जाऊं न देणें, गतभर्तृकांनीं, पुनर्विवाह केला असतां त्यामुळें त्यांचें किंवा त्यांच्या संततीचें कोणत्याही प्रकारचें नुकसान न होऊं देणें, धर्मांतरामुळें वडिलोपार्जित संपत्तीचा योग्य वांटा मिळण्यास हरकत न होणें, वगैरे गोष्टी सरकारास बऱ्या वाटत होत्या, व म्हणून त्यांनीं लोकमताकडे विशेष लक्ष न देतां, त्यासंबंधाने तेव्हांच कायदे केले. संमतिवयाच्या संबंधानें त्यांना जेवढा निर्बंध उचित व अवश्य वाटला, तेवढा त्यांनीं आमच्या अभिप्रायाची विशेष पर्वा न करतां केव्हांच घालून टाकला. पारशांनीं व खोजांनीं अमुक कायदा आम्हांस करून द्या, असें बहुमतानें विचारल्यावरून त्यांना तो करून देण्यात आला, यांतही कांहीं नवल नाहीं. या सर्व उदाहरणांवरून संमतीचें वय सध्यांप्रमाणें दहा न राहूं देता बारा करावें, या म्हणण्यास विशेष आधार मिळत नाहीं. आजची मागणी लोकांकडून सरकारकडे जात आहे, व तीही साऱ्या किंवा बहुतेक लोकांकडून जात आहे, असें नाहीं. तसेंच, हा फेरफार केल्यानें म्हणण्यासारखा फायदा होण्याचाही संभव नाहीं. फार झालें, तर ज्या वेळी असंमत उपभोगाचा एखादा खटला कोर्टापुढें येईल; तेव्हां अपराध्यास आतापेक्षां अधिक कडक शिक्षा देतां येईल येवढेंच कायतें. या फेरफारापासून अपराधप्रवृत्ति कमी होऊं शकत नाहीं, व ती होणें हा तर कायदे करण्याचा मुख्य हेतु असतो. दुसऱ्या बाबींत मुलीचें वय बारा किंवा चौदा वर्षांचें असल्याखेरीज ती कायद्यांत आली असें मानीत नाहींत, म्हणून बारा वर्षांच्या आंत नवऱ्याला तिनें जो रुकार दिला तोही कायदेशीर मानूं नये, हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण, पाहिजे त्या वयांत लग्नाला रुकार देणें हें जर कायदेशीर आहे, तर ज्या गोष्टीसाठीं लग्न करावयाचे तीं गोष्ट नवरा करूं लागल्यास ती कायदेशीर नाहीं, असें कसें म्हणतां येईल?बारावें वर्ष हा मुलींच्या ऋतुदर्शनाचा सामान्य काल होय, असें सुश्रुतादि तुमच्या अत्यंत पूज्य भिषक्प्रमुखांचें म्हणणें असतां, व मन्वादि आद्यस्मृतिकार आणि पाराशर,

बृहस्पति, येम वगैरे इतर धर्मशास्त्रकर्ते हे बारा किंवा चौदा वर्षांच्या आंत नवऱ्यांनीं आपापल्या बायकांशीं संबंध ठेऊं नये, असें सांगत असतां, व या वयाच्या मुलींचीं लग्नें झालीं नाहींत तरी हरकत नाहीं, असें त्यांचें म्हणणें असतां, तुम्ही आठदहा वर्षांच्या पोरी आपण होऊन विवाहपाशानें बद्ध करून टाकता कां, आणि मग त्या पाशापासून होणारा त्रास चुकविण्यासाठीं विशेष फायदा न होणारे कायदे मागत बसतां कां? तुमच्या मुलींचा, तुमचा, आणि तुमच्या जावयाचा भंडवडा कशानें होतो, हें तुम्हांस पूर्णपणें कळून आलें आहे. तेव्हां शहाण्या माणसाप्रमाणें रोगाच्या मुळास हात घालाल, कीं वरवर लेप आणि मलमपट्ट्या लावीत बसाल? हिंदुस्थानांतील दोन प्रांतांत एका चाळीस वर्षांच्या अवकाशांत असंमत संभोगाचे शंभर खटले कोर्टापुढें आले, आणि त्यांपैकीं सुमारें निम्या खटल्यांत दहापासून तेरा वर्षांच्या आंतील वयाच्या मुलींवर त्यांच्या नवऱ्यांकडून जुलूम झाला, असें सांगण्यांत, व या प्रसिद्ध जुलमांच्या मागें शेकडों अप्रसिद्ध जुलूम झाले असतील असें म्हणण्यांत, 'संमतीचें वय वाढवा' या प्रार्थनेस विशेष पुष्टि मिळते, असें आम्हांस वाटत नाहीं. संमतीचें वय वाढविल्यानें प्रतिवर्षी ज्या अडीच अपराध्यांस आजपर्यंत दुखापतीबद्दल शिक्षा द्यावी लागली, तिचे जागीं, संमतीचें वय वाढविल्यास, जबरीच्या संभोगाची शिक्षा देतां येईल, यापलीकडे कोणताही फायदा या कायद्यानें होणार नाहीं. कदाचित् फांशीचीच शिक्षा ठेविली तर मात्र काय होईल तें सांगवत नाहीं; पण त्या शिक्षेहून दुसऱ्या कोणत्याही हलक्या शिक्षेनेंप्रसिद्ध गुन्ह्यांच्या मागे होत असलेल्या अप्रसिद्ध गुन्ह्यांची संख्या दहापांच अंकांनीं तरी स्वल्प होईल किंवा नाहीं, याची आम्हांस बरीच शंका आहे. अशा प्रकारचे जे गुन्हे कोर्टापुढें येतात ते बऱ्याच अंशीं नाइलाजास्तव येतात. जे हजारों मुलगे हजारों मुलींकडे पाहिजे त्या वयास जात आहेत, पण ज्यांच्या समागमापासून भयंकर परिणाम होऊं शकत नाहीं, त्याचा प्रतिबंध या तुमच्या कायद्यानें कसा होणार? किंवा चाळीस पंचेचाळीसपुढें विवाह केल्यानें कोणत्याही वयाच्या मुलीस घोर अपाय होईल अशा रीतीनें तीवर आपलें पौरुष गाजविणें ज्यांस अशक्य झालें आहे; अशांनीं आपल्या दशद्वादशसांवत्सरिक धर्मपत्न्यांशीं केलेल्या क्रीडा दंड्य कशा होणार! पंचविशीच्या पुढले व चाळिशीच्या आंतले जे उल्लू व दांडगे प्रथमवर, बिजवर, तिजवर किंवा पाहिजे त्या खेपेचे वर, शुभमंगल झाल्यापासून आपलें उपभोगस्थान कायदेशीरपणें आपल्या हस्तगत झालें, तेव्हां त्याचा उपभोग तब्यत लागेल तेव्हां करण्यास कांहीं हरकत नाहीं, असें समजून त्यावर झडप घालण्यासाठीं टपून बसलेले असतात, व सारी लज्जा एकीकडे गुंडाळून ठेऊन, संधि सांपडल्याबरोबर जसा बुभुक्षित लांडगा मेंढीवर उडी घालतो,

त्याप्रमाणें जे दिवसा ढवळ्या किंवा पूर्वरात्रीं आपल्या अर्धांग्यांस अंथरुणासकट सभोंवती निजलेल्या स्त्रियांतून उचलून नेऊन, त्यास योग्य वाटलेल्या एखाद्या एकांत स्थलीं, किंवा तेथल्या तेथेंच अमानुष सुखाचा घुटका घेण्याचें धाडस करतात, अशा साहसी, उतावीळ, दांडग्या, क्रूर लांडग्यांच्या हातीं गरीब मेंढ्या न पडाव्या हा जर मूळ उद्देश असेल; तर तुम्ही मागत आहां त्या कायद्यानें तो कधींही सिद्धीस जावयाचा नाहीं, व ज्या प्रचारामुळें तुमच्या तोंडांत सारीं सुधारलेली राष्ट्रें शेण घालीत आहेत, त्याचा निखालस लय या कायद्यानें कधींच होणार नाहीं. तो व्हावा अशी तुमची खरी इच्छा असेल तर बारा वर्षांच्या आंत मुलींचीं लग्नेंच करूं नका म्हणजे झालें. पण ही सुधारणा इतक्यांत तुमच्यानें होण्यासारखी नसेल, तर **सरकारापासून असा तरी कायदा करून घ्या कीं, पंचवीसपासून चाळीस वर्षांपर्यंत लग्न करूं इच्छिणाऱ्या कोणत्याही वयाच्या वरानें बारा वर्षांचें आंतील वयाच्या मुलीशीं लग्न करूं नये.** हिंदुस्थान सरकाराकडे धाडण्यासाठीं तयार केलेल्या पत्राच्या मसुद्यांत चाळीस वर्षांत जे जबरीचे शंभर संभोग हिंदुस्थानांतल्या दोन प्रांतांत झाले म्हणून म्हटले आहे, व ज्यांपैकीं सुमारें निम्मे दहापासून तेरा वर्षांच्या आंतील वयांचे मुलींशीं झाले, असें सांगितलें आहे, ते संभोग करणाऱ्या नवऱ्यांचीं वयें देण्यांत येतील तर फार बरें होतें. तसें करणें त्या पत्राच्या चतुर लेखकास इष्ट कां वाटलें नाहीं, कोण जाणे. पण जर तीं वयें पुढें येतील तर ते सारे जबरीचे संभोग पंचविशी उलटलेल्या आणि पंचेचाळिशीच्या आंतल्या अविचारी प्रथम वरांनीं, बिजवरांनीं, किंवा तिजवरांनी केले असावे, असें दिसून येईल, असें आमचें अनुमान आहे. विवाहपटावर वाघशेळीचा खेळ होऊं दिला असतां, तुम्हीं केवढीही खबरदारी ठेवलीत, तरी एखादे वेळीं वाघ शेळीला खाऊन बसेल आणि तुम्हांस राग, लज्जा, व ममता या विकारांपासून होणारा अनिर्वाच्य त्रास सोसावा लागेल! तेव्हां सरकारकडे सध्यां जी मागणी घालण्याचा विचार चालविला आहे, तिचा नाद सोडून द्या, आणि पंचविशीच्या पुढल्या आणि पंचेचाळिशीच्या आंतल्या कोणत्याही विवाहेच्छु वरानें बारा वर्षांचे आंतील वयांचे वधूशीं विवाह करूं नये, असा कायदेशीर निर्बंध सरकारकडून करून घ्या, म्हणजे तुमचा इष्ट हेतु तेव्हांच तडीस जाईल, व तुमच्या तोंडचा कलंक पुसेल. पण जर तुमच्या अंगांत खरोखरींच कांहीं रग असेल, व पूर्व ऋषींनीं घालून दिलेल्या नियमांची जी दृढ भक्ति तुम्हांस आहे म्हणून वरकरणीं तुम्हीं नेहमीं म्हणत असता; तिचा एक शतांश जर तुमच्या अंगांत खरोखरींच वास करीत असेल, व त्या मर्द आर्यांचे केवळ मिथ्याभिमानी वंशज तुम्ही नसाल; तर त्यांच्याप्रमाणें आपल्या हातून पौरुषाची कृत्यें होण्यासाठीं सोळा वर्षेपर्यंत

बापानें आपणास वाटेल तशा रीतीनें स्नेहपूर्वक आपल्या घरीं आपल्या मुलीचें संगोपन करावयाचें, आणि तिला तें वय प्राप्त झाल्यावर, आपल्या व तिच्या संमतीनें योग्य वर पाहून त्याच्या स्वाधीन तीस करावयाचें- अशी चाल घाला; आणि येथून पुढें होणाऱ्या संततीच्या मानास आणि कृतज्ञतेस पात्र व्हा! एकदां असें करण्याचा निश्चय कराल तर साऱ्याच कटकटींतून सुटाल; आणि एकवार जिवाचा घडा करुन अशी रूढि उघडपणें पाडण्यास प्रवृत्त व्हाल, तर ज्याना अलीकडे कित्येकांनीं 'प्रतिगामीं अथवा प्रतिकारी' (reactionists) असें नाव ठेविलें आहे, त्यांपैकीं जे खऱ्या वास्तविक उपयुक्त सुधारणेस मुळींच प्रतिकूल नाहींत, असे इसम तुम्हांस येऊन मिळतील, आणि 'थंडे व गरम', 'उतावीळ आणि मठ्ठ', 'सुधारक आणि दुर्धारक' वगैरे संज्ञांनीं अलीकडील वादांत व्यक्त होऊं लागलेल्या मतभेदाचा निरास होऊन, आपण सारे एक दिलानें स्वोन्नति व राष्ट्रोन्नति करण्यास लागूं.

✷

# कायदा मागतां ते जात कां करीत नाहीं?

ज्या लोकांची अद्याप समजूतच अशी आहे कीं, पाश्चात्यांपासून राजकीय गोष्टींत मात्र आपणांस काय तें शिकण्यासारखें आहे, बाकी जी आमची गृहस्थिति आज अनादिकालापासून चालत आली, जिनें मोठाल्या क्रांत्यांशीं टक्कर मारिली, व जिचे पाय भक्कम खडकावर भरले आहेत, तींत ढवळढवळ करून पाश्चात्य गृहपद्धतीच्या धर्तीवर ती अंशत:ही नेण्याचा प्रयत्न करणारे झाडून सारे, वेड्यांच्या इस्पितळांत पाठविण्याच्या योग्यतेचे आहेत. त्या लोकांनीं ''आम्हांस ही तुमची सुधारणा नको व तुम्हांस आमचे ऐकावयाचेंच नसेल तर, करा वेगळी जात आणि व्हा मोकळे'' असा सल्ला द्यावा, यांचें आम्हांस नवल वाटत नाहीं. परंतु ज्यांचीं मतें वरच्यासारखीं नाहींत, व इंग्रजी राज्यव्यवस्थेप्रमाणें त्यांचीं गृहस्थितीही बऱ्याच गोष्टींत अनुकरणीय आहे, अशी ज्यांची खात्री झाली आहे, व ती ज्यांनीं स्पष्ट शब्दांनीं व्यक्तही केली आहे, अशा लोकांनींही ''कायदा नको'' असें आपण एकदां प्रतिपादिलेलें सोडावयाचें नाहीं, एवढ्याच दुराग्रहावर ''बाप दाखवा नाहीं तर श्राद्ध करा'' या न्यायाचा अवलंब करावा; व ''कायद्याचें तरी नांव सोडून द्या, नाहींतर वेगळी जात तरी करा'' असा मोठ्या गंभीरपणानें उपदेश करण्यास प्रवृत्त व्हावें, याचें आम्हांस राहून राहून आश्चर्य वाटतें. त्यांस हें कळत नाहीं कीं-

श्रुतिस्तु वेदो विज्ञेयो धर्मशास्त्रं तु वै स्मृति:
योऽवमन्येत ते मूले हेतुशास्त्राश्रयाद्द्विज:
स साधुभिर्बहिष्कार्यो नास्तिको वेदनिन्दक:

या मनूच्या कायद्याची अंमलबजावणी सर्व कालीं व सर्व स्थळीं होत राहणें अशक्य असल्यामुळें ''बाप दाखवा नाहीं तर श्राद्ध करा'' हेंहि तर्कशास्त्र नेहमीं व चोहींकडे निर्दोषच मानलें जाईल, असें नाहीं. तसेंच ''सामाजिक गोष्टींत कायदा नसावा'' हें युरोपियन ऋषींचें सूत्रही सर्वच स्थितींत लागू पडण्यासारखें नाहीं. त्यासही अपवादस्थलें आहेत. ''एखाद्या पदार्थास गति मिळाली म्हणजे ती तशी सतत चालू असते'' हा पदार्थविज्ञानशास्त्राचा नियम सामान्यत: जरी खरा आहे, तथापि त्यास पदोपदीं अपवाद दिसतात. मग जड पदार्थही जर एका सृष्टिनियमानें बांधले जात नाहींत, तर हवापाणी, चालीरीति, आचारविचार, धर्मसंस्था,

शिक्षणक्रम वगैरे असंख्य कारणांनी प्रतिक्षणीं भेद पावणाऱ्या सचेतन मानवी प्राण्यांच्या समाजास सर्व स्थितींत एकाच सूत्रानें बांधूं पाहणें किती हास्यास्पद आहे, हें अधिक स्पष्ट करून दाखविण्याची मुळींच अवश्यकता नाहीं.

आतां ''जात करा'' हा आमच्या बंधूंचा उपदेश जर खरोखरच खोडसाळपणाचा नसेल, व कायदा मागण्यापेक्षां जात केल्यानें सुधारणा जर अधिक त्वरित, अधिक व्यापक, व सुखकर होणें शक्य असेल, तर या आमच्या मित्रांनीं, ''जात करा'' अशी आम्हांस मसलत देण्याचें सोडून ''चला आपण जात करूं या'' असाच उपदेश केला असता; कारण कीं, बोलण्याप्रमाणें करून दाखविण्याचें धैर्य नसल्यामुळें जसे कायदेवाले भेकड ठरतात, व त्यांचें पुढारित्व जसें त्यांच्यापासून हिसकावलें जातें, त्याप्रमाणेंच सुधारणा पाहिजे म्हणणारे बेकायदेवालेही उदाहरण घालून देईपर्यंत भेंकड कां मानले जाऊं नयेत? व त्यांच्या जवळचे तेवढें पुढारित्वाचें पदक कां राहू द्यावें? याची आमचे बेकायदेवाले फोड करतील काय? हो अलबत! याची फोड पुष्कळ वेळा केली गेलीं आहे. ती काय बरें? ती इतकीच कीं, ज्यांस लोकनायकाचें काम करावयाचें असेल त्यांनीं लोकांचेंही कांहीं ऐकलें पाहिजे. प्रत्येक गोष्टीत आपलाच हेका चालवून उपयोग नाही; कांहीं कांहीं गोष्टींत त्यांच्याच धोरणानें घेतलें पाहिजे. बरें, ठीक. आमच्याही मतें वरील उपदेश खचित गृहणीय आहे, व आम्हांस तर वाटतें कीं, आम्हीही त्यांस सोडून वागत नाहीं. वा:! मग कायदा का मागतां? लोक कायद्याच्या विरुद्ध असतां, तो मागत बसणें म्हणजे कांहीं लोकांच्या धोरणानें चालणें नव्हे! यावर आम्ही असें उत्तर देतों की, लोकनायकांनीं कांहींसें लोकांच्या धोरणानें घेतलें पाहिजे, हें जरी आम्हांस पूर्णपणें संमत आहे, तथापि कायदा हा शब्द तोंडावाटें काढला कीं, लागलाच लोकांच्या धोरणानें न वागण्याचा आरोप आम्हांवर कसा लागू होतो, हें मात्र दुराग्रहाच्या तर्कशास्त्रावांचून सिद्ध करून देतां येईल असें आम्हांस वाटत नाहीं. लोकनायकांनीं जसा अंशत: लोकमताचा आदर केला पाहिजे, त्याप्रमाणें लोकांनीही नायकाच्या मताचा अंशत: अंगिकार केला पाहिजे, हें कोणासही नाकबूल करतां येणार नाहीं. परंतु सर्व तंटा काय तो वरील वाक्यांतील ''अंशत:'' या अज्ञात संख्येची किंमत ठरविण्यांत पडला आहे. बालविवाहाच्या दुष्ट प्रचारापासून होणारे सर्व अनर्थ टळण्यास, मुलींची विवाहमर्यादा निदान सोळा वर्षांपर्यंत तरी गेली पाहिजे हें, विचार करण्याची इच्छा असल्यास, कोणासही सहज समजण्यासारखें आहे. परंतु रजोदर्शनानंतर कन्येचा विवाह करणें म्हणजे नरकाची सामुग्री करणें होय, हा आमच्या लोकांचा समज जोंपर्यंत शिथिल झाला नाहीं, तोंपर्यंत १६ वर्षांपर्यंत कायद्यानें मुळींच लग्नें बंद करूं पाहणें म्हणजे

अत्यंत जुलूम होय, ही गोष्ट कायदा मागणारे पूर्णपणें जाणून आहेत, व असा कायदा करावा, असें कोणीही सुचविलें नाहीं. कायद्याची इयत्ता काय ती १० पासून १२ वर्षांच्या दरम्यानच सुचविली जात आहे; व बारा वर्षांपर्यंत मुली अविवाहित राहणें हें कांहीं लोकाचाराच्या विरुद्ध आहे, असें कोणास प्रतिपादितां येणार नाहीं. तेव्हां अशा रीतीनें कायदेवाल्यांची परमावधीची इयत्ता जर बारा वर्षांपुढें गेली नाहीं, तर लोकांच्या समजुतीचा आदर करीत नाहींत, व लोकांच्या धोरणानें चालत नाहींत, हें बेकायदेवाल्यांनीं कोणत्या आधारानें ठरविलें, याचा आम्हांस उमज पडत नाहीं. असो, इसापनीतिंतील लांडगा आणि कोंकरूं या गोष्टींतल्या लांडग्याप्रमाणें "तू नाहीं तर तुझ्या बापानें शिव्या दिल्या असतील" या न्यायानेंच कांहीं तरी दोष कायदेवाल्यांच्या माथीं मारण्याचा बेकायदेवाल्यांनीं निश्चयच केला असल्यास, "ब्रह्मापि तं नरं न रंजयति" असेंच म्हटलें पाहिजे. दुराग्रहाच्या तर्कशास्त्रांतील दोष दाखविण्यास दुसरा मार्ग नाहीं. कायदा करून घेतला असतां नुकसान होईल, असें दाखवितां येईना, म्हणून वाटेल तें बहकत सुटावें हा तर या बेकायदेवाल्यांचा नित्याचा क्रम. "या पारशानें आपल्या जातीची सुधारणा करण्याचे सोडून हिंदूंच्या सुधारणेची उठाठेव कां करावी?" हा मुद्दाही वरच्याच मालेंतील आहे. पण या आमच्या मलबारींच्या द्वेष्ट्यांस आम्ही असें विचारतों कीं, हिंदुस्थानांतील मद्यसेवनाचा दुष्ट प्रघात नाहींसा करण्याकरितां एकदा केन, देशाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत आपणांस उपदेश करीत फिरला, व त्या घातक व्यसनाचा बिमोड करण्यास कायदा मागू लागला तर त्यांत मात्र आम्हांस कांहीं वावगें दिसून येत नाहीं, आणि बिचारा मलबारी तेवढाच आमच्या तिरस्कारास पात्र होतो, याचें इंगित काय? केनसाहेबास जर कोणी असें म्हणता की, "अरे बाबा, आपल्या स्वत:च्या देशांतलें दारूचें व्यसन नाहींसें करण्याचें सोडून तूं आमच्या कां वाटे जातोस?" तर आम्हीं त्याची काय किंमत केली असती? व तोच आक्षेप मलबारींवर आणणारांचीही किंमत तीच होते, हें कां नव्यानें सांगितलें पाहिजे?

असो; आतांपर्यंत आम्हीं जें लिहिलें आहे तेवढ्यावरून कायदा मागणारे लोक समाजाच्या धोरणानें वागत नाहींत, समाजास अज्ञातपूर्व व अरूढ अशा गोष्टींबद्दल कायदे करवून त्यांच्यावर मोठा जुलूम करीत आहेत, व यांना सारी सुधारणा एकदम करायला पाहिजे आहे वगैरे आक्षेपांस ते पात्र नाहींत, व म्हणून त्यांस वेगळी जात करा असा उपदेश करण्याचें प्रयोजन नाहीं, असें दिसून येणार आहे. आतां "जात करा" असें न म्हणतां, "जात करूं या" असें म्हणणारांविषयीं दोन शब्द लिहून आम्ही हा विषय संपवितों, व त्यावरूनही जात करण्यापेक्षां

कायदा मागणें हेंच इष्ट आहे असें दिसून येईल. "जात करूं या" असा सल्ला देणारे सुधारणेच्छु व "जात करा" असें म्हणणारे बेकायदेवाले, यांच्यांत फार अंतर आहे. बेकायदेवाल्यांच्या मतें आम्ही जी आमच्या गृहस्थितीविरुद्ध ओरड करितों, ती जणू काय त्यापासून आमचें स्वत:चें व्यक्तिश: नुकसान होत आहे म्हणून करतों. परंतु "जात करूं या" म्हणणारे लोक या गृहस्थितीपासून एकंदर देशाचें मोठें नुकसान होत आहे, व तें बंद करण्यास जात करणें हा एक उत्तम उपाय आहे, असें म्हणणारे आहेत. ते म्हणतात कीं, जरी आपण एक बालविवाहाचा कायदा केला, तथापि त्याचे योगानें फार तर १२ वर्षेपर्यंत मुलगी अविवाहित राहील. परंतु ऋतुप्राप्तीपुढेंही तिला अविवाहित ठेवण्यास वेगळी जातच केली पाहिजे. तसेंच विधवांवर होत असलेला जुलूम दूर करणें, ही जर सुधारणेच्या अनेक गोष्टींपैकीं एक गोष्ट असेल; तर तीही वेगळी जात केल्यावांचून होणार नाहीं. परंतु या वर्गंतील लोकांनीं आमच्या मतें जात करण्याच्या सर्व अडचणींचा विचार केला नाहीं. ज्या कारणांकरितां आम्ही कायदा मागतों, त्याच कारणांकरितां जात करणें योग्य नाहीं. बालविवाहाची चाल वाईट आहे, अशी पूर्ण समजूत असणारे लोक ८ व्या किंवा ९ व्या वर्षीं आपल्या मुलींचीं कां लग्नें करतात बरें? याचें कारण इतकें कीं, यापुढें मुलगी अविवाहित राहिल्यास लोक संशय घेतात, व तेणेंकरून मुलीस योग्य स्थळ मिळेल कीं नाहीं अशी भीति उत्पन्न होते. कोंकणस्थ, देशस्थ व कऱ्हाडे हे ब्राह्मण असूनही त्यांच्यांत परस्पर बेटीव्यवहार होत नसल्यामुळें, निवडणुकीचा प्रदेश आधींच संकुचित झाला आहे तो अधिक संकुचित होऊं न देण्याविषयीं झटणें, हें प्रत्येक पित्याचें कर्तव्य होऊन बसतें. दुसरें, कदाचित् कांहीं तजविजीनें मुलीचें नुकसान न होऊं देण्याविषयीं खबरदारी घेणें शक्य असलें, तथापि वडील माणसांच्या इच्छेविरुद्ध जातां येत नाहीं. तेंच कायदा असला म्हणजे मुली १२ वर्षांपर्यंत अविवाहित राहिल्यामुळें, योग्य स्थळ मिळण्याची काळजीही दूर होईल, व वडिल माणसेंही नाखुष होण्याची भीति नाहीं. आतां, अशा रीतीनें वडील माणसांचीं तोंडें बंद करणें म्हणजे केवळ भेकडपणा आहे, असें कित्येकांस वाटतें; परंतु काळ्या रंगाची, आखूड शिंगाची, व पुष्कळ दूध देणारी गाय मिळेपर्यंत दूधच घ्यावयाचें नाहीं, असा सर्वांनीं निश्चय केल्यास कसें होईल हें सांगत बसण्याची अवश्यकता नाहीं. कायद्यानें मनें दुखवतात, तो करूं नये; अवज्ञा केल्यानें मनें दुखावतात, तेव्हां तसें करूनही त्यांची मर्जी मोडूं नये; फार दिवसांच्या रूढीनें त्यांचे विचार निश्चित झाले असल्यामुळें त्याविरुद्ध त्यांच्याशीं वाद करणें म्हणजेही, त्यांचीं मनें दुखवण्यासारखें आहे, म्हणून त्याच्याही भरीस पडूं नये, असाच वाद घालीत

बसल्यास त्यास आमच्याजवळ उत्तर नाही. प्रवाशास जसा नेहमीच सपाट रस्ता मिळणें अशक्य आहे, व नेहमींच प्रात:काळचा शीतल मंद वारा अनुभवितां येणें शक्य नाहीं, तशीच सुधारकाचीही गोष्ट आहे. सारासार विचार केला पाहिजे एवढें मात्र खरें! असो.

तेव्हां जोंपर्यंत मनुष्यस्वभाव बदलला नाहीं तोंपर्यंत वडिलांची मर्जी होईल तितकी संभाळण्यास झटणें, व आपल्या पोटच्या गोळ्यांची काळजी वाहणें या गोष्टी नाहींशा होणार नाहींत, व यांपासून सुधारणेस येणाऱ्या अडचणी दूर व्हाव्या म्हणूनच कायदा पाहिजे हें जर खरें असेल, तर जात कशी करतां येईल ही शंका आहे. कारण जात केल्यानें आपल्या सर्व व्यवहाराचा प्रदेश फारच संकुचित होणारा आहे, व तेणेंकरून फार त्रास भोगावा लागेल, व वडिलांची मर्जी मोडतां न आल्यामुळें, मुलींस एखादेदुसरें वर्ष अविवाहित ठेवण्यास जर फारसे लोक तयार नाहींत, व देशस्थ, कोंकणस्थ व कऱ्हाडे यांच्यांतही परस्परविवाह होण्यास जर अद्याप आरंभ झाला नाहीं, तर वेगळी जात करण्यास कितीसे लोक तयार होतील, हा एक प्रश्न आहे. बरें, इतक्याही अडचणी सोसून आपण जात केली, तर लोकसमाज लवकरच आपल्या मागून येईल अशी तरी खात्री आहे काय? व अशी खात्री देण्याजोगी जर वस्तुस्थिति नाहीं, तर वेगळी जात केल्यानें, धड ना स्वार्थ ना परमार्थ असा प्रकार होणार आहे. एकंदर समाजाचें पाऊल पुढें पडावें हा तर आपला मुख्य उद्देश, व तो जर साधत नाहीं, तर आपण स्वतांस ताप करून घेऊन आपल्या मुलाबाळांच्या भावी कल्याणाविषयीं बेफिकीर राहणें, हें सर्वथा अयोग्य होय. शिवाय जात करण्यापासून केवळ स्वतांचें हित साधावयाचें नसल्यामुळें व सर्वच सुधारणा एका घावानें करूं पाहण्यानें आपल्याविषयीं लोकांच्या मनांत अविश्वास उत्पन्न होतो, असा कित्येकांचा आक्षेप असल्यामुळें, ब्राह्मण सुधारकांची एक जात, शेणवी सुधारकांची दुसरी जात, परभूंची तिसरी जात असे अनेक भेद मात्र होणार; व इतकेंही करून समाज तर अनुकरण करण्यास तयार नसणार. मग जात करणें म्हणजे आपलें व आपल्या पुढील पिढ्यांचें जाणूनबुजून नुकसान करणें व आधींच एकाचें तोंड पूर्वेस तर दुसऱ्याचें पश्चिमेस असें करून टाकणाऱ्या दुष्ट जातिभेदाचें बंड, निरर्थक वाढविण्याच्या पातकाचें भागीदार होणें नाहीं काय? कन्या ऋतुमती झाल्यावर तिचा विवाह करण्यानें जातीबाहेर जावें लागण्याचें कारण नाहीं. तसें झाल्यास गोप्रदान करावें, किंवा तिच्या जितक्या पाळ्या झाल्या असतील, तितक्या ब्राह्मणांस भोजन घालून दक्षिणा द्यावी, असें 'संस्कारकौस्तुभांत' सांगितलें आहे. आतां पुनर्विवाहास जरी शास्त्राधार आहे, तथापि रूढीच्या बलवत्तर प्रभावामुळें लोक दुराग्रहानें तो कबूल करीत

नाहींत, हें खरें आहे; व हा अन्याय दूर झाला पाहिजे हेंही खरें आहे. परंतु पांच पन्नासांची जात करू म्हणजे हा अन्याय खात्रीनें बंद होईल, असें आम्हांस वाटत नाहीं. बालविवाहाच्या कायद्यानें जसें निदान १२ वर्षांच्या आंतील सर्व कन्यांचें वैधव्य खात्रीनें बंद करतां येईल, तसें जात करून समाजाच्या बऱ्याच भागांतून हा कलंक नाहींसा होण्याची आशा नाहीं. केशवपन केलें नाहीं तर कोणीं जातीबाहेर टाकतो असें थोडेंच आहे. शारदासदनासारख्या ठिकाणीं त्यांस ठेवून, दुसऱ्यांच्या तोंडाकडे पाहण्याच्या दीनस्थितींतून त्यांची सुटका केल्यास कोणी बहिष्कार घालतो असें नाहीं; पण तेंहि करण्यास समाज तयार नाहीं, मग असें ढळढळीत आपणांस दिसत असून वेगळी जात केल्यानें हा अन्याय दूर होईल असें आपण कसें मानावें? हजारों वर्षांच्या सवयीनें आमचीं मनें या गोष्टीसंबंधानें इतकी घट्ट होऊन गेलीं आहेत कीं, त्यांच्यावर कितीहि आघात केले तरी त्यांस कांहींही होत नाहीं. "बोलणें फार झालें" ही हाकाटी "जो उठला तो इंग्रजी शिकतो" या हाकाटीप्रमाणेंच भ्रामक आहे. या गोष्टींतील अन्याय लोकांस कळून येऊन तो बंद करण्याकडे त्यांची साक्षात प्रवृत्ति होण्यास झालें हें बोलणें व लिहिणें कांहीच नाहीं. प्रत्येक शहरांत, प्रत्येक गांवांत, खेड्यांत यासंबंधानें लोकमत तयार करण्यास झटलें पाहिजे. प्रत्येक सभागृहांत, बाजारांत, चव्हाट्यावर, व्यासपीठावर, कीर्तनांत, पुस्तकगृहांत, जिकडेतिकडे याविषयीं एकसारखी चर्चा चालू झाली पाहिजे, व अशी चळवळ करणाऱ्या सुधारक मिशनरींची जात होईपर्यंत, वेगळी जात करण्यापासून फलप्राप्ती होण्याचा संभव नाहीं.



# हिच्या नांवानेंही तीच रड

आमच्या वाचकांच्या पारतंत्र्याविरुद्ध, अज्ञानाविरुद्ध, ढिल्या पोषाखाविरुद्ध, तऱ्हेवाईक बहुमोली दागिन्यांविरुद्ध, किंवा आमच्या धर्मांतील कित्येक हास्यास्पद आचारांविरुद्ध कोणी कांहीं लिहिलें तर ज्यांचें माथें फिरून जातें असे लोक व्यापारीय किंवा राजकीय विषयांच्या चर्चेचे मोठे चहाते असतील, व व्यापारीय आणि राजकीय खटपटींत आपलें मन घालून त्यासंबंधानें आपल्या पदरास कांहीं खार लावून घेत असतील, असें म्हणावें तर त्याची मोठी शंका आहे. कारण, धार्मिक व सामाजिक सुधारणेविषयीं आमच्या लोकांत जितकी अनास्था व विरोधबुद्धि दिसते, तितकी आस्था व कर्मोद्युक्तता व्यापारीय व राजकीय सुधारणेविषयीं दृष्टीस पडती तर आजमितीस सर्व देशभर येवढी अन्नान्नदशा आणि इतकी परवशता कां दृष्टीस पडती? कोण काय पाहिजे तें म्हणो, आम्हांस तर आलीकडे असें वाटूं लागलें आहे कीं, क्षुद्र स्वार्थसाधनाविषयीं पराङ्मुख होऊन, केवळ राष्ट्रीय किंवा केवळ सार्वजनिक हिताच्या कोणत्याही लहान किंवा थोर गोष्टीसाठीं निरपेक्षबुद्धीनें व निरलसतेनें झटणारा मनुष्य लाखांत एक सुद्धां आढळणार नाहीं! आज ज्या राजकीय हक्कांचा उपभोग आम्ही घेत आहों, किंवा यांत्रिक शिक्षण आणि व्यापारबुद्धि यांविषयीं ज्या थोड्याबहुत सोई करण्यांत आल्या आहेत, त्यांपैकीं एक तरी आमच्या परिश्रमाचें फळ आहे, असें कोणी छातीवर हात देऊन म्हणूं शकेल काय? आपल्या व परक्या राजांपुढें आणि बादशहांपुढें, किंवा धर्मगुरूंपुढें जे आम्ही हजारों वर्षें डोकीं व गुडघे घांशीत आहों, व **'राजा कालस्य कारणम्'** हें परावलंबसूची राजकीय तत्त्व ज्या आमच्या हाडामासांत खिळून गेलें आहे, त्या आम्हीं कोणतीही सुधारणा स्वपराक्रमानें करण्याची व्यर्थ वल्गना कशासाठीं करावी? ज्या जुन्या पद्धतीच्या लोकांना आपल्या गांवाबाहेर किंवा प्रांताबाहेर काय चाललें आहे याची नीट कल्पना नाहीं, अशांनीं जुन्या विचाराला मगरमिठी घालून बसून, त्याविरुद्ध अलीकडील सुशिक्षितानें किंवा सरकारानें येवढेंसें कांहीं करावयाचें म्हटलें कीं, गयावया करीत सुटावें, हें नीटच आहे. जुन्यांपैकीं एखादा महामहोपाध्याय कां घ्या ना? तो म्हणजे तुमच्या राष्ट्रसभेस अनुकूल असेल, आणि संमतीचे वय वाढविण्यास मात्र प्रतिकूल

असेल, असें सहसा व्हावयाचें नाहीं, हें निदान पुण्याच्या लोकांना तरी सांगावयास नको आहे. जितका सामाजिक विचारांचा तितकाच राजकीय अथवा व्यापारीय विचारांचा संस्कार त्यांच्या बुद्धीवर झालेला असतो! अर्वाचीन कालांतील हरएक प्रकारची चळवळ याच्या संकुचित दर्शनामुळें व अज्ञानामुळें त्यास विनाशक व भयप्रद वाटत असल्यामुळें, तो तिचा संसर्ग टाळण्यासाठीं तीपासून होईल तितका दूरदूर पळत असतो, आणि आपल्या भेकडपणावर आणि पुराणप्रियतेवर मिथ्या देशाभिमानाचें आणि लोकहितवादित्वाचें अवगुंठन घालीत असतो! असें नसेल तर वर्तमानपत्रांचें स्वातंत्र्य, स्थानिक स्वराज्य, ज्यूरीची पद्धत किंवा अशाच प्रकारच्या इतर गोष्टींपैकीं अमुक एक गोष्ट संपादण्याविषयीं यानें खटपट केली व ती याच्या मेहनतीनें आम्हांस प्राप्त झाली, असें कोणीं तरी सिद्ध करू दिलें पाहिजे. तात्पर्य, आमचे जुने व बडे लोक जितके सामाजिक सुधारणेविषयीं तितकेच राजकीय व व्यापारीय सुधारणेविषयीं अज्ञान व उदासीन आहेत, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं. **असें नसतें तर राष्ट्रसभेच्या नांवानेंही पुनः पुनः तीच रड कां ऐकावी लागती!** पण या राजकीय परिषदेचें महत्त्व तरी कळतें आहे कोणाला? मांडलिकांना, छोटेखानी राजेराजवाड्यांना, व मोठमोठ्या जहागीरदारांना असें वाटत आहे कीं, ही सामान्य लोकांची सभा महाराणीसरकारची दुस्मानगिरी करणारी आहे, आणि म्हणून तीस आपली अनुकूलता आहे असें दाखविणें, किंवा कोणत्याही प्रकारें तिला मदत करणें, हें पोलिटिकल अधिकाऱ्यास आपल्या राजनिष्ठेविषयीं अंदेशा येण्यास कारण होणार आहे. सबब, तीपासून आपणांस जितकें अलिप्त राहवेल तितकें आपण राहिलों तरच आपल्या गाद्या व आपले मुलूख कायम राहून, प्रजेच्या जिवावर आपली चैन चालणार आहे! हिंदुस्थानांत लहान मोठीं मिळून पांचशें संस्थानें तरी असतील. इतक्यांनीं राष्ट्रसभेस प्रतिवर्षी अगदीं स्वल्प मदत केली तरी तिची किती दगदग चुकणार आहे. पण जर या संस्थानिकांस असें वाटत असेल कीं, या सभेस आपण प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें साहाय्य दिलें तर लाट साहेब आपणांस फांशीं देतील! अथवा आपला मुलूख खालसा करून आपल्या हातीं चौपदरी देतील, तर राष्ट्रसभेच्या फंडास एक रुपया तरी देण्याची त्यांची छाती कोठून होणार? या आमच्या लिहिण्यास मुळींस अपवाद नसेल, असें आमचें म्हणणें नाहीं. पण असला तरी तो इतका स्वल्प आहे कीं, त्यामुळें आमच्या सामान्य विधानास क्षीणता न येतां, उलट त्यांचें पुष्टीकरणच होतें. ही या धनाढ्य बड्या लोकांची दशा! आतां सरकारी नोकर; ते तर बोलून चालून सरकारी नोकर! ते केवढेही पगारवाले व अक्कलवाले असले म्हणून राष्ट्रसभेच्या कामास उघडपणें मदत करतील कीं

काय? करतील, तर दुसरे दिवशीं आपल्या अधिकारास मुकतील व अन्नास मोताद होतील! आपला नोकर राष्ट्रसभेस अनुकूल झाला, आणि तिच्या प्रीत्यर्थ कांहीं हालचाल करूं लागला तर आपली धडगत होणार नाहीं, अशी सरकारास दहशत पडून, त्यानें म्युनिसिपॅलिट्या आणि लोकल बोर्ड्स् यांतील गरीब मेंढरांच्या संबंधानेंही खरमरीत ठराव करून सोडिले आहेत. राहतां राहिले शहाणेसुर्ते शेटसावकार. हे तुमच्या जुन्या लोकांप्रमाणेंच राष्ट्रसभेविषयीं गूढ अज्ञानांत आहेत. राष्ट्रसभेत मदत करण्यानें प्राप्तीवरील कर झट्दिशी कमी होता, किंवा एखाद्या मोठ्या जिनसावरील जकात उठती; तर त्यांनीं तुमच्या राष्ट्रसभेत रुपयामागें दमडीटोलीची मदत केली असती. पण तसें करून दाखविण्याचें सामर्थ्य सभेच्या अंगांत नसल्यामुळें, हे लोक तीविषयीं अगदीं बेफिकीर आहेत, असें म्हटलें तरी चालेल. बाकीं, राहिलेल्या नांगऱ्यांचा इतर विचार करण्याचीच गरज नाहीं. ते बोलून चालून नांगरे! हवी तितकीं राज्यांतरें व धर्मांतरें झालीं तरी त्यांचा संसर्ग त्यांपर्यंत अद्यापि कधींच जाऊन न पोहोंचल्यामुळें ते वैदिक कालापासून आहेत त्या स्थितींत आहेत, असें म्हणण्यास हरकत नाहीं. येणेंप्रमाणें येथील अनेक प्रकारच्या वर्गांतील लोकांची हालहवाल असल्यामुळें इतर संस्थांप्रमाणें आमची राष्ट्रसभाही अशी तशीच चालली आहे, व दुर्दैवानें ह्यूम तिचें चिटणीसपण सोडतील, तर ही आणखी दहा-पांच वर्षे चालेल किंवा नाहीं, याची शंका आहे! तर मग आतां करावें तरी काय? निरुपाय म्हणून स्वस्थ बसावें कीं, कांही धडपड करून पाहावी? अर्थात् ज्याला अर्वाचीन सुशिक्षणाचा कांहीं संस्कार झाला असेल तो कांहीं धडपड करून पाहावी असें म्हणेल हें उघड आहे. पण ही धडपड कोणीं करावी? आमच्या मतें ती करणें सद्य:स्थितींत आमच्या वकिलांचें व पत्रकर्त्यांचें कर्तव्य आहे. पैकीं पहिल्यांकडून तें थोडेबहुत बजावलें जाते; पण दुसऱ्यांकडून मात्र तें हवें तसें वठूं लागलें नाहीं. या आरोपाचा पुरावा पुढेंमागें दिला पाहिजे, नाहींतर बेअब्रूची फिर्याद करून घेण्यास तयार झालें पाहिजें, हें आम्ही जाणून आहों!

*

# मूळ पाया चांगला पाहिजे

धर्मसुधारणा, आचारसुधारणा, राजकीय सुधारणा वगैरे वर्ग केवळ व्यवस्थेकरितां केलेले आहेत. त्यांपैकीं अमुकास पहिला नंबर, अमुकास दुसरा नंबर, अमुकास तिसरा नंबर, असें कांहीं ठरवितां येणार नाहीं. ते सर्व मनुष्यांच्या वेगळाल्या व्यवहारांचे व्यंजक होत, व त्या सर्वांची एकसमयावच्छेदें करून सुधारणा होत जाणें, म्हणजेच मनुष्यांची किंवा त्यांनीं वसविलेल्या राष्ट्रांची सुधारणा झाली, असें म्हणतां येईल, हें आम्हीं वेळोवेळीं दाखविलेंच आहे. परंतु तें सर्वांस संमत नाहीं, असें भोवतालच्या स्थितीवरून दिसतें. कित्येकांस वाटतें कीं, राजकीय सुधारणा सोपी आहे. सामाजिक सुधारणेविषयीं जशीं रणें पडतात, तशी या राजकीय सुधारणेची गोष्ट नाहीं. त्याविषयीं सर्व लोकांचें एकमत आहे. याकरितां सामाजिक सुधारणेविषयीं व्यर्थ खटपट करून, लोकांच्या शिव्याशापास पात्र होण्यापेक्षां, व आपसांत कलह माजवीत बसण्यापेक्षां, सर्वांनी एकदिलानें राजकीय सुधारणेच्या मागें लागावें, हा उत्तम पक्ष होय. वरील उपदेश योग्य आहे; अशी आमची खात्री असूनही लोकसमुदायास न रुचणाऱ्या गोष्टी आम्ही आग्रहानें पुढें आणीत असतों, तर त्यांत आमचाच दोष झाला असता. परंतु वरील उपदेश करणारांनीं नुसती वर वर नजर दिली आहे. त्यांनीं शांतपणानें खोल विचार केला असतां, त्यांचें मत खचित आमच्याप्रमाणें झाल्यावांचून राहणार नाहीं, व तें होईपर्यंत, ज्या राजकीय सुधारणेपासून आपले सर्व पुरुषार्थ आपणांस प्राप्त होतील अशी कित्येकांची समजूत आहे, ती राजकीय सुधारणाहे होणें शक्य नाहीं, हें आम्ही दाखविणार आहों.

राजकीय सुधारणा आम्हांस पाहिजे, असें आम्ही कां म्हणतों? तर त्यापासून नफा होईल असें आम्हांस वाटतें म्हणून. सामाजिक सुधारणा आम्हांस कां नको? त्यापासून आमचें नुकसान होईल असें आम्हांस वाटतें म्हणून. तात्पर्य कोणती गोष्ट इष्ट आहे, व कोणती गोष्ट इष्ट नाही, हें आपण केवळ नफ्यातोट्याच्या तारतम्यावरूच ठरवितों व येथेंच चूक होते. हें आमचें म्हणणें सकृतदर्शनीं चमत्कारिक असें भासेल, व तें तसें भासावें यांतही नवल नाहीं. कारण कीं, आजपर्यंत जगाचे सर्व व्यवहार नफातोट्यावर दृष्टी देऊनच झाले आहेत. हल्लींही

होत आहेत, व पुढेंही होत राहतील, याविषयीं आम्हासही शंका नाहीं. मग असें असून, येथेच चूक होते असें आम्ही कसें म्हणतों, अशी पृच्छा सहज होणारी आहे, व त्यांचें उत्तर देण्याच्या ऐवजीं आम्हीही वाचकांस कांहीं उलट प्रश्न करतों, व त्यांचें जें उत्तर; तेंच वरील प्रश्नाचें उत्तर होय. 'धर्म' या सदराखालीं ज्या शेकडों बऱ्यावाईट गोष्टी आपण करतों, त्यांपैकीं बहुतेक फायद्याच्या दृष्टीनेंच आपण करतों. अमुक झाल्यास अमुक करीन, तमुक झाल्यास तमुक करीन, अशा अटीवरच शेंकडा नव्याण्णव लोकांचे शेंकडा नव्याण्णव धर्माचार होत असतात हें आपणा सर्वांस माहीत आहेच. बायकांचें वपन कां करावें? तर त्यांच्या कबरीबंधानें नवऱ्यास बांधलें जाऊं नये म्हणून. ऋतुप्राप्तीपूर्वीच कन्येचा विवाह कां केला पाहिजे? तर आपल्या ४२ कुळ्या नरकांत जाऊं नयेत म्हणून. सती कां जावें? तर तसें केल्यानें अनंत कालपर्यंत स्वर्गसुख मिळेल म्हणून. तात्पर्य, काहींना कांहीं फायदा होईल; अशी खरी किंवा खोटी समजूत झाल्यावांचून, तो तो मनुष्य तें तें धर्माचरण करीत नाहीं. परंतु असें असूनही निष्काम भक्तीचा महिमा अधिक कां वर्णिला जावा; या प्रश्नाचें उत्तर ज्यास देतां येईल, त्यास आमच्याही म्हणण्याचा अर्थ समजेल. अमुक गोष्ट कां केली पाहिजे, तर तें माझें कर्तव्य आहे म्हणून, व अमुक गोष्ट कां केली पाहिजे, तर त्यापासून मला फायदा होतो म्हणून, या दोन गोष्टींत फारच मोठा भेद आहे. आपलें कर्तव्य समजून एखादी गोष्ट करणारा मनुष्य जसा नेटानें व निश्चयानें ती करतो; तसा फायद्यावरच नजर देणारा मनुष्य करूं शकणार नाहीं.

वरील गोष्टी आतां आपण लोकांस प्रिय असणाऱ्या राजकीय सुधारणेसच लावून पाहूं. कायदेकौन्सिलांत लोकनियुक्त सभासद असले पाहिजेत असें राष्ट्रीय सभेचे चालकही म्हणतात, व इतर सर्व लोकही म्हणतात. परंतु या दोघांची दृष्टी अगदीं वेगळी आहे. ज्या कायद्यांचा अंमल अमुक एका लोकसमुदायावर होत असेल, तर कायदे करणें हा केवळ त्याच लोकसमुदायाचा हक्क आहे; ते करण्याचा दुसऱ्या कोणासही अधिकार नाहीं, हें प्रमेय पुढें ठेऊन वर्तन करणें, व ज्याचे त्यानें कायदे केल्यास त्यापासून अधिक सुख होतें; हा सिद्धान्त पुढें ठेऊन वागणें यांत जमीन अस्मानाचें अंतर आहे. पुराणांतरीं वर्णन केलेल्या रामचंद्रापेक्षांही अधिक न्यायी, अधिक प्रजाहितैषी असा राजा असून, त्यानें केलेल्या कायद्यापासून प्रजेस कितीही सुख होत असलें, तथापि ते करण्याचा त्यास अधिकार पोंचत नाहीं, या तत्त्वावर नजर देऊन फायद्याकडे दृष्टी न देतां आपले गेलेले हक्क योग्य उपायांनीं मिळण्याकरितां जे लोक, हें आपलें कर्तव्य समजून निश्चयानें यत्न करीत आहेत, ते सामाजिक सुधारणा नको व राजकीय

सुधारणा पाहिजे, असा आग्रहही धरीत नाहींत.

इंग्रज गुन्हेगाराचा न्याय इंग्रज न्यायाधीशानेंच करावा व नेटिव्ह गुन्हेगाराचा न्याय तेवढा वाटेल त्या न्यायाधीशानें करावा, असा पक्षपात कां? गुन्हेगाराचा न्याय तोडणें हें कांहीं त्याच्या रंगावर अवलंबून नाहीं. काळ्या रंगाच्या मनुष्यानें एखादा गुन्हा केल्यास त्याचा न्याय करण्याची ज्यास योग्यता आहे, तोच न्यायाधीश; तोच गुन्हा करणाराचा रंग गोरा असला कीं, त्याचा न्याय करण्यास अपात्र कसा होतो? हे प्रश्न सर्वांस सुचणें अवघड नाहीं. परंतु त्यांचा योग्य निकाल होण्यास नुसतें त्या प्रश्नांचें शाब्दिक ज्ञान उपयोगी नाहीं. प्रश्न करणारांचें अंत:करण व ओठ यांच्यांत विसंगतता असेल, तर त्यानें कितीही आक्रोश केला तथापि व्यर्थ होय. परंतु त्या दोहोंमध्यें संगती असेल तर, विशेष आक्रोश करण्याचीही जरूर पडत नाहीं. अंत:करण व ओठ यांच्यांत तारायंत्र सुरूं असेल, तर हळू उच्चारलेल्या शब्दासही विलक्षण जोर येतो व त्यांपुढें सर्वांस मान डोलवावी लागते. खऱ्या साध्वीच्या ईषत् वक्रदृष्टीनें मोठमोठ्या बलाढ्य कामांधांची गाळण उडून जाते. आपण स्वतां अन्यायाचें वर्तन करणारास दुसऱ्याच्या अन्यायाबद्दल बोलण्याचा अधिकार पोंचत नाहीं इतकेंच नाहीं; तर उलट त्याची जीभ कचरूं लागते, त्याचा शब्द तोंडांतल्या तोंडांत घोंटाळूं लागतो, व असें झालें म्हणजे सिंहाचें कातडें पांघरणाऱ्या गर्दभाच्या, बाहेर डोकावूं पाहणाऱ्या लंबकर्णावरून, त्याची परीक्षा होते, व त्यास दुसरे भीत नाहींत. इतकेंच नाहीं; तर स्वत:ची फजिती उडण्याची मात्र पाळी येते.

महाराची सावली पडली असतांही विटाळ मानणारे लोक कितीही लांब जिभा करून 'आमचा रंग काळा असला व तुमचा रंग गोरा असला म्हणून काय झालें? रंगावर कांहीं मनुष्याची पात्रापात्रता ठरत नाहीं' वगैरे गोष्टी प्रतिपादूं लागले, तथापि त्यांच्या शब्दांस जोर येण्याचा संभव नाहीं, व त्यांचा परिणामही होणें नाहीं. त्या शब्दांस जोर येऊन, इतरांनीं ते ऐकलेच पाहिजेत अशी खरोखर इच्छा असल्यास, "ब्राह्मणोऽस्य मुखमासीत" हे पक्षपाती शास्त्र झुगारून देऊन, आपल्या मांडीला मांडी भिडवून शाळांतून बसण्यात महारास मोकळीक दिली पाहिजे. पुरुषाची बायको मेल्यास त्यास जशी पुनर्विवाह करण्यास मोकळीक आहे, त्याप्रमाणें विधवांसही दुसरा नवरा करण्याची परवानगी पाहिजे. बायकांच्या केसांचा जर मेलेल्या नवऱ्याच्या गळ्यास फांस बसतो, तर पुरुषांच्या शेंडीचाही मेलेल्या स्त्रीस कां फांस बसूं नये? व एकास जर कोणी संन्याशी करीत नाहीं तर दुसरीला मात्र न्हाव्यापुढें कां बसवावी? पुरुषाला बायको आवडत नाहीं, येवढ्याच शुष्क कारणावरून वस्तुत: काडी मोडून देण्याचा त्यास जर अधिकार

आहे, व तसें करून तो जर धर्मबाह्य होत नाहीं, तर एखाद्या स्त्रीला नवरा आवडत नसल्यास, तिनेंही त्याला काडी मोडून दिली, तर तिच्या नांवानें मात्र खडे कां फोडावेत? अटकाव करणें असेल तर दोघांसही करा, नसेल तर दोघांसही मोकळीस द्या. महार आणि ब्राह्मण, विधवा आणि विधुर व स्त्री आणि पुरुष यांच्यामधील अन्यायमूलक व्यवहार बंद करणें, आपल्या स्वत:च्या हातीं असून तें करण्याची ज्यांना नुसती वासनाही झाली नाहीं, अशा लोकांनीं जिंकणारे व जिंकलेले यांच्यांतील भेद मोडून टाकण्याचा विचार मनांत तरीं कशास आणावा? व आणला तरी तो सिद्धीस कसा जावा?

तात्पर्य, लोकांनीं आपल्याशीं जसें वागावें असें आपणास वाटतें, तसेंच आपणही दुसऱ्याशीं वागण्यास तयार व्हावयाचें. त्यापासून हित असो वा अहित असो, त्याविषयीं विचार करीत बसावयाचें नाहीं. खरें बोलल्यापासून नफा होवो, नुकसान होवो. परंतु तसें करणें हें आपलें कर्तव्य होय, म्हणून जसें खरें बोलावयाचें किंवा नीतीनें वागलें असतां तोटा होईल अशी भीति असूनही जसें नित्याचरण सोडावयाचें नाहीं, तसेंच कोणतीही गोष्ट असो, त्यापासून न्याय होत आहे, किंवा ती करणें आपलें कर्तव्य आहे, एवढ्या विचारावर तिच्या मागें लागावयाचें. त्यापासून होणाऱ्या सुखदु:खाची भवतिनभवति करीत बसावयाचें नाहीं, असा पूर्ण निश्चय करून जर लोक सुधारणेची कास धरतील तर ही सुधारणा पाहिजे व ती नको हा तंटा मिटणार आहे, व सर्वच सुधारणा एकसमयावच्छेदेंकरून होऊं लागतील. हल्लीं राजकीय सुधारणेस सर्व लोक अनुकूल आहेत, असें जरी बाह्यात्कारें दिसलें, तथापि त्यांत जीव नाहीं. राष्ट्रीय सभेसंबंधानें अंत:करणापासून ज्यांनी श्रम केले आहेत, व आपल्या पदरास ज्यांनी खार लावून घेतला आहे, अशा सर्व इलाख्यांतील लोकांची याद केली असतां, ते एकूणएक लोक जितके राजकीय सुधारणेचे चहाते आहेत, तितकेच सामाजिक सुधारणेचे व धर्मसुधारणेचेही चहाते आहेत, असें दिसून आल्यावांचून राहणार नाहीं; व सुधारक आमचे पुढारी नाहींत म्हणून कंठशोष करणारे लोक जसे सामाजिक सुधारणेच्या विरुद्ध आहेत, त्याप्रमाणेच राजकीय सुधारणेंतही त्यांचें पाठबल तितक्यापुरतेंच आहे, हेंही सिद्ध करून दाखविणें कठीण नाहीं, व यावरून पाहतां सामाजिक परिषदेची उत्तरोत्तर भरभराट होणें, हेंच राष्ट्रीयसभेच्या खऱ्या भरभराटीचें चिन्ह होय.

*

# हे तुमचे पुढारी नव्हत

जुन्या लोकांस आम्ही विनयपूर्वक व खात्रीपूर्वक असें कळवितों कीं त्यांनी **प्रो. जिन्सिवाले व प्रो. टिळक** अशा लोकांस आपले पुढारी समजूं नये. ज्याप्रमाणें आमच्या मतांत व त्यांच्या मतांत थोडासा फरक असल्यामुळें, त्यांची सुधारकांत गणना करतां येत नाहीं असें नाहीं, त्याप्रमाणें जुन्या लोकांच्या आणि त्यांच्या मतांत जी अल्प साम्यता आहे, तीमुळें ते जुन्या लोकांचे अग्रणी होऊं शकत नाहींत. जर जुने लोक मिथ्या भ्रमानें अशांस आपले पुढारी समजून तदनुषंगानें वागूं लागतील, तर अखेरीस गोत्यांत पडून पश्चाताप पावतील, याचा आम्हांस बिलकूल संशय नाहीं! वेद पौरुष आहेत, असा प्रो. जिन्सिवाले यांचा आग्रह आहे. या मताचें ते आज कित्येक वर्षे उघडपणें प्रतिपादन करीत आहेत; व ज्याप्रमाणें गेल्या उन्हाळ्यांत त्यांनीं प्रतिपादिलेल्या विशिष्ट मतामुळें त्यांना आपल्या नोकरीचा राजीनामा द्यावा लागला तरी त्यांनी त्याची पर्वा केली नाहीं, त्याप्रमाणें पूर्वपद्धतीच्या यच्चावत ब्राह्मण लोकांनीं जर असा आग्रह धरिला कीं, तुम्ही वेद अपौरुष म्हणा, नाहीं तर आम्ही तुम्हांस वाळींत टाकूं, तर प्रो. जिन्सिवाले सगळ्या आचारवान ब्रह्मवृंदांस न जुमानतां, त्यांच्या मतानें वेदाच्या अस्तित्वाविषयीं जो ग्रह झाला आहे, तो कधींही सोडणार नाहींत; अशाविषयीं आम्ही पाहिजे तसली पैज मारण्यास तयार आहों! प्रो. जिन्सिवाले थोडेसे कर्मठ आहेत, येवढ्यामुळें जुन्या लोकांना त्यांच्या वेदविषयक विलक्षण मताचा राग येत नाहीं, याचा आम्हांस मोठा अचंबा वाटतो! वेदांचें अपौरुषत्व काढून घेतल्यावर वैदिक धर्माचा पायाच नाहींसा झाला, हें त्या धर्माच्या कैवाऱ्यांच्या लक्षांत येऊं नये काय? वेद हे मनुष्यकृत ग्रंथ आहेत, असें प्रतिपादणाऱ्या गृहस्थास; पाहिजे तर अजागळ पत्रकर्ते त्याच्या बाह्याचरणास भुलून जाऊन ते हिंदुधर्माचे या युगांतील आधारस्तंभ आहेत, असे त्याचे पवाडे गावोत, व त्यांचा स्तुतिपाठक चांगला खुलण्यासाठीं आमच्यासारख्यांचीं हवी तितकी निंदा करोत; पण जे विद्वान शास्त्री किंवा आचारसंपन्न वैदिक आहेत, त्यांनीं श्रीधरपंतांच्यासारख्यांत आणि आमच्यांत विशेष भेद आहे, असे समजणे हा मोठा प्रमाद होय. कांहीं विशेष कारणामुळें आमच्या त्यांच्यांत कितीही अंतर क्षणभर दृष्टीस पडलें, तरी त्यांचें आमचें शिक्षण

एकाच पद्धतीचें असल्यामुळें, सूक्ष्म विचाराअंतीं असें दिसून येईल कीं, एकंदरीत ते आम्हांस जितके जवळ आहेत, तितके जुन्यां लोकांस नाहींत! प्रो. जिन्सिवाले यांचें असें म्हणणें आहे कीं, ज्याला अनुकूल असेल त्यानें आपल्या बायकोकडून बी. ए. च्या परीक्षेचा देखील अभ्यास करविण्यास हरकत नाहीं. एकदां खुद्द स्वतःच्या पत्नीस पहिली लेडी ग्रॅजुएट करण्याचा त्यांचा विचार होता. तसेच **'यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं नाचरणीयं'** या पंथाचे ते अनुयायी असल्यामुळें, आपल्या बायकोस आपल्याबरोबर हिंडावयाला घेऊन जाणें, ही गोष्ट जरी त्यांच्या हातून होण्यासारखी नाहीं, तरी ज्या बायकांस घरांतील काम करावें लागत नसल्यामुळें कोणत्याही प्रकारचा व्यायाम होत नाहीं; अशांनीं आपल्या नवऱ्यांबरोबर किंवा चाकरांबरोबर सकाळसंध्याकाळ उघड्या हवेंत सहल करण्यास जाण्यास हरकत नाहीं, असें त्यांनीं स्पष्टपणें म्हणून दाखविलें आहे. जुन्या पद्धतीच्या किती सुशिक्षित लोकांस प्रो. मजकुरांचीं ही मतें मान्य होणार आहेत? किंवा जर श्रीधरपंत आमच्या बरोबर उद्यां म्हणूं लागले कीं, रामकृष्ण हे कांहीं देवावतार नाहींत; आधुनिक राजांसारखे ते या भरतखंडांत पूर्वकालीं होऊन गेलेले राजे होत; महाभारत व रामायण हे केवळ इतिहासग्रंथ आहेत; भगवंतांनीं अर्जुनास जी भगवद्गीता सांगितली, ती प्लेटो किंवा ॲरिस्टॉटल यांच्या नीतिविषयक व वेदांतविषयक ग्रंथाप्रमाणें व्यासांच्या विचाराचें बाड आहे, दुसरें कांहीं नाहीं; एका हिंदु राजानें दक्षिणेकडील मूळच्या लोकांस जिंकून गोदेपासून कावेरीपर्यंत अथवा लंकेपर्यंत आर्य लोकांच्या ज्या वसाहती केल्या त्यांचा इतिहास हेंच रामायण होय; आणि वाल्मिकी हा त्याचा कर्ता होय, अशा प्रकारचे अभिप्राय जर आमच्या पुराणांविषयी ते देऊं लागले, आणि-ते देऊं लागले तर ते असेच देतील याविषयीं आम्हांस बिलकूल शंका नाहीं- तर आमचे शास्त्री व वैदिक त्यांस काय म्हणतील? तेव्हां या भोळ्या जुन्या लोकांस आम्ही येवढेंच सांगतों कीं, दुर्दैवानें आम्हां नवीन पद्धतीच्या लोकांत सध्यां जो स्वल्प मतभेद झाला आहे, तेवढ्यावरून त्यांनीं प्रो. जिन्सिवाले किंवा त्यांसारखेच इतर अर्वाचीन विद्वान् आपल्या पंथाचे आहेत, व त्यांस आपलें धुरीणत्व देण्यास कांहीं हरकत नाहीं, अशा मोहांत त्यांनीं पडूं नये. हा इशारा त्यांनी विशेषतः प्रो. टिळक यांच्या संबंधानें मनांत ठेवण्यासारखा आहे; कारण **रा. रा. बाळ गंगाधर टिळक** हे, प्रसंग पडल्यास, प्रो. जिन्सिवाले यांच्यापुढें जातील, इतकेंच नाहीं, तर जातिबाहुल्यामुळें अगोदरच जेरीस आलेल्या या हतभाग्य देशांत अधिक जाती होऊं नयेत, म्हणून कायद्यानें किंवा लोकमतानें जेवढ्या सुधारणा साऱ्या लोकांस ग्राह्य होतील, अशाच करण्याचे हे दिवस आहेत, असें म्हणणाऱ्या

आमच्यासारख्यांपुढेंही दोन पावलें जाण्यास हे डरणारे नाहींत, हें थोड्या दिवसांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या स्वदस्तूरच्या विनंतीपत्रावरून कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. या लेखकाच्या मतांत आणि रा. टिळक यांच्या मतांत, कांहीं लोक म्हणतात त्याप्रमाणें, जमीनअस्मानाचें अंतर असतें, तर नोकरीचा मार्ग सोडून सामान्य देशकार्यासाठीं आम्ही एके ठिकाणीं कधींच आलों नसतों, व बऱ्यावाईट रीतीनें गेलीं दहा वर्षे आमच्या हातून एकत्र निघालीं नसतीं. पण वारंवार होतें काय कीं, जसजसें वय वाढत जातें तसतसा मताभिमान आणि आग्रह वाढत जातो म्हणून म्हणा, किंवा कोणत्याही दोन व्यक्तींत केवढेंही मतसादृश्य असलें तरी तीं मतें अंमलांत आणण्यासाठीं ज्या उपायांची योजना करावयाची, त्यांविषयीं त्यांत जो मतभेद उत्पन्न होतो; तो कधीं कधीं मूळ मतांच्या सादृश्याहून प्रबलतर होऊन बसतो म्हणून म्हणा, जे एकदा सामान्य संकल्प करून, स्वार्थाचें किंवा परमार्थाचें कांहीं कृत्य हातीं घेतात, त्यांचा पुढे बेबनाव होऊं लागतो, व शेवटीं त्यांची फुटाफूट होण्याचाही प्रसंग येतो! ज्या **केसरीसाठी** या लेखकास कारागृहवास सोसावा लागला, व जो त्यानें उदार महाराष्ट्रीयांच्या गुणग्राहित्वामुळें आनंदानें साहिला; त्या पत्राचा आणि याचा वियोग होऊन, हा नवीन **सुधारक** अस्तित्वांत येण्यास, किंवा येथें बऱ्याच प्रतिष्ठेस आलेल्या एका लोकोपयोगी संस्थेच्या मुख्य चालकांपैकीं दोघा गृहस्थांनीं, विशेषत: रा. टिळकांनीं, आपल्या कामाचा राजीनामा देण्यास, अशा प्रकारचा साधनसंबंधक मतभेद कारण झाला आहे, दुसरें कांहीं नाहीं. थोड्याच दिवसांत तुळशीबागेंतील सभेच्या बहुतेक पुरस्कर्त्यांस स्पष्टपणें असें दिसून येईल कीं, रा. टिळक हे एका गोष्टीशिवाय दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें त्यांचें पुढारी होण्यासारखे नाहींत. ज्या सुधारणा आम्हीं कायद्यानें कराव्या, असें म्हणत आहों, त्या लोकांच्या लोकांनींच कराव्या; हें काय तें गरम व थंड्या सुधारकांतील मतभेदाचें मूळ कारण आहे. स्त्रीशिक्षण, बालविवाहनिषेध, वपननिषेध, बालावृद्धविवाहप्रतिबंध, पुनर्विवाह, कन्याविक्रियनिषेध, मदिरापाननिषेध वगैरे सर्व सुधारणा जशा एका पक्षास पाहिजे आहेत, तशा दुसऱ्यासही पाहिजे आहेत. असें असून सध्या उभयतांत जें रण माजलें आहे तें, त्या अंमलांत कोणत्या साधनांनीं आणाव्या, याविषयीं मतभेद असल्यामुळें माजलें आहे. कदाचित् कांहीं दिवसांनीं हें भेदकारण नाहींसें होऊन, सर्व सुधारकांची एकच फळी होण्याचा संभव आहे. आणि सुदैवानें असें झालें तर तुळशीबागेंतल्या सभेचे बहुतेक पुरस्कर्ते काय करतील? ज्या सुधारणांस रा. टिळक अत्यंत अनुकूल आहेत, त्यांचा त्यांनीं कायदेवाल्या सुधारकांविरुद्ध खवळून गेलेल्या तुळशीबागेंतील श्रोतृसमुदायापुढें, इष्ट हेतु साधण्यासाठीं बुद्ध्या

बिलकुल उल्लेख केला नाहीं, व त्या समुदायास मान्य होईल अशा प्रकारची टीका **मि. मलबारी व सुधारक** यांवर केली, येवढ्यावरून त्या सभेच्या बहुतेक पुरस्कर्त्यांनीं असें समजूं नये कीं, सामाजिक सुधारणेच्या कामीं सरकारनें सर्व लोकांस लागूं पडणारा कायदा करूं नये, यापलीकडे रा. टिळक यांच्या मतांत आणि आपल्या मतांत कोणत्याही प्रकारचें साम्य आहे. सोळा वर्षांच्या आंत मुलींचीं लग्नें होऊं नयेत, कोणीं कोणास हुंडा देऊं नये, विधवांचें वपन करूं नये. चाळिसाव्या वर्षांपुढें मुळींच लग्न करूं नये, किंवा करणें झाल्यास विधवेशीं करावें, मद्याला स्पर्श करूं नये, प्राप्तीचा दहावा हिस्सा सार्वजनिक कामाकडे द्यावा वगैरे गोष्टी ज्यांस मान्य असतील त्यांनीं एक मंडळी स्थापून, तिनें त्या अमलांत आणण्याचा प्रयत्न करावा; व जो गृहस्थ एकदां अशा मंडळीचा सभासद होईल, तो तींतून पुढें बाहेर पडण्याची इच्छा दाखविल, किंवा हे नियम मोडील तर त्याला सरकारकडून कडक शिक्षा करवितां यावी, म्हणून अशी मंडळी रजिष्टर करावी- वगैरे. रा. टिळक यांचे विचार तुळशीबागेतील सभेसाठी काढलेल्या निमंत्रणचिठ्ठीवर सह्या घालणाऱ्या गृहस्थांपैकीं कित्येकांस रुचणार आहेत, कोण जाणे! अशा प्रकारची मंडळी स्थापण्याच्या प्रयत्नांत रा. टिळक खरोखरीच गुंतले आहेत, असें आम्ही ऐकतों, व ती स्थापण्यांत आल्यास ते तिचे सभासद होतील, आणि आतांच बारावें वर्ष लागलेल्या आपल्या मुलीचें लग्न, तिच्या सोळाव्या वर्षांपर्यंत करणार नाहींत याविषयीं आम्हांस काडीयेवढा संशय नाहीं. कारण, रा. टिळकांच्या आणि त्यांच्या प्रतिपक्ष्यांच्या विचारांत व स्वभावांत केवढाही भेद असला, तरी त्यांना येवढें कबूल करणें भाग आहे कीं, जी गोष्ट एकदां टिळकांच्या मनास रास्त अशी वाटली; तिचा ते कितीही नुकसान झालें किंवा केवढाही लोकापवाद आला, तरी प्रत्यादेश करणार नाहींत हा त्यांचे अंगीं प्रशंसा करण्यासारखा गुण आहे. तेव्हां जुन्या पद्धतीच्या लोकांस आम्ही असें विचारतों कीं, टिळकांचे वर निर्दिष्ट केलेले सुधारणाविषयक विचार आणि ते अंमलांत आणण्यासाठीं त्यांनीं चालविलेले प्रयत्न तुळशीबागेंतील 'प्रचंड' श्रोतृसमुदायापैकीं किती इसमांस अभिमत आहेत, व रजोदर्शनोत्तरही आपल्या मुलींस अविवाहित ठेवणाऱ्या मंडळीचे सभासद किंवा पुढारी टिळक झाले; तर त्या समुदायापैकीं किती वजनदार शास्त्री, किती वैदिक, किती जहागीरदार, नोकरीवर असलेले किंवा पेन्शनदार, किती रावबहादुर व किती सामान्य लोक त्यांस आपल्या सभांचे चिटणीस करण्यास किंवा त्यांवर समाजाचें पुढारीपण सोंपविण्यास तयार आहेत? आम्हांस तर असें वाटतें कीं, ज्यांना आपला पूर्वापार चालत आलेला धर्म, आपल्या रीतीभाती आणि आपले आचार निर्दोष वाटत आहेत, व त्यांत सरकाराने

किंवा सुधारकांनीं फेरफार करण्याचा प्रयत्न करणें म्हणजे त्यांचे ठाई वैरूप्यता आणून देशाचें नुकसान करणें असें वाटत आहे, त्यांनीं वेळीच जागें होऊन, असें समजूं लागावें कीं, प्रो. जिन्सिवाले, प्रो. टिळक, रा. रा. म. चिं. आपटे यांसारख्या अर्वाचीन विद्वान गृहस्थांनीं प्रसंगविशेषीं विशेष कारणासाठी एकाद्या बाबींत जुन्या लोकांच्या छंदाप्रमाणें वर्तन केलें, किंवा जुन्या लोकांच्या एखाद्या मतास आपली अनुकूलता दाखविली, तर तेवढ्यावरून ते आपले पुढारी होण्यास व अर्वाचीन सुधारणांविरुद्ध आपली सेना नेण्यास योग्य आहे हे गृहस्थ खचित नाहींत. जर या गोष्टीचा जुने लोक शांतपणें विचार न करतील, व अशा गृहस्थांकडून मिळणाऱ्या क्षणिक मदतीस भुलून जाऊन त्यांची ते कास धरतील, तर अखेरीस ठार बुडतील, असें आम्हांस वाटतें!

*

# तर मग जुन्यांचे पुढारी असावे तरी कसे?

अर्थात् ज्यांत जुन्या पद्धतीचे सद्‌गुण पूर्णपणें भरले आहेत व जुन्या लोकांनीं निषिद्ध मानलेल्या गोष्टींपासून जे अत्यंत अलिप्त आहेत, अशा गृहस्थांनींच त्यांचें पुढारीपण पतकरल्यास जुन्या मतांस व जुन्या आचारांस कांहीं वर्षें टिकाव धरतां येणार आहे. 'कांहीं वर्षें असें आम्हीं जाणूनबुजून म्हणतों. कारण, जुन्या लोकांनीं आपले भीष्माचार्यासारखे योद्धे जरी पुढें घातले तरी अगोदरच मन्वंतर इतकें बदलून गेलें आहे, व इतउत्तर तें इतक्या झपाट्यानें बदलत जाणार आहे कीं, त्यापुढें भीष्मद्रोणकृपादिकांसारख्या पूर्वपद्धतीच्या योद्ध्यांचे कांहींएक चालेनासें होऊन त्यांचा शस्त्रसंपात निष्फल होईल, व कांहींवर तर प्रत्यक्ष डोळ्यासमोर प्रतिपक्ष्यांनी हस्तगत केलेली विजयश्री पहाण्याची पाळी येऊन, निराशेनें या जगद्रणांगणांतून खेद करीत परलोकास जाण्याचा प्रसंग गुदरेल, असा प्रसंग बराच टाळतां येण्यास एकच उपाय आहे, तो हा कीं पुढारी निवडतांना फार चांगली खबरदारी घेणें. यांत चुकी झाली कीं निवडणारे लोक जुने असोत किंवा नवे असोत, ते उपहास्यतेस पात्र होणारच. समाजाग्रणींत कोणत्याही प्रकारचा दुर्गुण असतां कामां नये. इतकेंच नाहीं तर त्याचे अंगीं प्रशंसनीय सद्‌गुणांचा संकर असला पाहिजे. कित्येक लोकांची अशी समजूत असते कीं, ज्याच्या अंगी एक दोन चांगले गुण आहेत, त्याच्या अंगीं पांच-चार वाईट गुण असले तरी त्याला समाजाचें पुढारीपण देण्यास कांहीं हरकत नाहीं. पण आमच्या मतें ही समजूत फार गैर आहे.ज्याचें सारें आयुष्य द्रव्यार्जनांत किंवा वरिष्ठांची हांजी हांजी करण्यांत गेलें, जो स्वहितासाठीं लोकांचें हवें तितकें नुकसान करण्यास भीत नाहीं, बाटलाबाई ज्याची सखी झाली आहे, ज्याच्या कामुकतेला कशाचाही निर्बंध नाहीं, खोटें बोलण्यांत कांहीं दोष आहे असें ज्यास वाटत नाहीं, जो सत्कृत्यासाठीं उदार हात कधींही पुढें करीत नाहीं, ज्ञान संपादण्याचा ज्याला पराकाष्ठेचा तिटकारा आहे, खोटी मिजास व खोटी प्रतिष्ठा हीं ज्यास अत्यंत प्रिय आहेत, शुष्क वाचालता करण्यांत ज्यास पराकाष्ठेचा आनंद वाटतो, आपल्या थोड्या फायद्यासाठीं गांवाचें किंवा राष्ट्राचें नुकसान करण्यास जो तयार असतो, त्याला दुसऱ्याचें बोलणें ऐकून घ्यावेसें वाटत नाहीं, दुष्कर्मांनीं संपादिलेल्या द्रव्यापासून

उत्पन्न झालेल्या पापाचे क्षालन ब्राह्मणभोजनें घालून देवालयें बांधून, किंवा व्रतवैकल्यें अथवा यात्रा करून होतें, असें जो समजतो; न्याय, सत्य, शांति अनुकंपा वगैरे गुण त्याच्या अंत:करणांत वसत नाहींत- सारांश ज्याचें नांव ऐकल्याबरोबर किंवा मूर्ति पाहिल्याबरोबर श्रोत्याच्या किंवा प्रेक्षकाच्या मनांत भीति, प्रेम व पूज्यबुद्धि उत्पन्न होत नाहींत- असा मनुष्य लोकाग्रणी होण्यास अगदीं उपयोगी नाहीं. जुन्या लोकांचा पक्ष पडता आहे. तेव्हा निदान त्यांनीं तरी अशा प्रकारच्या दुर्गुणांपासून जो अत्यंत अलिप्त असेल, त्यासच आपला पुढारी नेमण्याबद्दल फार काळजी घेतली पाहिजे.

✷

# आम्हाला 'हलकट' कां म्हटले?

गेल्या लेखांत तुळशीबागेंतील सभेची हकीकत देत असतां, एका ठिकाणी कांहीं कारणानिमित्त दोनतीन विशेषणें योजण्यांत आलीं आहेत. त्यांपैकीं 'हलकट' या विशेषणानें बऱ्याच लोकांचें पित्त खवळून गेलें असावें, असें दिसतें. त्यासंबंधानें आमचें इतकेंच म्हणणें आहे कीं, त्या सभेचे पुरस्कर्ते फक्त बेकायदेवाल्यांचीच सभा भरविते, आणि कायदेवाल्यांस किंवा 'कायदेबाजांस' आपण होऊन बोलावून आणून त्यांचा उपमर्द न करते, तर तें विशेषण योजण्याचीच काय, पण त्या सभेविषयीं कोणत्याही प्रकारचा उल्लेख करण्याचीही गरज न पडती. शिवाय, रा. टिळक यांचें सुधारकांच्या संबंधानें उपहासपर भाषण चाललें असतां, ज्यांनीं आनंदप्रदर्शक टाळ्या पिटल्या तेवढ्यांसच आमची विशेषणें लागू असतां, तुळशीबागेंत जेवढे लोक जमले होते तेवढ्या साऱ्यांस उद्देशून आम्हीं तीं विशेषणें योजिलीं असावीं, असा तर्क करून पोकळ रागाचें अवडंबर घालण्यांत काय अर्थ आहे? तुळशीबागेंत ज्याप्रमाणें रामशास्त्र्यांसारखी एका प्रकारची मंडळी होती; त्याप्रमाणेंच आ. रा. म. ब. नूलकर, आ. रा. ब. रानडे, व डॉक्टर भांडारकर यांसारखी दुसऱ्या प्रकारचीही मंडळी होती. या मंडळींस आमच्याकडून कालत्रयींही असलीं विशेषणें लागण्याचा संभव नाहीं, हें उघडच आहे. तेव्हां तुळशीबागेंतील समग्र श्रोतृजनास तीं विशेषणें लावण्याचा इरादा नव्हता हेंही उघड आहे. तथापि गांवभर ढोलकीं वाजवून गोळा केलेल्या येवढ्या मोठ्या समाजांतील व्यक्तीन् व्यक्ती ज्याअर्थी या सभेच्या पुरस्कर्त्यांस सभ्य किंवा 'हलकटा' चा प्रतिभावी दिसत असावा, असें त्यांच्या मनाचा प्रतिध्वनि काढणाऱ्या कित्येक स्थानिक पत्रांतील लेखांवरून व आम्हांकडे आलेल्या पत्रांवरून अनुमान करण्यास जागा होत आहे; त्याअर्थी त्यांच्या सभ्यतेची व्याख्या आमच्या सभ्यतेच्या व्याख्येहून फार निराळी असावी, असें वाटतें. तथापि, जर या पत्रांत त्यांच्यासंबंधानें अशा तीव्र विशेषणांची योजना न व्हावी अशी त्यांची इच्छा असेल, तर त्यांनींही सुधारकांच्या संबंधानें कोठेंही बोलतांना किंवा लिहितांना तोंड आटोपून बोलत जावें म्हणजे झाले! जोंपर्यंत त्यांचेकडून असें होणार नाहीं; तोंपर्यंत क्रियाप्रतिक्रियेचे नियमास खळ पडेल असें आम्हांस वाटत नाहीं! अशा

संबंधानें बेअब्रूच्या फिर्यादीचा बागुलबोवा आम्हांस दाखविण्यांत कांहीं अर्थ नाहीं. त्यास आम्ही पक्कें जाणून आहों! उभ्या वर्गांतील कांहीं इसमांस उद्देशून अशी भाषा सकारण लिहिण्याबद्दल शेंडीजानवें टाकून देण्याचा प्रसंग ज्यावेळेस आम्हांवर येईल; त्यावेळेस निदान चारदोन वृद्धतरुण पत्रकर्त्यांस तरी येरवड्याच्या आनंदगृहांत सामाजिक विषयांची मनमुराद चर्चा करण्याकरतां आम्ही आपल्या बरोबर घेऊन जाऊं, अशी आमची पक्की खातरी आहे! कोठेंही असलेल्या चांगलेपणास दुखविण्याची आमची इच्छा नाहीं. पण वाईटाला वाईट म्हणण्यास असल्या दटावण्याने सुधारक केव्हांही भिईल, असें दिसत नाहीं!

*

# बोलके सुधारक, वागते सुधारक व सुधारणानिंदक

हे लोकांचे तीन वर्ग सुधारणापंथास लागलेल्या प्रत्येक देशांत केव्हाही दृष्टीस पडतात. ज्याअर्थी मनुष्यास चांगल्यावाईटाची निवडानिवड करण्याची बुद्धि व जें वाईट असेल त्याचा त्याग आणि चांगल्याचें संपादन करण्याचें मानसिक व शारीरिक सामर्थ्य आहे; त्याअर्थी पशूप्रमाणें त्याची स्थिति स्थिर न राहतां, कालमानाप्रमाणें तींत कमी-अधिक बदल होत जाणें स्वाभाविक आहे. ज्याप्रमाणें कालाचा क्रम थांबविणें अशक्य आहे, त्याप्रमाणेंच मनुष्याच्या स्थित्यंतरास खळ पाडणें अशक्य आहे. तथापि हें सत्य अज्ञ लोकांच्या लक्षांत नीट न येत असल्यामुळें, व आपण ज्या स्थितींत आहों तीच स्थिति अत्युत्तम असें अप्रबुद्ध जनावरांप्रमाणे त्यांस वाटत असल्यामुळें, कोणत्याही रीतीनें त्या स्थितींत बदल करूं पाहणारांचा ते द्वेष करतात, आणि त्यांचे श्रम निष्फळ होण्याचा आपल्याकडून होईल तेवढा प्रयत्न करतात. अशा नित्य कलहामुळें समाजांतील अवयवांचे प्रथम दोन स्थूल विभाग होतात; एक पुराणप्रियांचा व दुसरा सुधारकांचा. पुढें दुसऱ्याचे दोन पोटभेद होतात; एक बोलक्या सुधारकांचा व दुसरा वागत्या सुधारकांचा. ज्या वेळेस कांहीं केलें तरी समाजांतील बहुतेक लोक चांगल्या गोष्टीचा विचार करावयाचे नाहींत; इतकेंच नाहीं, तर जो ती करण्यास प्रवृत्त होईल, त्याचा ते छल करण्यासही सोडीत नाहींत अशी स्थिति असते; त्या वेळेस बहुधा अनेक प्रकारचे हाल व जाचणुकी सोसून व गरज पडल्यांस निराळीं जात करून घेण्यास किंवा मरण्यासही तयार होऊन, आपल्या विचाराप्रमाणें आचरण करण्यास प्रवृत्त होणारे मताभिमानी सुधारक फार निघतात. आजपर्यंत नवीन धर्मपंथाचे जे स्थापक झाले आहेत, त्यांचा इतिहास बहुधा अशा प्रकारचा आहे. साक्रेतीस, बुद्ध, महंमद, ख्रिस्त, ल्यूथर, राममोहन किंवा दयानंद यांपैकीं लहानमोठ्या प्राचीन किंवा अर्वाचीन पाहिजे त्या महत्पुरुषाचें चरित्र घ्या, त्यावरून असें दिसून येईल कीं, ज्या सुधारणा झाल्याच पाहिजेत असा त्यांच्या मनाचा दृढ ग्रह झाला होता, त्या सुधारणांस तत्कालीन बहुजनसमाज अत्यंत प्रतिकूल असल्यामुळें, एक तर आपला हेका आपण सोडावा, किंवा लोक जेवढा त्रास देतील तेवढा सहन करण्यास तयार होऊन आपला हेका आपण चालवावा- याशिवाय त्यांना दुसरा मार्ग नव्हता.

अशा स्थितींत लोकांच्या निष्ठुर दुराग्रहामुळें सुधारकांच्या अंत:करणांत पेटलेली ज्वाला लोकांच्या उपरोधक फुंकरांनीं न विझतां, अधिक जोरानें भडकूं लागते, आणि ती त्या सुधारकास मनाप्रमाणें आचरण करू लागल्याशिवाय चैन पडूं देत नाहीं. मनाची अशी अवस्था झाली असतां, विचाराप्रमाणें न वागण्यापेक्षां लोकांनीं केलेला छल सोसणें हेंच अधिक सह्य व सुखावह वाटतें; आणि म्हणून अशा काळांत **वागते** किंवा **करते** सुधारक निपजतात.

परंतु ज्या वेळेस ज्ञानप्रसारामुळें किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणामुळें लोकांची दुराग्रहबुद्धि किंचित शिथिल झालेली असते, व चर्चा केल्यानें, समजुतीच्या दोन गोष्टी बरेच दिवस सांगत राहिल्यानें, आणि अशाच प्रकारचे सामोपचाराचे दुसरे उपाय केल्यानें ते आपणांस हळूं हळूं हवें तसें वागूं देतील इतकेंच नाहीं, तर आपले अनुकरणही करू लागतील, अशीं चिन्हें दिसत असतात, त्यावेळेस लोकांपासून तुटून निघून किंवा त्यांचे यथेच्छ 'छी थू' करून घेऊन, आपली जात निराळी करण्यास किंवा लोकांशीं रक्तस्रावाचें रण माजविण्यास प्रवृत्त होणारे सुधारक निघत नाहींत. तात्पर्य, अशा दोन प्रकारच्या सुधारकांचे दोन वर्ग निघण्याच्या विशिष्ट वेळा आहेत. सध्यां आमच्या देशांत विशेषत: बोलके सुधारकच निघण्याची वेळ आहे; म्हणून जे बोलके सुधारक आहेत त्यांस सुधारणानिंदकांनीं किंवा वागत्या किंवा करत्या सुधारकपणाची फुकट ऐट मिरविणारांनीं "तुम्ही करून किंवा वागून कां दाखवीत नाहीं? स्वतंत्र जात कां करीत नाहीं?" असले अडाणीपणाचे प्रश्न विचारूं नये! फार कशाला? तुमच्या वागत्या किंवा करत्या **टिळक सुधारकाचेंच** उदाहरण घ्या. ज्यानें उपप्रतिसूचनेंत १६ वर्षांच्या आंत मुलीचें लग्न करूं नये, व प्राप्तीचा एक दशांश सार्वजनिक कामाकडे द्यावा, अशीं कलमें घातलीं; त्यालाच त्यासंबंधानें साक्षात् कांहीं करण्याच्या हेतूनें लोकांपुढें येण्याची बुद्धि झाली, तेव्हां सोळाचा आंकडा चौदावर व एक दशांशाचा एक विसांशावर आणून ठेवणें जरूर आहे, असें वाटलें किंवा नाहीं तें पहा! तसेंच, अशा रीतीनें स्थापलेल्या मंडळींपैकीं कोणत्याही इसमानें प्रतिज्ञाभंग केला असतां त्याला दंडण्याकरितां सरकारची मदत घेणें अवश्य आहे, असें वाटलें किंवा नाहीं तेंही पहा! तात्पर्य, या वागत्या किंवा करत्या **सुधारकास** प्रत्यक्ष क्रियेचा विचार मनांत आणिल्याबरोबर जर इतकी पीछेहाट करावी लागली, व "विधि, विकल्प, आणि निषेध" या त्रयीचें रडगाणें गावें लागलें, तर यासंबंधानें खरोखरींच कांहीं करून दाखविण्याचा प्रसंग आला असतां, बोलक्या सुधारकांप्रमाणें ते **दहा-सोळा** किंवा **अकरा-सतरा** तरी कबूल करतील किंवा नाहीं, याची मोठी शंका आहे! व अशी शंका येण्यास थोडासा आधारही

झाला आहे. कारण चौदा म्हणजे संपूर्ण तेरा असा अर्थ आधींच निघूं लागला आहे, असें ऐकतों! तेव्हां या कालांत बोलक्या सुधारकांची आणि पोकळ डौलाखातर स्वत:स वागते **सुधारक** म्हणवून घेणारांची वास्तविक स्थिति एकच आहे, असें म्हणण्यास हरकत दिसत नाहीं.

आतां सुधारणानिंदकांकडे किंचित् वळूं. यांची गतही पहिल्या दोघांप्रमाणेंच आहे. हें आपल्या बोलण्याच्या ऐटींत आपण समाजाचे स्थिरस्थाणू आहों, समाजास कल्याणकारक गोष्टी कोणत्या त्या आपणांसच समजतात, व त्यांचे संरक्षणकर्ते आपणच आहों, अशी आपल्या मनांतल्या मनांत व उघडपणें फुशारकी मिरवीत असतात. पण ज्याप्रमाणें पंचाक्षऱ्यानें भारलेलें भूत त्याच्या पाठीमागें, आरडाओरड करीत कां होईना, पण कसें तरी जातच असतें व त्याला वाटेल त्याप्रमाणें वागत असतें, याप्रमाणें इंग्रजांसारख्या परक्या लोकांचा अंमल; सुधारणाविषयक त्यांचे विचार; त्यांकडून आम्हांस मिळत असलेलें शिक्षण; कामधामाच्या निमित्तानें प्रत्येक दिवशीं त्यांशीं होत असलेला व्यवहार; त्यांनीं आपल्याबरोबर इकडे आणिलेल्या नानाप्रकारच्या यांत्रिक सुधारणा आणि स्थानांतराचीं साधनें- वगैरे गोष्टींनीं पंचाक्षऱ्याच्या मंत्राप्रमाणें भारून टाकलेला आमचा सुधारणानिंदकगण; डॉक्टरांची औषधें नि:शंकपणें घेऊन अप्रत्यक्ष रीतीनें मदिरा सेवन करीत आहे, आगगाडींत व आगबोटींत प्रवास करतांना हव्या त्या जातीच्या लोकांशीं चिकटून बसून जातीचे पाश शिथिल करीत आहे, साहेब लोकांशीं नित्य 'शेक हँड' करून किंवा त्यांच्या टेबलापाशीं खरडे घाशीत बसून पाहिजे तसला विटाळ प्रतिदिवशीं घरीं आणीत आहे, आगगाड्यांच्या किंवा आगबोटींच्या वेळा साधण्यासाठीं आणि लांबीचे प्रवास झपाट्यासरशीं उरकून घेण्यासाठीं स्नानसंध्येचा प्रत्याहार करीत आहे किंवा तीस कधीं कधीं मुळींच फांटा देत आहे, वर्तमानपत्रांत किंवा इतर ठिकाणीं होत असलेल्या चर्चेमुळें न कळत लग्नाचे वय हळूं हळूं वाढवित आहे, स्त्रीस अधिकाधिक स्वातंत्र्य देऊं लागला आहे, स्वेच्छेविरुद्ध धर्मविनाशक शाळांत आपलीं मुलें पाठवीत आहे, कामकाजाच्या संबंधानें हव्या त्या जातीच्या लोकांशीं स्नेह व व्यवहार करीत आहे, श्राद्धश्रावण्यादि धर्मकर्मांपासून कांहीं तरी प्राप्ति व्हावी, येवढ्यासाठीं सुधारकांच्या तब्येतीप्रमाणें त्यांस हव्या त्या कलावर नेत आहे, व कधीं कधीं त्यांचेकडून कांहीं कामें करून घेण्यासाठीं आपले हेके सोडीत आहे, हें त्यांचें लक्षांत न यावें, व जे लोक जाणूनबुजून अमुक सुधारणा केल्याच पाहिजेत असें उघडपणें प्रतिपादित आहेत, किंवा त्या स्वशक्तीप्रमाणें अमलांत आणीत आहेत, त्यांची थट्टा करण्यास त्यानें प्रवृत्त व्हावें, हें आश्चर्य नव्हे काय? अथवा यांत आश्चर्य तरी कसलें? अंतर्दृष्टि करून न

पाहणाऱ्या अज्ञ जनांनीं असें वागणें व बोलणें हेंच त्यांस उचित आहे. त्यांच्या स्थितींत जें अंतर पडत आहे तें त्यांना न समजतां घडून असल्यामुळें, आपली स्थिति कायमच आहे, असें यांस वाटणें, हें फार स्वाभाविक आहे! पण हा त्यांचा भ्रम आहे, हें कोणाही समजंस पुरुषाच्या लक्षांत सहज येण्यासारखें आहे. या सुधारणानिंदकांचा आणखी एक असा भ्रम आहे कीं, **बोलके सुधारक** काय ते अलीकडेच दृष्टीस पडूं लागले आहेत. पण खरी गोष्ट तशी नाहीं. सुधारकांची ही जात पूर्वीपासून आहे! उदाहरणार्थ, आपले पुराणिक, हरिदास, भिक्षुक, कर्मठ शास्त्री, जोशी किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या कोणत्याही वर्गांतील लोक घ्या. लोकांस धर्मोपदेश करावा, त्यांस नीति पढवावी, व स्वत:च्या पवित्र व शुद्ध आचरणानें लोकांस उदाहरण घालून द्यावें- हें या पूर्वपद्धतीच्या सुधारकाचें कर्तव्य होय. पण हें कर्तव्य नीट बजावणारे असले किती सुधारक निघतील बरें? स्त्रियांस मंत्रोपदेश करण्याच्या निमित्तानें त्यांस व्यभिचारपंकांत गूढ गोंवून टाकणारे, पोथीपुढे ठेवलेल्या तांदुळाचें गाठोडें बाजारी अंगवस्त्राच्या घरीं नेऊन सोडणारे, लोकांस नीतीच्या व निर्लोभाच्या गोष्टी सांगून घरांतल्या घरांत किंवा परक्याच्या घरीं हवा तसला अनाचार करणारे, किंवा पैशासाठीं प्राण सोडणारे, अथवा भस्माचे लांबलचक पट्टे, मुद्रांचे छाप, दर्भाच्या मुष्टी, शालजोड्यांचे लपेट, रेशीमकाठीं धोतरांच्या निऱ्या, रुद्राक्षांच्या व स्फटिकांच्या माळा, टाळ व करताल इत्यादि वाद्यें, नाना प्रकारचीं भजनें व नाच व गीत, व जीवात्मा आणि परमात्मा यांतील भेदाभेदाविषयीं कधीं कधीं समजणारी व कधीं न समजणारी चर्चा; इत्यादि धार्मिकपणाच्या दिखाऊ साधनांनीं बायाबापड्यांस व अज्ञ पुरुषांस बुचाडणारे पहिल्या चालीचे दुर्वृत्त दांभिक सुधारक काय थोडे आहेत? पण त्यांना शेणमार करण्याची, अपंक्त करण्याची, किंवा अलीकडील बोलक्या सुधारकांवर जी वाक्यशरांची वृष्टि होत असते, तशा प्रकारची वृष्टि त्यांवर करण्याची इच्छा कधीं कोणास झाली आहे काय? कधीं नाहीं. कारण चांगली गोष्ट हातून प्रत्यक्षपणें न घडली तरी ती सांगत फिरणें कांहीं दोष नाहीं, असा मनुष्यांचा पक्का समज होऊन गेला आहे, असें त्यांच्या अशा प्रकारच्या आचरणावरून उघड होते. तेव्हां सुधारणानिंदकांनी सध्यांच्याच बोलक्या सुधारकांवर इतकें तुटून पडणें शुद्ध वेडेपण होय. वाद करतां करतां ज्या चांगल्या गोष्टी ठरतील त्यांचा अंगीकार त्यांच्याकडूनच काय, खुद्द सुधारणानिंदकांकडूनही हळूं हळूं होत जाईल, अशी आमची पक्की खातरी आहे!

*

# मि. अशबरनर आणि अनाथ हिंदू विधवा

**मि. अशबरनर** यांची आमच्या वाचकांस बहुधा बरीच चांगली ओळख असेल. तथापि 'न्याशनल रिव्ह्यू' नांवाच्या मासिक पुस्तकांत त्यांनीं नुकताच जो लेख लिहिला आहे, त्यांत आमच्या हतभाग्य हिंदु विधवांवर त्यांनीं जे असभ्य, खोडसाळ, व असत्यप्रचुर आरोप लादले आहेत, ते लादण्याइतक्या नीचतरपदावर साहेबमजकूर घसरतील, असें कोणासही वाटलें नसेल! नेटिव्ह लोकांच्या अलीकडील चळवळीपासून आपल्यावर मोठा अनर्थ कोसळेल, म्हणून वेडावून जाऊन, नेटिव्हांवर अद्वातद्वा आरोप आणणारे इंग्रजबहादूर आमच्या पुष्कळ पाहण्यांत आहेत. परंतु या द्वेषामुळें नेटिव्ह स्त्रियांची, व विशेषेंकरून निराश्रित असलेल्या हिंदु विधवांची, विटंबना करण्यास ते प्रवृत्त झालेले फारसे कोठें पाहण्यांत येत नाहीं. **इलबर्ट** बिलाच्या वेळी प्रसिद्धीस आलेले वक्तृशिरोमणी **ब्रानसन्** हेही इतक्या पल्ल्यापर्यंत पोंहोचले नव्हते. तेव्हां स्त्रीदाक्षिण्याविषयीं ज्यांची योग्य प्रकारें जगभर ख्याती आहे, अशा इंग्रजांपैकीं मि. अशबरनरसारख्या अक्कलवंत, हुशार व नाणावलेल्या साहेबबहादुरांनीं आपल्या पेनाच्या शिंतोड्यांनीं आमच्या अनाथ गतभर्तृकांच्या अब्रूस डाग लावण्यास उद्युक्त व्हावें, व न्याशनल रिव्ह्यूच्या प्रकाशकासारख्यांनी त्याजविषयीं एक अक्षरहि न लिहितां, असल्या घाणेरड्या लेखास प्रसिद्धि द्यावी, हें पाहून कोणास आश्चर्य व खेद वाटणार नाहीं! 'न स्त्री स्वातंत्र्यमर्हति' या स्मृतिवाक्याचा अंमल ज्या देशांत जारीनें सुरू आहे, तेथील लोकांनीं, इंग्रज स्त्रियांस पुरुषांसमवेत सहल करतांना, पुरुषसमुदायांतून बसतां उठतांना व परपुरुषांशी निःशंकपणे भाषण करतांना पाहून, व अडाणी व हलकट लोकांच्या मनोरंजनार्थ लिहिलेल्या घाणेरड्या कादंबऱ्या वाचून, व प्रत्यक्ष इंग्लंडचा प्रवास तर दूरच राहिला, परंतु येथील इंग्रज अधिकाऱ्यांच्या गर्विष्ठपणामुळें, त्यांच्या बंगल्याच्या आंतही पाऊल घालण्याची मारामार पडत असल्यामुळें, त्यांच्या नोकरचाकरांपासून निघणाऱ्या कंड्या ऐकूनच, इंग्रज स्त्रियांच्या पातिव्रत्याविषयीं भलभलत्या कल्पना केल्या, तर त्यांत विशेष नवल वाटण्यासारखें कांहीं आहे, असें आम्हांस वाटत नाहीं. परंतु अशा लोकांनींही इंग्रज स्त्रियांविषयीं कोठे प्रसिद्धपणें जरा हूं कां चूं केलें कीं, इंग्रज लोक कसे

खवळून जातात, हें कोणास माहित नाही? मग आपल्या स्त्रीवर्गाच्या अब्रूची ज्यांना इतकी आस्था, त्याच इंग्रज लोकांनीं हिंदु विधवांविषयीं आपण वाटेल तसे प्रलाप केले असतां, त्यापासून हिंदूंच्या अंतःकरणासही तसेंच दुःख होईल, ही गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत वागवूं नये काय? किंवा 'पद्भ्यां शूद्रोऽजायत' या श्रुतीच्या जोरावर, ब्राह्मणादि उच्चवर्णांची सेवा करण्याकरितांच ईश्वरानें शूद्रांस निर्मिलें आहे, म्हणून जशी आमचीं शास्त्रें मानतात; अथवा अग्निहोत्रीस खळ पडेल, या मिषानें आपली अनिवार कामेच्छा तृप्त करण्याकरितां, मृत स्त्रीस जाळून आल्यावर लागलीच पांढऱ्या केसांच्याही पुरुषांनीं पुनर्विवाह करावा, परंतु विधवेनें आपल्या तरुणपणींही, "मृतं भर्तारमादाय ब्राह्मणी वन्हिमाविशेत्। जीवन्ति चेत् त्यक्तकेशा तपसा शोधयेद्वपुः।" म्हणून जसा आमच्या पुरुष शास्त्रकारांनीं निर्णय ठरविला आहे; अथवा गुलामांचा व्यापार सुरू ठेवण्याविषयीं आस्था बाळगणाऱ्या कांहीं इंग्रज मुत्सद्यांनीं, काळ्या कातड्याचे लोक गोऱ्यांच्या सेवेकरतांच ईश्वरानें सृजिले आहेत, म्हणून जसें एक महत्तत्व शोधून काढलें होतें, त्याप्रमाणेंच काळ्या कातड्यांच्या आंतील अंतःकरणें अपमानबधिर असतात, किंवा सुधारलेल्या गोऱ्या लोकांच्या थट्टेकरितांच ईश्वरानें हिंदु स्त्रियांस वैधव्य आणिलें आहे, असें एखादें अपूर्व तत्त्व, एखाद्या हिंदुद्वेष्ट्या अपूर्व तत्त्वज्ञान्यानें नवीन शोधून तर काढलें नाहीं ना? असें नसतें तर "हिंदु विधवांस वाटेल तसा अनाचार करण्यास हिंदु समाजानें पूर्ण सनद दिली आहे, तिच्या पापाचरणाकडे समाज जाणूनबुजून दुर्लक्ष्य करितो, तेव्हां अशी अत्यंत स्पृहणीय, व अप्रतिबंध अशी स्वच्छंदीपणाची आयती मिळालेली वृत्ति सोडून देऊन, त्यांच्या कल्याणार्थ केलेल्या कायद्याचा आश्रय घेऊन, त्या आपल्या स्वेच्छाचाराविहारास अडचण काय म्हणून आणतील?" असे शब्द साहेबबहादुरांच्या पेनांतून खचित निघाले नसते, किंवा असें तर नसेल ना, कीं आपला पुरुषार्थ गाजविण्यास दुसरीकडचे सर्व मार्ग बंद झाले असल्यामुळें, ज्यांच्याविषयी स्वतःचे देशबंधूही अनुकंपा व्यक्त करीत नाहींत, अशा निराश्रित हिंदु विधवांवर आपण आपली तिरंदाजी चालविली असतां आपणांस जयश्री खचित वरील, असा साहेबबहादुरांनीं तर्क केला असावा! व असें असले तर मात्र साहेबमजकुरांचा तर्क खोटा नाहीं, असें आम्हांस कबूल केलें पाहिजे. कारण कीं, उन्नतावस्थापन्न इंग्रज स्त्रिया, आपल्या अब्रूस धक्का पोंचवणारा नेटिव्ह वक्ता किंवा पत्रकर्ता यांची त्रेधा उडवून दिल्याशिवाय जशा आपल्या पुरुषवर्गास स्वस्थ बसूं द्यावयाच्या नाहींत, ती योग्यता आमच्या बिचाऱ्या विधवांच्या आंगीं नाहीं, व त्यांची बाजू घेऊन भांडणारा पुरुषवर्गही नियमितच आहे. तेव्हां साहेबमजकुरांचा तर्क खरा ठरून, त्यांनीं अजिंक्यपत्र मिळविले, याविषयीं आम्हांस संशय नाहीं.

परंतु समंजस लोक या विजयाबद्दल त्यांचें अभिनंदन करून त्यांची पाठ थोपटण्याऐवजीं त्यांस लज्जेनें खालीं मानच घालण्यास लावतील, यांतही शंका नाहीं.

असो. 'असंमत वैधव्य' या एका शब्दापासून ध्वनित होणाऱ्या असंख्य क्लेशांच्या दडपणानें आधींच चूर होऊन गेलेल्या हिंदु विधवांच्याविषयीं कोणी अनुदार प्रलाप केल्यास तो जर आमच्या अंत:करणास दु:सह होणें साहजिक आहे, तर मग त्या स्वेच्छाचारी आहेत असा निरर्गल आरोप मि. अशबरनर यांनीं हिंदु विधवावर्गावर आणलेला पाहून आमचें अंत:करण क्षुब्ध व्हावें, व 'जल तुंबता तडागीं फोडावा लागतो जसा पाट' या न्यायानें मनाच्या शांतवनार्थ आम्हीं आपल्या क्षुब्ध मनोवृत्तीस कांहींसा अनियंत्रित संचार करूं द्यावा, यांत विशेष नवल नाहीं. बाकी एकंदर इंग्लिश राष्ट्र अजूनपर्यंत स्त्रीदाक्षिण्यभ्रष्ट झालें नाहीं, इतकेंच नाहीं, तर तें त्यांचें स्त्रीदाक्षिण्य इतकें समर्थ आहे कीं, ते लोक जेथें जातील तेथें त्यांचा प्रादुर्भाव झाल्यावाचून खचित राहणार नाहीं, असा आम्हांस पक्का भरंवसा आहे; व मि. दादाभाई नवरोजीस 'काळा' म्हणणाराची ज्यांनी फटफजिती उडवून दिली, ते उदार इंग्रज अशा खोडसाळ लेखाची योग्य तीच किंमत करतील, व अनेक शतकेंपर्यंत मागासलेल्या आमच्या लोकांची अनुदारपणें विटंबना न करितां सर्व दिशांनी आमची उन्नती होण्याकरितां आपली मनापासूनची कळकळ, हितप्रद असा उपदेश, व प्रसंगविशेषीं हातीं असलेला अधिकार यांचा उपयोग करण्यास मोठ्या आनंदानें प्रयत्न करतील, यांविषयीं आम्हांस तिळमात्र संदेह नाहीं.

मि. अशबरनर यांनीं आणलेला आरोप सर्वथैव मिथ्या आहे, हें विशेष खुलासेवार सिद्ध करण्याची आम्हांस विशेष अवश्यकता भासत नाहीं. तथापि ज्या देशांत पतिव्रतापदप्राप्त्यर्थ लक्षावधि तरुण स्त्रियांनीं पतिचितेवर आपणांस जिवंत जाळून घेण्याचें लोकोत्तर धैर्य दाखविलें, व त्याच्या अभावींही 'विवर्णा दीनवदना देहसंस्कारवर्जिता' होऊन संन्यास वृत्तीचें अवलंबन करून, उपासातापासांनी देह वाळविण्याचें व्रत अनेक युगें चालविलें, त्या देशातील स्त्रियांस 'chartered libertines' (सनदी स्वेच्छाचारिणी) हा किताब देणारानें, आपण काय म्हणतो, याचा त्रिवार विचार करावयास पाहिजे होता. 'स्त्रीणां पतिरेव दैवतं' या सूत्राचा वाटेल त्या स्थितींत अवलंब करणे चुकीचें असेल, सती जाणें हें अमानुष कृत्य असेल, व असंमत वैधव्यही अन्यायाचें असेल; परंतु या सर्व संस्थांपासून स्त्रीजातीवर जसा जुलूम झाला आहे, त्याप्रमाणेंच त्यांची पातिव्रत्यासक्ति इतर राष्ट्रांहून दृढतर झाली आहे, हेंहि प्रत्येक विचारी मनुष्यास

कबूल केलें पाहिजे. ज्या इंग्रज लोकांनी हिंदु स्त्रियांच्या चालचलणुकीबद्दल विशेष माहिती मिळविण्याची खटपट केली होती, त्यांचे तरी विचार साहेबमजकुरांनी प्रस्तुत लेख लिहितांना मनात आणावयाचे होते. कर्नल मन्‍रो हे आमच्या स्त्रियांविषयी असें म्हणतात कीं 'It would be no slight praise to the women of any nation, even to the ladies of England to have it said that the correctness of their conduct was not inferior to that of Brahmin women and the Hindu women of the higher classes.' (कोणत्याही देशांतील स्त्रियांस, व इंग्लंडच्याही स्त्रियांस, त्यांचे वर्तन ब्राह्मणी किंवा वरिष्ठ हिंदु स्त्रियांहून कमी शुद्ध नाहीं, असा दाखला मिळणें म्हणजे आपली मोठी वाखाणणी झाली, असें मानण्यास हरकत नाहीं.) आणि दुष्ट लोकांच्या भुलथापीनें किंवा प्रसंगविशेषीं मनोनिग्रह न झाल्यानें वैधव्यव्रतापासून भ्रष्ट झालेल्या कांहीं विधवा असतील, हें जरी खरें आहे, तथापि एकंदर विधवांच्या वर्गाविषयीं विचार करितां त्यांचें आचरण एकंदरींत वर निर्दिष्ट केलेल्या सामान्य स्त्रीवर्गाप्रमाणें शुद्ध व स्तुत्यर्हच आहे, हें त्यांच्या शत्रूंसही कबूल करावें लागेल.

परंतु यासंबंधाने विशेष चमत्काराची गोष्ट ही कीं, वर सांगितल्याप्रमाणें आमच्या एकंदर समाजाची व विधवांची विटंबना करणाऱ्या साहेबबहादुरास आमचेच कांहीं व्यवसायबंधू आपले मित्र समजतात, व पहा 'अशबरनर साहेब देखील कायद्याच्या विरुद्ध आहेत' असें विधान करून आपला पक्ष सबळ करूं पाहतात. त्यांस ही गोष्ट कळून येत नाहीं कीं, विधवांनीं पुन्हां लग्न करण्यास हरकत नाहीं, किंवा त्यांनीं विवाह करण्यास त्यांस अमुक उत्तेजन मिळावें वगैरे कायदे मागणें जर वाईट, तर मग त्यांनी फिरून लग्न करूं नये, किंवा त्या तें करितील या भीतीनें त्यांचें मुंडन करविणें याविषयीं तेवढा कायदा कां पाहिजे? व या कायद्याचा तर आजमितीस प्रत्यक्ष अंमल होत आहे. मि. अशबरनर म्हणतात तसा जर खरोखर प्रकार असता, तर नुसतें उत्तेजन काय, परंतु सक्ती करूनही त्यांच्याकडून पुनर्विवाह केला पाहिजे, असें एक वेळ एकाद्या नीतिभक्तास म्हणतां आलें असतें. परंतु तशी मुळींच गोष्ट नाहीं. हिंदु विधवा अगदीं अनाचारांत गढून गेल्या आहेत, म्हणून त्यास पुनर्विवाहाची मोकळीक पाहिजे असें कोणी प्रतिपादन करीत नाहीं. एकाद्या मनुष्यास सक्तीनें सद्‌गुणी करण्यांत अर्थ नाहीं व त्या सद्‌गुणातें विशेष मोलही नाहीं. पतिमरणोत्तर वैधव्यव्रताचें आचरण करण्याइतकी ज्यांची मनोनिग्रहशक्ति नाहीं, त्यांस मारून मुटकून संन्यासी करण्यापेक्षां व त्यापासून संभवणाऱ्या पापाचरणास कारणीभूत होण्यापेक्षां त्यांस विवाह करण्याची

परवानगी दिली असतां पापाचरणाची मुळींच भीति राहणार नाहीं, व खऱ्या सद्‌गुणांचें योग्य मोल लोकांस कळूं लागेल, असो; यासंबंधानें आम्हीं वेळोवेळी अनेक प्रकारें लिहिलें आहे, तेव्हां याविषयीं सध्यांच विशेष विस्तार करण्याचें कारण दिसत नाहीं.

✷

# आणखी एक शहाण्याचा कांदा

मागील लेखांत मि. ॲशबर्नर यांनीं आमच्या गतर्भृकांविषयीं ठोकून दिलेल्या अभिप्रायाविषयीं जे चार शब्द लिहिले आहेत, ते वाचकांच्या ध्यानांत असतीलच. हा गृहस्थ या इलाख्यांतील मुलकी खात्यांत तीस वर्षांहून अधिक वर्षें नोकरीवर होता. असिस्टंट कलेक्टरच्या जागेपासून कौन्सिलदाराच्या जागेपर्यंत ज्यानें लहान मोठ्या साऱ्या हुद्यांचीं कामें केलीं, व त्या कामाच्या निमित्तानें नेटिव लोकाशीं ज्यांचें संघटन नित्य घडत असे त्यानें आपल्या तीस वर्षांच्या अनुभवावरून व माहितीवरून "हिंदु विधवा सनदी स्वेच्छाचारिणी" असतात असें आपलें मत स्पष्टपणें ठोकून दिलें आहे! तेव्हां ज्यानें इतकी वर्षें येथें काढलेलीं नाहींत, ज्याला आपल्या विशेष तऱ्हेच्या कर्तव्यामुळें हिंदु लोकांच्या भेटी वारंवार घेतां आल्या नाहीत व ज्याला वाचण्याचा किंवा लिहिण्याचा विशेष नाद असण्याचा संभव नाहीं, अशा एखाद्या लष्करी लढवय्यानें जर असा अभिप्राय दिला कीं, बहुतेक हिंदू स्त्रिया पातिव्रत्यपराङ्मुख आहेत, तर त्याबद्दल त्याला काय म्हणावें? दुसरें काय म्हणावयाचें? अशा बृहस्पतीच्या तोंडांतून पडलेल्या शब्दकुसुमांचा दुर्गंध दु:सह झाल्यास, ती तिरस्काराच्या उकिरड्यावर फेंकून द्यावीं आणि स्वस्थ बसावें हेंच योग्य आहे! पण जर त्या ठिकाणाहूनही त्यांचा किळस आणणारा दर्प घरांत भरूं लागला, तर तो नाहींसा करण्यासाठीं, ज्याप्रमाणें वाख्याची सांथ आली असता शहर सफाई ठेवणारे म्युनिसिपॅलिट्यांचे अधिकारी रस्तोरस्तीं रोगविनाशक तांबडी पूड टाकीत जाऊन तीवर संसर्गप्रतिरोधक अशा एका प्रवाही द्रव्याचें प्रोक्षण करितात, त्याप्रमाणें त्यावर टीकारूप दुर्गंधविध्वंसक द्रव्याचें सिंचन केलें पाहिजे; दुसरा उपाय नाहीं!

लॉर्ड वुइलियम बेंटिक यांचे कारकीर्दीत कॅप्टन ऑगस्टस वुईलर्ड म्हणून एक उत्तर हिंदुस्थानांत लष्करी अधिकारी होता. याच्या ग्रंथांवरून त्याला गाण्याचा शोक फार असावा, असें दिसतें. यानें आमच्या गायनशास्त्राविषयीं जो अभिप्राय दिला आहे, त्यावरून त्याची शोधकबुद्धी व्यक्त होते इतकेंच नाहीं, तर त्याला आपल्या गाण्याचें मर्मही बरेंच समजलें होतें असें दिसतें. यानें आमच्या गायकांविषयी, वाद्यांविषयी व संगीतकलेविषयीं जें लिहिलें आहे तें वाचून

त्याविषयीं आपल्या अंत:करणांत कृतज्ञता उत्पन्न झाल्याखेरीज राहणार नाहीं. पण तो येवढेंच करून स्वस्थ बसला नाहीं, हें फार वाईट झालें, **'हिंदुस्थानचे संगीत'** या नावांच्या ग्रंथात त्याला आमच्या गाण्याविषयीं जें लिहावेसें वाटलें तें लिहून गेल्यावर, अनेक संगीतांच्या भाषांतरापासून आमच्या जुन्या चालीरीती कशा प्रकारच्या असाव्या, यांचे अनुमान करण्याचा प्रयत्न त्यानें केला आहे व त्यांत तो अगदीं फसला आहे. कोणत्याही देशांतील लोकांच्या काव्यांवरून किंवा तालसुरांत बसविलेल्या पद्यांवरून त्या लोकांच्या नीतीविषयीं, विशेषत: लिंगविषयक नीतीविषयीं, अभिप्राय देणें मोठें साहस होय, असें आम्हांस वाटतें. कारण 'शृंगार' हा काव्याचा प्रधान विषय असल्यामुळें आणि अतिशयोक्ति ही काव्यरसात्मा होऊन बसल्यामुळें, काव्यांतर्गत स्त्रीपुरुषांच्या उद्‌गारांवरून कोणत्याही लोकांच्या नीतिमत्तेविषयीं अटकळ करूं गेल्यास तींत प्रमाद होण्याचा फार संभव असतो. **'मिस्टरीज ऑफ थी कोर्ट ऑफ लंडन'** या रेनॉल्डकृत ग्रंथमालिकेवरून इंग्लिश लोकांच्या नीतीविषयीं मत देणें न्याय्य होईल काय? संभावित इंग्लिश लोक उघडपणें ही कादंबरी वाचीत नाहींत, व लोकांच्या दृष्टीस पडतील अशा ठिकाणी तिचीं 'व्हाल्में' ठेवीत नाहींत; कारण बीभत्स शृंगार त्यांत ओतप्रोत भरला आहे, असें सांगतात! तेव्हां ज्याप्रमाणें **मिस्टरीचीं** पुस्तकें आंग्ल नीतीवर निबंध लिहिण्यास बसलें असतां आधारभूत मानितां येणार नाहींत, त्याप्रमाणेंच उत्तर हिंदुस्थानांतील हिंदु व मुसलमान गवय्ये आणि नायकिणी ज्या चिजा गातात किंवा वाजवितात त्यांवरून हिंदु लोकांच्या नीतीचें प्रमाण बांधितां येणार नाहीं. पण असें करण्याचें धाडस आमच्या आजच्या निबंधाच्या नायकानें केलें आहे, व तें आमच्या मतें अगदीं चुकलें असल्यामुळें या निबंधाच्या शिरोभागीं आम्हीं त्यास **आणखी एक शहाण्याचा कांदा** असें म्हणून **ॲशबर्नर साहेबांच्या** पंक्तीस बसविलें आहे. आमच्या संगीतशास्त्रांतील स्वररचनेविषयीं व स्वरमेळाविषयीं जे म्हणावयाचें होतें तें म्हटल्यावर, या ग्रंथकर्त्यानें आपलें मन गीतांच्या किंवा चिजांच्या अर्थांत घातलें, व तसें केल्याबरोबर त्याच्या लेखणींस स्फुरण येण्यासारखा नवीन विषय त्याचे हातीं लागला! अनेक चिजांच्या अर्थाचें मंथन केल्यावर आमच्या संगीतांत बहुधा ज्या गोष्टींचा अंतर्भाव केलेला असतो असें त्याच्या नजरेस आलें, त्या ह्या होत:-

१ अनुकूल होण्याविषयीं वल्लभाची प्रार्थना.

२ वल्लभाच्या विरहामुळें कामिनीस होणारा शोक.

३ प्रतिस्पर्धिनी कामिनीविषयीं द्वेषोद्‌गार.

४ सासू, नणंदा, किंवा जावा यांचा डोळा चुकवून प्राणेशाची मुलाखत

घेण्याची पंचाईत, व मेखलांतील क्षुद्रघंटांच्या आवाजामुळें कोणास समजूं न देतां घरांतून बाहेर पडण्याची, किंवा रस्त्यांतून जाण्यायेण्याची अडचण.

५ दयितावर ठेवलेल्या प्रेमास सासू व नणंदा यांकडून होणाऱ्या प्रत्यूहाच्या संबंधानें कामिनींचे दुःखोद्गार.

६ सखीपाशीं हितगुजाच्या गोष्टींचें कथन, आणि इष्ट मनोरथ पूर्ण करण्याच्या कामीं तिनें सहाय्य करावें, यासाठीं तिची विनवणी.

७ संकेत चुकूं न देण्याविषयीं व प्रेमबंध शिथिल न होऊं देण्याविषयी सख्यांचा उपदेश.

हें आमच्या संगीतपयाच्या मंथनापासून **वुइलर्ड** साहेबांनीं काढलेलें सार किंवा नवनीत! कदाचित् हें त्यांस स्वल्प आयासानें काढितां आलें असेल, असें वाचकांस वाटण्याचा संभव आहे. पण तसें बिलकुल झालेलें नाहीं. तें काढतांना त्यांस भगीरथ प्रयत्न करावा लागला! हिंदु लोकांच्या गाण्यांतच असे विषय येतात, किंवा आशिया खंडांतील इतर लोकांच्या गाण्यांतही अशाच विषयांचा भरणा आहे, अशी शंका त्यांस उत्पन्न होऊन, आरबी व फारशी चिजांकडे त्यांनी आपली नजर फेंकली, व त्यांवरून त्यांस असें दिसून आलें कीं, हिंदुस्थानांतील स्त्रियांप्रमाणें आरबी स्त्रियांवर मदनाच्या बाणांचा प्रहार होत नसल्यामुळें, त्यांना वश करण्यासाठीं आरबी पुरुष नेहमी उत्कंठ झालेले असतात, व म्हणून आरबी काव्यांत जागोजाग पुरुष स्त्रियांची विनवणी करीत आहेत असें दिसून येतें! फारशी किंवा परशिअन काव्यांत भलताच प्रकार दिसून येतो, त्यांत स्त्रीपुरुषांतील प्रेमास दुय्यम स्थान देऊन, जेथें तेथें पुरुषाभिलाषाचाच उल्लेख केलेला आढळतो. या अमानुष अनुच्चारणीय पापाची आसक्ति या लोकांस कशी लागली असेल ती असो; हें खरें आहे कीं, यांच्या काव्यांत या दुष्ट व्यसनासच आद्यपद दिलें आहे! हिंदूंच्या कवितेंत आरबी कवितेचा व्युत्क्रम आढळतो. हिंदूंच्या संगीत पद्यांवरून हिंदू स्त्रिया अत्यंत कामातुर आहेत, व इष्ट पुरुषास वश करण्याच्या इराद्यानें त्या नानाप्रकारचे उपाय योजीत आहेत, असें दिसून येतें!

याप्रमाणें हिंदुस्थानांतील नायकिणींच्या तोंडीं असलेल्या चिजांच्या अर्थावरून आमच्या बायकांस कामातुर ठरविल्यावर त्या इतक्या कामातुर कशामुळें होतात, यांचा छडा काढण्याकडे **वुइलर्ड** साहेब वळले, व त्या कामित्वाचीं त्यांनीं जीं तीन कारणें शोधून काढलीं तीं हीं :- १. हिंदुस्थानांतील पूर्वीची अनवस्था; २. अनेक बायका करण्याची चाल; व ३. हिंदू स्त्रियांचें अज्ञान. या तीन कारणांमुळे पूर्वी हिंदू स्त्रिया कामातुर होऊन व्यभिचार करण्यास प्रवृत्त होत, असें **वुइलर्ड** साहेबांचें म्हणणें आहें!

हिंदुस्थानच्या सांप्रत स्थितीवरून त्याच्या पूर्वस्थितीचें अनुमान करणें फार चुकीचें होणार आहे, असें या गृहस्थाचें म्हणणें आहे. ती पूर्वस्थिति बरोबर लक्षांत येण्यास सध्यां डोळ्यापुढें ज्या गोष्टी दिसतात त्या अगदीं विसरून गेलें पाहिजे, व इतिहासापासून, काव्यापासून, व इतर ग्रंथांपासून जी माहिती मिळते तीवरून, तत्कालीन स्थितीचें चित्र काढण्याचा प्रयत्न केला पाहिजे. जे कोणी अशा प्रकारचा प्रयत्न करतील त्यांस असें दिसून येईल कीं, त्या वेळची हिंदुस्थानची स्थिति फारच शोचनीय होती. आतांप्रमाणें तेव्हां कोठेही शांतता दृष्टीस पडत नसे; एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणीं पायवाटांनीं जावें लागे; साऱ्या देशांत चार दोन देखील मोठ्या सडका नव्हत्या. मार्गांत चोरांचें भय मोठें असे; रस्ते सांपडण्याची मारामार पडे; वाटेंत भेटेल त्यास रस्ता विचारून पुढें चालूं लागावें तर कदाचित् त्याच्या सांगण्यावरून चोराच्या हातांत आपण होऊन पडूं कीं काय, अशी दहशत वाटत असे; जिकडे तिकडे दाट झाड्या, ओसाड रानें किंवा चिखलाच्या दलदली असत, व त्यांत भयंकर श्वापदें संचार करीत असत; यामुळें कोणालाही आपला गांव सोडून एकट्यादुकट्यानें फार लांब जाववत नसे, रात्रीं प्रवास करणें बहुधा अशक्यच असे; ज्याप्रमाणें जमीनीवरचा त्याप्रमाणें पाण्यावरचा प्रवासही अत्यंत संकटावह असे. अशा स्थितींत दूरचा प्रवास करावयाचा म्हटला त्याचे बेत पूर्वी वर्ष दोन वर्षे चालत; व तो करण्याकरितां निघण्याचा प्रसंग येऊन ठेपला म्हणजे कुटुंबांतील माणसांत, विशेषत: ज्या तरुणींचे पति प्रवासावर निघालेले असत, त्यांच्या अंत:करणांत दु:खाचा अनिर्वाच्य कल्होळ होत असे.

अशा रीतीनें प्रवास करण्यासाठीं घर सोडून गेलेल्या तरुणांच्या तरुण पत्न्या चिंतेनें व विरहव्यथेनें व्याकुळ होत्सात्या मोठ्या कष्टानें आपले दिवस कंठीत. त्यांच्या नणंदा व जावा सकाळी उठून वेणीफणी करीत आहेत, दागदागिने घालीत आहेत, व एकमेकींचा विनोद करीत आहेत, हें पाहून या विरहव्यथेनें पीडलेल्या तरुणींस फार खेद असे. तथापि बऱ्यावाईटानें त्या आपला दिवसाचा वेळ कसा तरी काढीत. पण रात्र येऊन जिकडे तिकडे सामसूम झालें व त्या आपल्या आंथरुणावर पडल्या म्हणजे पतिचिंतेंत त्या इतक्या व्यग्र होऊन जात कीं, उभ्या रात्रींत त्यांचा डोळा लागत नसे. अशा स्थितींत उन्हाळा गेल्यावर पावसाळ्याच्या आरंभास तरी आपले पति परत येतील, आणि आपली त्यांची गांठ पडून आपणास आनंदाचा दिवस दिसेल, अशा आशेवर त्या वसंत व ग्रीष्म ऋतूंतील अत्यंत प्रखर दिवस व रमणीय रात्री मोठ्या कष्टानें लोटीत असत. हे ऋतु निघून जाऊन पावसाळ्याच्या आरंभास त्यांचे पति परत आले, तर सारें ठीकच असे; पण दुर्दैवानें जर तसें घडलें नाहीं, तर मात्र त्यांच्या दु:खास व चिंतेस पारावार नसे.

याप्रमाणें अनेक वर्षें वाट पाहिल्यावर, पति परत येत नाहींत, असें पाहून कामाग्नीनें करपून गेलेल्या या तरुणींची काय अवस्था होत असेल याची वाचकांनींच कल्पना करावी. अशा संकटांत सांपडलेल्या तरुण कन्यका अखेरीस निराश होऊन वांकडे पाऊल टाकण्यास तयार होत, आणि सखीच्या साहाय्यानें संकेतस्थानीं पाहिजे तसलें धाडस करून वल्लभांच्या गांठीं घेत, आणि अप्रशस्त रीतीनें आपले मनोरथ पूर्ण करीत; व अशी स्थिति अनेक कुटुंबांत दुष्टिगोचर होत असल्यामुळें तिचें प्रतिबिंब तत्कालीन काव्यांत व संगीतांत पडलें आहे, असें वुइलर्ड साहेबांचें म्हणणें आहे.

याशिवाय आम्हांत रूढ असलेलें बहुपत्नीकत्व हें आमच्या स्त्रिया व्यभिचारी असण्याचें दुसरें कारण आहे, असें या गृहस्थाचें मत आहे, व तें कांहीं खोटें नाहीं. "एका पुरुषा दोघी नारी। पाप वसे त्याचे घरीं" ही तुकारामोक्ती जर आमच्या लोकांस मान्य असेल, तर एकाच पुरुषानें तीन किंवा चार बायका करण्याची चाल ज्यावेळीं रूढ असेल; त्यावेळेस प्रत्येक स्त्री आपल्या पतीचें सारे प्रेम आपणावर असावें म्हणून खटपट करीत असल्यामुळें, सापत्न मत्सर विकोपास जाऊन कुटुंबांतील शांततेचा नाश होत असेल. इतकेंच नाहीं, तर ज्या दुर्दैवी तरुणी आपल्या पतींच्या नजरेंतून उतरल्या जात असतील, त्यांचें मन त्यांच्या संसाराकडे न लागतां बाह्यसुखाकडे जाऊं पाहत असेल असें मानण्यास हरकत आहे?

व्यभिचाराचें तिसरें कारण आमच्या स्त्रियांचें अज्ञान होय, असें हे साहेब म्हणतात, व त्याविषयीं आम्हांस थोडी शंका आहे. ज्ञान आणि सद्गुण यांचा अन्योन्य संबंध कितपत आहे, हे अद्यापि चांगलेसें ठरलेलें नाहीं. ज्ञानाचा प्रसार झाल्यानें खून, दरवडे, मारामाऱ्या वगैरे मोठमोठ्या गुन्ह्यांची संख्या कमी होते असें पुष्कळ विचारी लोक कबूल करतात. पण खोटें बोलणें, बनावट कागद करणें, खोट्या साक्षी देणें, चतुराईनें दुसऱ्यास फसविणें, लांच खाणें, व्यभिचार करणें, खोट्या शपथा घेणें, वगैरे कमी दुष्टपणाचे गुन्हे वाढतात किंवा कमी होतात याविषयीं जितका संशय ॲरिस्टॉटल यास होता; तितकाच हर्बर्ट स्पेन्सर यासही आहे. तेव्हां अज्ञानामुळें आमच्या स्त्रिया विशेष व्यभिचारी होत्या, व आतां त्यांस थोडेंबहुत लिहितां वाचतां येऊं लागलें आहे, म्हणून आमच्यांतील व्यभिचार कमी होऊं लागला असला पाहिजे, असें जर कोणी इंग्रज आम्हांस सांगू लागेल तर त्यांचें आम्हांस हंसूं आल्यावांचून राहणार नाहीं! कोणत्याही देशांतील लोकांनीं दुसऱ्या देशांतील लोकांस व्यभिचारी ठरविण्याचें धाडस करूं नये, म्हणून आम्ही इंग्लिश लोकांच्या व्यभिचाराविषयीं कांहींएक म्हणत नाहीं; तथापि जर ते आपण

होऊन तो दोष आमच्या स्त्रियांवर अविचारानें आणूं लागतील, तर तुमच्या मडमांनीं आमच्या स्त्रियांचें तीर्थ घेऊन त्या पापापासून मुक्त व्हावें, इतक्या त्या पवित्र आहेत, असें म्हणण्यास आम्ही कधीही सोडणार नाहीं! हिंदुस्थानांतील स्त्रियांच्या पातिव्रत्याइतकें शुद्ध पातिव्रत्य बहुधा दुसऱ्या कोणत्याही देशांत सांपडणार नाही.

*

# संमतीचें वय आणि जुन्या लोकांचा खोटेपणा

संमतीचें वय सरकारनें वाढवूं नये, म्हणून जुन्या लोकांनीं जी ओरड चालविली आहे, तींतील खोटेपणा पाहून कोणत्याही सत्यशील मनुष्यास जुन्या लोकांचा आणि सुशिक्षित म्हणविणाऱ्या त्यांच्या पुढाऱ्यांचा तिरस्कार व संताप आल्यावांचून राहणार नाहीं. त्यांची पहिली लबाडी ही आहे कीं, संमतीचें वय बारा वर्षांपर्यंत वाढविलें असतां सरकारनें हिंदुधर्मांत लोकांच्या मर्जीविरुद्ध हात घातला असें होईल. १८५८च्या जाहिरनाम्यांत सरकारनें असें फर्माविलें आहे कीं, आम्ही आमच्या हिंदु प्रजेच्या धर्मांत कोणत्याही प्रकारें हात घालणार नाहीं; नवऱ्यानें, आपल्या बायकोस तेरावें वर्ष लागण्यापूर्वी तिच्याकडे जाऊं नये, असा निर्बंध केला असतां, या लोकांच्या म्हणण्याप्रमाणें सरकारानें धर्मांत हात घालण्यासारखा होतो; तेव्हां जर हा कायदा पसार झाला, तर सरकारानें वचनभंग केला, असें होणार, अशी यांच्या वाचाळ पुढाऱ्यांनीं बडबड चालविली आहे. विवाहित स्त्रीचा संभोग तिच्या नवऱ्यानें तिला तेरावें वर्ष लागेतोंपर्यंत घेऊं नये, घेतल्यास तो संभोग दंड्य होईल, असें कलम **पीनल कोडांत** घातलें असतां जर हिंदुधर्मांत सरकारनें हात घातला असें होत असेल, तर त्या वयाचे पूर्वी नवऱ्यानें बायकोकडे जावे, अशा अनुज्ञा हिंदुधर्मशास्त्रांत असल्या पाहिजेत. पण त्या आम्हांस तर कोठें आढळल्या नाहींत, व हिंदुधर्मशास्त्राचीं पानें रात्रंदिवस चाळणाऱ्या जुन्या लोकांच्या पुढाऱ्यांनींही त्या पुढें आणिलेल्या नाहींत. तेव्हां या निर्बंधामुळें सरकारानें हिंदुधर्मांत हात घातला असें होतें, असें सांगणारांची ही शुद्ध लबाडीची ओरड आहे, असें म्हणणें भाग आहे. यावर कोणी असें प्रत्युत्तर देतील कीं, तेराव्या वर्षापूर्वी नवऱ्यानें बायकोकडे जावें अशी जरी स्पष्ट शास्त्राज्ञा नाहीं, तरी कन्या ऋतुमती झाल्याबरोबर तिचें गर्भाधान करावें, अशी शास्त्राज्ञा आहे, व ज्या अर्थीं कित्येक मुली बाराव्या वर्षी ऋतुमती होतात असें दिसून आलें आहे; त्या अर्थी या कायद्याचें उल्लंघन न करणें म्हणजे ज्या मुलींस बाराव्या वर्षी ऋतु प्राप्त होईल, त्यांच्या गर्भाधानाची स्थिति कांही अंतरावर टाकून पाल्य धर्माज्ञेचे उल्लंघन करणें, व बेचाळीस पिढ्या अधोगतीस जाण्यासारखें वर्तन करणें होय! यावर आम्ही असा प्रश्न विचारतों कीं, **मुलगी कोणत्याही स्थितींत**

**असो, किंवा ती कोणत्याही वयाची असो, तिला ऋतु प्राप्त झाला की, सोळा दिवसांच्या आंत नवऱ्याला गर्भाधान करण्याकरिता तिच्याकडे पाठविलेंच पाहिजे.** अशी शास्त्राज्ञा कोठें आहे ती या धर्माभिमान्यांनीं आम्हास दाखवावी, आणि तिचे पालन सर्व ठिकाणीं सर्वांकडून चालले आहे कीं काय, हें आम्हांस सांगावें; तसेंच, सोळा दिवसांच्या आंत ज्यांनीं गर्भाधान उरकून घेतले नाहीं, त्यांस वाळींत टाकण्याचा किंवा त्यांना जबरदस्त प्रायश्चित्त देण्याचा परिपाठ आहे कीं काय, त्याविषयींहि जो खरा प्रकार असेल, तो या लोकांनीं यावेळीं प्रसिद्ध करणें अवश्य आहे. बरेंवाईट न पहातां प्रतिपक्ष्यांचा पाडाव करण्यासाठी हवें तें बहकत सुटणें, ज्या गोष्टी धर्मांशीं विसंगत तर नाहींतच, पण उलट धर्मसाहाय्यकारी आहेत; अशा गोष्टी धर्मविरोधक आहेत, अशी खोटी ओरड करून आपल्या प्रतिपक्ष्यांवर व सरकारावर तुटून पडणें, हें धर्मशील म्हणविणाऱ्या लोकांस अत्यंत लज्जास्पद आहे. स्त्री ऋतुस्नात असो किंवा नसो, तिला तेरावें वर्ष लागण्यापूर्वी तिच्याशीं समागम करणें हा मोठा अन्याय होय, अशा आमच्या धर्मशास्त्राच्या व वैद्यकशास्त्राच्या स्पष्ट आज्ञा आहेत; पण त्यांचा आमच्याकडून व्हावा तसा प्रतिपाल होत नसल्यामुळें कित्येक कन्यकांवर भयंकर प्रसंग गुदरत आहेत. तेव्हां समतीचें वय बारा वर्षेंपर्यंत वाढविण्याच्या हेतूनें आ. मि. **स्कोबल** यांनीं जें बिल मुख्य का. कौन्सिलापुढें आणिलें आहे, तें पसार झाल्यास ज्या राक्षसी कामुकांच्या कामवासना अनावर होतील, त्यांस कडक शिक्षा देण्यास सांपडेल. इतकेंच नाहीं, तर हिंदु धर्मशास्त्रांत अल्पवयस्क कन्यकांवर त्यांच्या उतावीळ नवऱ्यांकडून जुलूम न होण्याबद्दल जे प्रतिबंध सांगितले आहेत, ते ब्रिटिश सरकारानें सक्त अमलांत आणिल्यासारखें होणार आहे.

या नवीन होणाऱ्या प्रतिबंधाविरुद्ध व सुधारकांविरुद्ध अज्ञान लोकांचीं मनें क्षुब्ध करण्यासाठी जुन्या लोकांचे सत्यपराङ्मुख पुढारी त्यांस असें सांगत फिरतात कीं, असा प्रतिबंध करणें म्हणजे कायद्यानें विवाहकालाची मर्यादा वाढविण्यासारखेंच होय! व विवाहसंबंध तर धर्मांतर्गत विधि आहे; तेव्हां संभोगकालाची मर्यादा वाढविणें हें हिंदु धर्मावर स्वारी करण्यासारखें आहे! असल्या भ्रामक कल्पना लोकांत पसरणारांस काय म्हणावें हें आम्हांस समजत नाहीं. असले खोटे लपंडाव करून सरकाराविरुद्ध लोकांचीं मनें कलुषित करणारांस व खऱ्या धर्मापासून व सुधारणेपासून त्यांना फितुर करणारांस राजनिष्ठ व धर्मनिष्ठ म्हणण्यापेक्षां राजद्रोही, धर्मद्रोही, लोककल्याणशत्रु म्हणणें बरें दिसतें! तेराव्या वर्षापर्यंत संभोगाची मनाई केल्यानें जन्म झालेल्या मितीपासून बाराव्या वर्षाच्या अखेरच्या दिवसांपर्यंत पाहिजे त्या वेळीं मुलीचें लग्न लावल्यास, संमतीच्या या

नवीन कायद्यानें कशी हरकत येते, कोण जाणे! पण ज्यांना कांहीं तरी बडबड करुन चांगल्या गोष्टींविरुद्ध लोकांची उठावणी करावयाची आहे, व आपल्या बरोबर इतरांनांही दुष्ट आचारांच्या चिखलांत लोळत पाडावयाचें आहे, त्यांना सत्यासत्य पाहण्याची काय गरज आहे?

पुन: या लोकांचें असें एक तुणतुणें चाललेलें असतें कीं, बारा वर्षांच्या आंत स्त्रीपुरुषांचा समागम होणें जरी इष्ट नाहीं, तरी तो समागम एकाएकी कायद्यानें बंद करणें बरें नाहीं; कारण त्याला लोकमत अनुकूल नाहीं. शिक्षणाचा प्रसार होऊन लोकमत सिद्ध झाल्याखेरीज अशा प्रतिबंधापासून फायदा न होतां उलट नुकसान होणार आहे. कारण कायदा करून ठेवल्यानें व मोठ्या शिक्षेची भीति घातल्यानें उल्लू मनुष्य आपली अनावर झालेली कामवासना तृप्त करण्यास मागेंपुढें पाहणारा नसतो; त्याच्या मनानें उचल खाल्ली कीं, तो तुमचें हवें तसलें कायदे गुंडाळून ठेऊन पापाचरण करण्यास प्रवृत्त होतो; सबब अशा वासनाच त्याचे अंत:करणांत उद्भवणार नाहीं, अशा प्रकारचें शिक्षण त्याला दिलें म्हणजे झालें! यावर आमचीं दोन उत्तरें आहेत पहिलें, या कोटिक्रमांत बिलकुल अर्थ नाहीं; असेल तर खून करणारांस फांशीं देण्याचा जो अधिकार ठेविला आहे तोही पीनल कोडांतून काढून टाकला पाहिजे! कारण उत्कट द्रव्यलोभानें किंवा दुसऱ्या कोणत्याही कारणानें जो खून करण्यास निघतो, तो त्या अपराधास पीनल कोडांत काय शिक्षा सांगितली आहे, हें पाहण्यांत गुंतणारा नसतो. सबब खून करणारास देहान्त शिक्षा देण्यापेक्षां ज्या शिक्षणानें त्याला खून करण्याची बुद्धीच होणार नाहीं, असें शिक्षण त्यास द्यावें म्हणजे झालें! या विचारसरणीप्रमाणें आजच सारें पीनल कोड रद्द करण्यास सिद्ध झालें पाहिजे! पण प्रस्तुत कायद्याचे शत्रू तसें करण्यास तयार असतील असें आम्हांस वाटत नाहीं. शिवाय **शिक्षण** म्हणजे तरी काय? सदुपदेश करणें व श्रीमुखांत दोन चापट्या लगावणें यालाच शिक्षण कशासाठीं म्हणावें? सक्त मजुरी करावयास लावणें, फटके मारणें, खोड्यांत घालणें, सुळीं देणें, फांशीं चढवणें वगैरे शिक्षांसही शिक्षणाचे प्रकार कां मानूं नये? अपराधाच्या मानानें हे सुशिक्षणाचेच प्रकार आहेत असें आम्हांस वाटतें. तेव्हां समंतीच्या संबंधानें आज जो कायदा हिंदुस्थान सरकार करूं पाहत आहे; त्यापासून म्हणण्यासारखा तात्कालिक उपयोग न झाला तरी तो शिक्षणावह होईल, असें जें ऑ. मि. **स्कोबल** यांचें म्हणणें आहे, तें यथार्थ आहे.

आतां, लोकमताच्या संबंधाने हे हट्टी जुने लोक जो आग्रह धरून बसूं लागले आहेत, त्याविषयीं मुळींच विचार करण्याची गरज नाहीं. कारण सुधारकांना आपल्या बाजूस जितकें लोकमत आहे, असें म्हणण्याचा अधिकार आहे, त्याहून

फारच कमी अधिकार या लोकांना तें आपल्या बाजूस आहेत, असें म्हणण्याचा आहे. या कायद्याशीं आपल्या स्त्रियांचा विशेष संबंध आहे, व त्या त्याला प्रतिकूल आहेत, असें म्हणण्याची छाती या सत्यापलाप करणाऱ्या वाद्यांसही होणार नाहीं; तसेंच, खालच्या जातीचे लाखो अज्ञान लोकहि यांचे बाजूस आहेत असें नाहीं; कारण एक तर असल्या संभोगाचा प्रकार त्यांच्यांत सहसा घडत नाहीं, व दुसरें ज्याप्रमाणें इतर गोष्टींविषयीं त्यांचा अभिप्राय कोणी घेत नाहीं, त्याप्रमाणें या गोष्टींतही त्यांचें मत कोणीं विचारलेलें नाहीं. शिवाय, लोकमताचें आजच येवढें स्तोम माजविणाऱ्या जुन्या लोकांस आम्हीं असें विचारंतों कीं, हिंदु राजे व हिंदु शास्त्रकार लोकमतांची पर्वा करीत असत, किंवा आपणांस योग्य वाटतील ते निर्बंध त्या मताचा विचार मनांत न आणतां बेलाशक करीत असत! तसें नसेल तर **''राजा कालस्य कारणम्''** ही म्हण कोठून आली? आ. रा. ब. नूलकर या कायद्यास प्रतिकूल आहेत म्हणून जी बातमी आली आहे, ती खरी नसावी; कारण सुधारकांनी येथून धाडलेल्या मेमोरियलावर (अर्जावर) त्यांची सही आहे. तथापि कौन्सिलांतील भाषणाचा कच्चा 'रपोट' येईपर्यंत त्यावर कोणत्याच प्रकारची टीका न करणें हेंच उचित आहे.

✷

# आतां मात्र खचित होणार

## काय? संमतीचा कायदा!!

आजपर्यंत ज्या गोष्टीची इतकी 'भवति न भवति' झाली ती आतां फलद्रूप होण्याचा समय येऊन ठेपला आहे; यासाठीं हिंदू धर्माचा वृथा अभिमान धरणाऱ्या आग्रही व सत्यापलाप करणाऱ्या लोकांनीं आपली असेल तेवढी पुण्याई खर्च करून त्या गोष्टीविरुद्ध आपल्या हातून जें होणें असेल तें करावें, बायकोस बारावें वर्ष लागण्यापूर्वी तिचा नवरा तिच्याकडे गेला तर त्यानें तिच्यावर 'रेप' केला, किंवा असंमत रत्युपभोग घेतला, असा कायदा करून, जे कामी पुरुष त्याच्या तावडींत सांपडतील त्यांस जन्मठेपेची काळ्यापाण्याची शिक्षा देण्यास कांहीं हरकत नाहीं. पण असा कायदा केल्यानें अशाच प्रकारच्या अपराधांची संख्या म्हणण्यासारखी कमी होण्याचा संभव नाहीं, असें आमचें मत पूर्वींपासून असल्यामुळें आम्हीं या कायद्याचा पक्ष घेऊन मोठ्या वीरश्रीच्या वादांत कधींच पडलों नाहीं. तेव्हां हा कायदा पसार झाल्यास (व होईल याविषयीं आतां आम्हांस मुळींच शंका राहिली नाहीं) त्याबद्दल विशेष आनंद मानण्याचें किंवा फुशारकी मिरविण्याचें कारण विचारी सुधारकांस नाहीं, असें आम्हांस वाटतें. तथापि या कायद्याचा मसुदा मुख्य कौन्सिलापुढें येऊं नये, व आल्यास त्याला कायदेपण प्राप्त होऊं नये, म्हणून जुन्या पद्धतीच्या ज्या लोकांनी सत्यपराङ्मुख होऊन हवी तसली बडबड चालविली आहे व पोकळ दटावणीच्या गप्पा मांडल्या आहेत, त्यांतील कपट व लबाडी बाहेर पडून त्यांचा मोड होणार, हें पाहून आम्हांस सानंद खेद होत आहे! मागल्या लेखांत या बिलाविषयीं आम्ही विशेष चर्चा करण्याच्या भरींस पडलों नाहीं, कारण त्या वेळेस त्या संबंधानें आलेल्या तारांतील मजुकारावरून लोकांचा गैरसमज होण्याचा संभव होता; व कित्येक पत्रांनीं तो करून सोडण्यास मागेंपुढें पाहिलेंही नाहीं. त्या तारांतील अस्पष्ट व त्रोटक माहितीवरून कित्येकांनी असा अर्थ काढला कीं, ज्या आ. रा. ब. नूलकरांनीं येथील सुधारकांनीं धाडलेल्या अर्जावर आपली सही दिली; ते नूलकरसुद्धां या संमतीच्या वयाचे बिलास आयत्यावेळीं प्रतिकूल झाले! या सहजगत्या उठलेल्या

किंवा कोणीतरी बुद्ध्या उठविलेल्या अफवेवर आम्ही त्यावेळेस बिलकुल विश्वास ठेविला नाही; आणि ठेवला असता तर आमच्या हातून मोठा प्रमाद घडला असता, असें आतां हिंदुस्थान सरकारकडून प्रसिद्ध झालेल्या **एक्स्ट्राऑर्डिनरी ग्याझेटांतील रिपोर्टावरून** उघड होत आहे. या रिपोर्टापैकीं म्हणजे संमतीचें वय वाढविण्याविषयी आ. सर.ए. स्कोबल यांनीं कौन्सिलापुढें बिल आणिलें; त्या वेळेस जीं भाषणें झालीं त्यांपैकीं दोन भाषणें आम्हास फार आवडलीं; एक खुद्द आ. ए. स्कोबल यांचें, व दुसरें आ. रा. ब. नूलकर यांचें. लॉर्ड लॅन्स्‌डौन यांचें भाषण आपलें सरासरीच होते. पण सर रोमेशचंद्र यांच्या भाषणाच्या बाजूस तें मांडण्याची मुळींच सोय नाहीं, कारण इतक्या मोठ्या विद्वानाकडून झालेलें 'इतकें' गचाळ भाषण आमच्या पाहण्यांत कधींच आलें नाहीं. पण एका प्रकारें हे पेन्शनदार हायकोर्ट जज्ज जसें बोलले तसें बोलणेंच त्यांस योग्य होतें. जॉन स्टुअर्ट मिल्ल यांचे नेहमीं असें म्हणणें असें कीं, ज्याच्या अंगांत जो दुर्गुण विशेष असतो तो, तो दुर्गुण काढून टाकण्यास फार प्रतिकूल असतो. अडाणी लोकांस जबरीच्या शिक्षणाचा, वस्ताद दारू पिणारास दारू पिण्याच्या बंदीचा, अल्पवयांत अपत्यांचें विवाह करणारांस बालविवाहनिषेधाचा व अप्राप्तयौवनकुमारिकांचा त्यांच्या संमतीविरुद्ध संभोग करणारांस संमतीचें वय वाढविण्याचा कायदा सहसा पसंत पडावयाचा नाहीं! यावरून खुद्द सर रोमेशचंद्र यांनीं आपल्या तारुण्यांत तसें केलें असेल, किंवा आधुनिक तरुणांनीं तसें करण्यास कांहीं हरकत नाहीं, असें त्यांचें म्हणणें असेल, असें आम्हांस प्रतिपादितां येणार नाहीं, हें आम्ही कबूल करतों. त्यांनीं असलें पाप स्वतः केलें नसेल, व त्यांना तें नकोही असेल; पण ज्या देशांत त्यांचा जन्म झाला आहे, व ज्या देशांत त्यांचें बहुतेक वय गेलें आहे, त्या देशांतील वैवाहिक आचारांचें अस्पष्ट प्रतिबिंब तरी त्यांच्या विचारसरणींत पडल्यावांचून कसें राहणार? मुली उपवर होण्यापूर्वी, म्हणजे त्यांना ऋतु प्राप्त होण्यापूर्वी, त्यांचे लहान-मोठे नवरे कौतुकानें किंवा जबरीनें त्यांचेकडे पाठविणें, किंवा अस्नात मुलींस त्यांच्या नवऱ्यांच्या खोल्यांत जबरदस्तीने कोंडून घालणें, हा प्रघात जितका वंगदेशांत रूढ आहे, तितका हिंदुस्थानांतील दुसऱ्या कोणत्याही भागांत नाहीं, असें अलीकडे बाहेर आलेल्या पुराव्यावरून निर्विवाद सिद्ध झालें आहे. हे बंगाली लोक पूर्वीपासूनच अत्यंत विषयासक्त असावे, असें दिसतें. पूर्वीच्या लोकांच्या गोष्टींत कधीं कधीं निघणारे **स्त्रीराज्य** कोठें तरी बंगाल्यांत असावें, असा इकडील अडाणी लोकांचा अद्यापपावेतों समज आहे! वंगवासी स्त्रियांस घराच्या बाहेर पडण्याची किंवा संनिकट आप्तांवाचून कोणत्याही पुरुषाचें मुखावलोकन करण्यास सक्त मनाई असल्यामुळें, शेंकडों वर्षें

गृहकारागृहांत खितपत व कुजत पडलेल्या त्या दुर्दैवी आर्यमहिलांस अनेक व्यासंगांच्या व कर्मणुकींच्या अभावामुळें, ज्या एका पुरुषाचें मुखावलोकन करण्याची व ज्या एका पुरुषाशीं संगती करण्याची साऱ्या जन्मांत सवड मिळणार, त्या एका पुरुषाशीं आपलें होईल तितकें लौकर संघटन व्हावें, असें त्यांस वाटत असेल. तसेंच या भयंकर गोषाच्या चालीचा साधारणपणें असलाच परिणाम तिकडील पुरुषांच्या मनावरही होत असेल, यांत संशय नाहीं. तेव्हां ज्या कायद्यानें नवराबायलें एकत्र होण्याचा काळ उभ्या दोन वर्षांनीं दुरावणार, तो कायदा तिकडील बहुतेक लोकांस भीतिप्रद वाटावा, यांत कांहीं नवल नाहीं. बंगाल्यांतील बहुतेक पुढारी लोक आणि बहुतेक वर्तमानपत्रें या कायद्याविरुद्ध एकसारखा गिल्ला करीत आहेत; तेव्हां सर रोमेशचंद्र यांच्या विचारांवरही त्याची थोडीशी झांक न पडती तर मात्र मोठें आश्चर्य करण्यासारखी गोष्ट होती. संमतीचें वय वाढविण्यांत कांहीं अर्थ नसून, त्यापासून लोकांत असंतोष मात्र निष्कारण उत्पन्न होणार आहे, असें जें त्यांनीं म्हटलें हेच व्हावें तसें झालें! कारण, मनुष्य कितीही शहाणा असो, तो थोडाबहुत तरी आपल्या उपजत स्वभावावर गेल्याशिवाय राहावयाचा नाहीं. पृथ्वीवरील पक्ष्यांनीं किंवा वैमानिकांनीं कितीही उंच भराऱ्या मारल्या तरी पृथ्वीचें आकर्षण ते कसें चुकविणार व पृथ्वीस वेष्टणाऱ्या वातावरणाच्या बाहेर कसे पडणार?

या कायद्याविरुद्ध आजपर्यंत आणिलेल्या सर्व आक्षेपांस आ. ए. स्कोबल यांनीं फार थोडक्यांत पण अतिशय खणखणीत उत्तरें दिलीं आहेत. या कायद्यानें नवीन अपराध अस्तित्वांत येत नाहीं, म्हणजे जें वर्तन पूर्वी सदोष मानलें जात नव्हतें, तें हा कायदा पास झाल्यावर सदोष होणार आहे असें नाहीं; मुलींस ऋतु प्राप्त होण्यापूर्वी तिचा विवाह करावा, अशा हिंदुधर्मशास्त्रांत आज्ञा आहेत, तरी त्या कालापूर्वी जे दुष्ट पुरुष त्यांच्याशीं संभोग करतील; त्यांस कडक शासनें सांगितलीं आहेत; तेव्हां कन्येस तेरावें वर्ष लागण्यापूर्वी ज्याप्रमाणें परक्या पुरुषानें त्याप्रमाणेंच तिच्या नवऱ्यानेंही तिच्याकडे गमन केलें असतां तो असंमत रत्युपभोग होतो, असें समजून उभयतांसही सारखी शिक्षा देण्यास ज्याप्रमाणें आम्हांस हरकत नाहीं, त्याप्रमाणें पूर्वीच्या ऋषींसही वाटली नसती; म्हणून जे लोक त्या ऋषींच्या आज्ञांचें उल्लंघन करण्याकरितां या कायद्यास धर्माची खोटी हरकत सांगत आहेत त्यांच्या बोलण्याकडे लक्ष देण्याची गरज नाहीं; ज्यानें हा गुन्हा केला आहे असा संशय आला असेल तर त्याला वारंटानें कैद करण्याचा अधिकार पोलिसास ठेवला नसल्यामुळें, व जामीन घेऊन व समन्सें काढून असल्या आरोपांची चौकशी करावी, असें कलम घातलें असल्यामुळें, पोलिस लोक घरांत शिरून भल्या

लोकांची अब्रू घेण्यास, धाक दाखवून पैसे खाण्यास, किंवा दांडगाई करून संभावित कुलांत एकच कल्होळ करून सोडण्यास प्रवृत्त होतील, अशी जी कित्येक लोकांस भीती पडली आहे, ती निष्कारण आहे. इंग्लंडांतील मुलींस बहुधा तेराव्या वर्षी व येथील मुलींसही बहुधा तेराव्या वर्षी ऋतु प्राप्त होतो, तेव्हां संमतीच्या वयाची इयत्ता बारा वर्षांवर आणून ठेवण्यास यत्किंचित् हरकत नाहीं; तसेंच जरी या कायद्यानें हा अपराध करणाऱ्या एकूणएक गुन्हेगारांस कोर्टापुढें आणून शिक्षा ठोठावतां येईल, व हें पाप निखालस निर्मूळ करतां येईल असें म्हणतां येत नाहीं, तरी ज्या थोड्या अपराध्यांस कडक शिक्षा देतां येईल; त्यांच्या उदाहरणानें या अपराधाकडे प्रवृत्त असलेल्या कामुकांस जबर दहशत पडेल, व सामान्य लोकांच्या मनावर त्याचा अत्यंत शिक्षणावह परिणाम होईल; याविषयीं अणुमात्र शंका नाही, असें आ. स्कोबल साहेब म्हणाले, व कोणत्याही निःपक्षपाती व विचारी मनुष्यास त्यांचें म्हणणें यथार्थ आहे असें म्हटलें पाहिजे असें आम्हांस वाटतें. आ. ए. स्कोबल यांचें भाषण झाल्यावर सर रोमेशचंद्र यांनीं या प्रश्नाची उलट बाजू आपणांकडून होईल तेवढ्या चतुराईने फुगवून दाखविली, त्यांचें म्हणणें असें पडलें कीं, नवऱ्याला बायकोकडे गेल्याबद्दल कोणत्याही देशांत शिक्षा करीत नाहींत. नवऱ्यानें स्वस्त्रीकडे जाणें हाच या विषयसुखाचा प्रशस्त मार्ग होय. असल्या सुखासाठी नवऱ्याला दंड करणें, हें अत्यंत विपरीत होय. ही विपरीतता फक्त हिंदुस्थानच्या पीनल कोडांत मात्र आढळते. हिंदुस्थानच्या पीनल कोडावर टीका करतांना या बड्या न्यायाधीशानें जी एक गोष्ट लपवून ठेविली; ती, त्यास उत्तर देतांना कोणीच पुढे आणिली नाहीं, हा मोठा चमत्कार आहे. ज्या देशांत स्त्रीशीं अकालीं संभोग केल्याबद्दल नवऱ्यास शिक्षा मिळत नाहीं, त्या देशांत कोणत्याही नवऱ्याला आपल्या स्त्रीशीं अकालीं संभोगच करतां येत नाहीं, म्हणून ती मिळत नाहीं. हा संभोग न करतां येण्याचें कारण असे आहे कीं, त्या देशांतील मुली बाराव्या वर्षांपूर्वीं कोणाच्या बायकाच होऊं शकत नाहींत; म्हणजे या वयाचें आंत मुलींचीं लग्ने करूं नयेत, असे त्या देशांत निर्बंध केलेले आहेत. पाहिजे त्या वयास मुलींचीं लग्नें करण्याची चाल येथल्याप्रमाणें युरोप खंडात रूढ असती, तर बायकोस तेरावें वर्ष लागण्यापूर्वी नवऱ्यानें तिच्यांकडे जाणें म्हणजे तिच्याशीं असंमत रत्युपभोग घेणें असें त्यांनीं केव्हांच ठरवून टाकून, असल्या राक्षसी नवऱ्यास जन्मठेपेची-काळयापाण्याची-शिक्षा योजून ठेवली असती! तात्पर्य, लग्नाची कमींत कमी इयत्ता घालून दिल्यानें जें काम होत आहे, तें येथें संमतीचे वय बारापर्यंत वाढवून साधण्याची खटपट चालली आहे, तेरावें वर्ष लागण्यापूर्वी कोणत्याही मुलीचें लग्न करूं नये, व तेरावें वर्ष लागण्यापूर्वी

कोणत्याही बायकोकडे तिच्या नवऱ्याने जाऊं नये, या दोन निर्बंधांपैकीं पहिला समाजास विशेष हितकारक आहे, हें उघड आहे. तथापि, ज्या अर्थी लग्नाच्या वयाची इयत्ता ठरविणें म्हणजे आमच्या धर्मांत हात घालणें, व लोकमताविरुद्ध जाणें अशी सरकारास आजमितीस भीती वाटत आहे, त्या अर्थी संमतीच्या वयांत तें आज जेवढा फेरफार करण्यास तयार झालें आहेत, तेवढ्यांतच समाधान मानून घेतलें पाहिजे. वस्तुत: लोकांनी किंवा सरकारानें अमुक वर्षांपूर्वी मुलींचीं लग्नें होतांच कामा नयेत, असा ठराव करून तो पाहिजे त्या साधनांनीं अंमलात आणिल्याखेरीज, उल्लू नवऱ्यांच्या उत्कट कामवासनांपासून बाल्यावस्थेंत असलेल्या कित्येक मुलींस होणाऱ्या घोर यमयातना सर्वथैव टळण्याचा संभव नाहीं. या वरील पोकळ मुद्याशिवाय प्रस्तुत बिलास रोमेशचंद्र यांनी अशी हरकत घेतली कीं, कित्येक मुलींस बारावें वर्ष लागण्यापूर्वी नहाण येतें; नहाण आल्याबरोबर गर्भाधानसंस्कार केलाच पाहिजे, असा बंगाल्यात परिपाठ आहे; तेव्हां हा संमतीचा कायदा पाळणें म्हणजे धर्मोल्लंघन करणें, व धर्माज्ञा पाळणे म्हणजे या कायद्याचें उल्लंघन करणें असा पेंच येऊन पडतो. म्हणून सरकारानें या कायद्याच्या भरीस पडूं नये. आम्ही तुमच्या धर्मांत हात घालणार नाहीं असें १८५८ च्या जाहिरनाम्यांत सरकारचें अभिवचन आहे. पण त्या वचनास या कायद्यानें सरकार हरताळ लाऊं पहात आहे, हें वाईट आहे. यामुळें हिंदुस्थानच्या श्रद्धावान लोकांत मोठा असंतोष उत्पन्न होणार आहे. यावर नूलकर त्यानीं खूप सणसणीत उत्तर दिलें. ते असें म्हणाले कीं मुलीस कोणत्याही वयास ऋतु प्राप्त झाला, तरी तिचें गर्भाधान ताबडतोब केलेंच पाहिजे; असा आचार सर्व हिंदुस्थानांत रूढ आहे असें नाहीं. शिवाय या आचाराच्या संबंधानें धर्मशास्त्रकारांतही पुष्कळ मतभेद आहेत. पण तो नाहीं, असें वादाकरितां क्षणभर मानिलें तरी, जर आपल्या अंत:करणांत कांहीं भूतदया असेल तर बारा वर्षांच्या आंतील मुलींस विषयकर्दमांत लोटून देण्यासाठीं जेवढें धर्मोल्लंघन करणें भाग पडेल, तेवढें करण्यास आपण तयार झालें पाहिजे. या स्पष्टोक्तीबद्दल रा. ब. नूलकर यांची तारीफ केल्याशिवाय आमच्यानें राहवत नाहीं. नहाण आल्याबरोबर गर्भाधान करणें हा जर धर्म असेल तर, विषयोपभोगास जिचे अवयव योग्य झालेले नाहींत, अशा अल्पवयस्क मुलीचा उतावळ्या नवऱ्यास हवा तसा छल करूं न देणें हाही तितकाच मोठा किंवा त्याहूनही मोठा आईबापांचा व सासूसासऱ्यांचा धर्म नाहीं काय? पण आमच्या आधुनिक नीच स्थितींत या गोष्टींचा शांतपणें विचार कोण करणार? कामाच्या गुलामांना आणि त्यांच्या वकिलांना आम्ही असें विचारतों कीं, बारा वर्षांच्या आंत नहाण आलेल्या मुलींच्या गर्भाधानास उभें न राहणें हें मोठें पाप?

कीं उभें राहून तिच्या अवयवांची आणि शरीरसंपत्तीची राखरांगोळी करण्यास प्रवृत्त होणें, आणि तिच्या व आपल्या कुलांस अक्षय्य कलंक लाऊन घेणें, हें मोठें पाप? जर तुमच्या डोक्यांत काहीं धड विचारतंतू असतील तर या प्रश्नाचें तुमच्या मनास खाणार नाहीं व सज्जनांस अप्रशस्त वाटणार नाहीं, असें उत्तर द्या; आणि वरील दोन धर्मांपैकीं पाहिजे त्या धर्माचा प्रतिपाल करा, आणि वरील दोन पापांपैकीं पाहिजे तें पाप टाळा! रा. ब. नूलकर आणखी असें म्हणाले (आणि त्यांच्या त्या म्हणण्यांत बराच तथ्यांश आहे) कीं अलिकडील कांहीं सुधारक मंडळी ज्या त्या गोष्टीकरितां कायदा करून घ्यावा, असें मोठ्या दिमाखानें वारंवार प्रपादूं लागल्यामुळें, जुन्या पद्धतीच्या लोकांचीं माथीं फिरून जाऊन 'कायदा' म्हटला कीं, त्यांच्या अंगावर कांटा उभा राहूं लागला, व कित्येक गोष्टींत कायद्याचा चांगला उपयोग करून घेतां येतो, याचें भान त्यांस न राहून, ते आपले जें कांहीं सुधारक करावें असें म्हणतील त्यास विरोध करूं लागले आहेत! वस्तुतः तीस वर्षांपूर्वीं हें संमतीचें वय बारा वर्षांवरच काय, पण चौदा वर्षांवर जरी नेऊन ठेविलें असतें, तरी त्याविषयीं बहुधा कोणीं चकारशब्दहि काढिला नसता.

रा. ब. नूलकर यांचें भाषण झाल्यावर **लॉर्ड लॅन्सडौन** यांचें शेवटचें भाषण झालें. या भाषणांत त्यांनीं संमतीच्या बिलाविषयीं फारसा पाल्हाळ केला नाहीं. या बिलामुळें १८५८ च्या जाहीरनाम्याविरुद्ध सरकार जात आहे असें होत नाहीं, कारण धर्मांतर्गत लग्नसंस्काराशीं याचा कोणत्याही प्रकारें संबंध पोहोंचत नाहीं, शिवाय, बारा वर्षांच्या अविवाहित कन्येकडे कोणी पुरुष जाईल, तर त्याला कडक शिक्षा देण्यास कांहीं हरकत नाहीं, पण तेंच कर्म नवऱ्यानें स्वस्त्रीशीं केलें तर त्याला कोणतीही शिक्षा करूं नये, किंवा फक्त दुखापतीच्या गुन्ह्यास सांगितलेली शिक्षा देऊन सोडून द्यावें, हें अत्यंत अश्लाघ्य आहे, असें ते म्हणाले. त्यांच्या भाषणाचा विशेष कटाक्ष ज्या सामाजिक सुधारणांसाठी मि. मलबारी यांनीं इंग्लंडांत स्थापिलेल्या बड्या कमिटीनें 'सेक्रेटरी ऑफ स्टेट'च्या द्वारें हिंदुस्थान सरकारावर वजन व भीड घालण्यास आरंभ केला आहे; त्यावर होता. पण प्रस्तुत विषयाशीं त्यांचा निकट संबंध नसल्यामुळें व आजचें हें पुराण नित्याच्या मर्यादेबाहेर बरेंच गेलें असल्यामुळें, लेखणीस विश्रांती देऊन व्हाइसरायांच्या भाषणाच्या त्या भागाचा विचार आज तहकूब करणें भाग पडत आहे.

✷

# विवाहकाल व संभोगकाल

संमतीचें वय वाढविण्यासाठीं हिंदुस्थान सरकारनें जें बिल काढलें आहे, त्याला अडथळा करणाऱ्या धर्मनिष्ठ लोकांचें असें म्हणणें आहे कीं, हें बिल पास झालें असतां, हिंदुस्थान सरकारनें हिंदु धर्मांत हात घातला असें होऊन, ह्या बिलांतील कलमांचें उल्लंघन न करण्यासाठीं, त्यांस धर्मोल्लंघन करावें लागणार आहे. धर्माचें घोडें पुढें ढकलून अहितकारक रूढ आचारांचें मंडन करण्यांत प्रतिष्ठा मानणारे धर्मभीरू किंवा पापभीरू लोक खरा धर्म काय आहे हें नीट समजत असते किंवा निदान तो समजून घेण्यास तरी तयार असते तर बरें झालें असतें. पण ज्यांना अमुक गोष्ट रूढ आचाराच्या विरुद्ध आहे येवढ्यासाठींच तीवर तुटून पडावयाचें आहे; ते त्या आचाराविषयीं खऱ्या धर्माज्ञा काय आहेत, हें कशाला पाहावयाला बसले आहेत? शिवाय, ज्याप्रमाणें आमच्या इतर गोष्टींत त्याचप्रमाणें आमच्या धर्मशास्त्रांतही इतकी बजबजपुरी माजली आहे कीं, पाहिजे त्या प्रकारच्या अत्याचारास किंवा अनाचारास आधारभूत अशी वाक्यें त्यांतून काढून देतां येणार आहेत! अमुक एक स्मृति किंवा अमुक एक ऋषि प्रधान मानून त्याच्या आज्ञेप्रमाणे आपले धर्माचार करावयाचे, असा नियम असता, तर या संमतीच्या नवीन कायद्यास धर्माची नड सांगणें नीट झालें असतें. पण तसें करून आम्हांस मनसोक्त वर्तन करावयास कसें सांपडणार? ज्या गोष्टीविषयीं ज्या ऋषीचें किंवा ज्या स्मृतीचें मत अनुकूल असेल तो ऋषि आणि ती स्मृति त्या गोष्टीच्या संबंधानें प्रधान मानणार! व ज्या अर्थी हवी ती गोष्ट धर्मदृष्ट्या प्रशस्त आहे असें म्हणणारा धर्माचार्य किंवा शब्दचलाखीनें ती तशी आहे असें भासविणारा टीकाकार कोणत्याही देशांत हव्या त्यावेळीं पैदा होण्यास कधींच पंचाईत पडत नाहीं, त्याअर्थी विवाहित स्त्रीशीं हव्या त्या वेळीं संभोग करण्यास कोणाचे तरी वचन आमच्या धर्मशास्त्रांतून काढून देतां येणार नाहीं, असें कसें होणार? लोकांत जो आचार रूढ असेल तदनुसार एखादा संस्कृत अनुष्टुभ रचून तो जुन्या पोथींत घुसडून देणें; आणि त्यांतील आज्ञा अमक्या तमक्या ऋषीची, आचार्याची, किंवा भटाची आहे, असें सांगून तात्कालिक स्वार्थ साधणें, हें अगदीं सामान्य मनुष्याच्यानें होण्यासारखें काम आहे, हें कोणीही कबूल करील. आम्हांस तरी

निदान असें वाटतें कीं, अशा प्रकारच्या लोकानुछंदी लेखकांच्या धार्मिक लबाड्यांमुळें आमच्या धर्मशास्त्राची गति नंदीबैलाच्या झुलीसारखी किंवा कुणब्याच्या वाकळीसारखी झाली आहे! तेव्हां आ. रा. नूलकर यांनीं सुचविल्याप्रमाणें, संमतीच्या बिलाविरुद्ध कांहीं शास्त्रकारांची मतें कोणीं धर्माभिमान्यांनी काढून दाखविलीं; तर सरकारानें आपल्या स्तुत्य हेतूवर नजर देऊन त्यांकडे दुर्लक्ष करावें, हेंच आम्हांस बरें वाटतें. तथापि आपण जें बिल लोकांपुढें आणिलें आहे तें त्यांच्या धर्माविरुद्ध नाहीं, असें सांगितल्यानें व सिद्ध करून दाखविल्यानें त्या बिलास अडथळा करणाऱ्या लोकांचें समाधान होईल, अशी सरकारास आशा असल्यास त्यांनी तो प्रयत्नही करून पाहावा. त्यापासून म्हणण्यासारखा फायदा होईल असें आम्हांस वाटत नाहीं. कारण आजमितीस ज्यांनीं सामान्य लोकांचें पुढारीपण घेतलें आहे, त्यांचा असा निश्चय झालेला दिसतो कीं, सुधारक आणि सरकार यांनीं मनांत आणिलेली गोष्ट कितीही सशास्त्र असली, किंवा देशाचें तीपासून केवढेंही हित होण्यासारखें असलें, तरी ती सुधारकांकडून व त्यांच्या मतासारखींच ज्यांची मतें आहेत; अशा सरकारकडून पुढें आली असेल, तर शास्त्राशास्त्रतेचा, सत्यासत्याचा, किंवा हिताहिताचा विचार न करतां, हवी ती खटपट करून ती हाणून पाडलीच पाहिजे! असल्या वृथा धर्माभिमानामुळें व मिथ्या देशाभिमानामुळें नव्या व जुन्या पिढ्यांतील कलह अधिकाधिक वाढत जाऊन, नवीन पिढ्यांतही दोन तट होणार आहेत, व त्यापासून देशाचें अपरिमित नुकसान होणार आहे, हें या हट्टी लोकांच्या ध्यानांत कसें येत नाहीं कोण जाणे! तथापि, या संमतीच्या कायद्यात आपल्या लोकांनीं पूज्य मानिलेल्या धर्मशास्त्राकारांची पूर्ण संमति आहे, असें सिद्ध करून दाखविल्यानें हा प्रस्तुत वाद मिटण्यासारखा असेल तर तेवढी कामगिरी आपले परमपूज्य धर्मनिष्ठ गुरु डॉक्टर भांडारकर यांनीं वेळी बजावली आहे. त्यांनीं यासंबंधानें नुकताच लिहिलेला लेख त्यांच्या परवानगीनें सुधारकाच्या गेल्या अंकांत साद्यंत प्रसिद्ध केला आहे, व शिवाय पुस्तकरूपानें त्यांनीं तो निराळा छापविलाही आहे. जे कोणी हा निबंध निरभिमानाने लक्षपूर्वक वाचतील; त्यांस स्पष्टपणें असें दिसून येईल कीं, विवाहकालाची व संभोगाची जी मर्यादा अलीकडील समजंस व सुशिक्षित लोकांस प्रशस्त वाटूं लागली आहे; तीच मर्यादा आमच्या पुरातन प्रमुख स्मृतींस व ऋषींस पूर्ण मानवली होती. इतकेंच नाहीं, तर त्या मर्यादेचें उल्लंघन करणें हें त्यांनीं मोठें पाप मानिलें होतें. तथापि या दोन गोष्टींच्या संबंधानें आम्हीं जसजसे ढिले होत गेलों, तसतसे भ्रष्ट आचारांस धर्मशास्त्रांत गोंवून, त्यास शास्त्राधार दाखविणारे लोकाराधनतत्पर धर्मलेखक निघाले, व त्यांच्या लेखांमुळें

आमच्या धर्माच्या बटव्यांत मोहर, पुतळ्या, होन, रुपये, चवल्यापावल्या, बिल्ली, खुर्दा व फद्ये, आणि कवड्या यांची एकच खिचडी होऊन गेली! या अनवस्थेचा आजमितीस असा परिणाम झाला आहे कीं, ज्याच्या हातीं जें लागेल त्यास तो उत्तम नाणें समजून, त्याच्या जिवावर सुधारकापुढें आणि सरकारापुढें "अहो अनाचार! अहो धर्मातिक्रम! अहो अध:पात!" असा आक्रोश करून त्यास होईल तेवढा विरोध करूं लागला आहे! तथापि येवढ्या थोरल्या जनसमुदायांत खरोखरींच कांहीं भाविक व धर्मभोळे लोक असतील, व सुनेला किंवा कन्येला ऋतु प्राप्त झाला असून तिचें गर्भाधान केलें नाहीं तर आपल्या हातून मोठें पाप घडेल, असें त्यांस वाटतही असेल; अशा लोकांपैकीं जे वयातीत झाले असतील, व ज्यांना फार वर्षांच्या प्रमाणप्रणीत वर्तनामुळें स्वत: विचार करून तदनुसार वागण्याची अशक्यता झाली असेल त्यांच्या समाधानासाठीं डॉक्टर भांडारकर यांच्या पुस्तकांतून कांहीं वचनें येथें उतरून घेऊन त्यांचें भाषांतर देतों. या वचनांवरून त्यांची अशी खात्री होईल कीं, पूर्वीच्या प्रमुख ऋषींनीं व स्मृतिकारांनीं प्रथम स्त्रीसंभोगाची जी इयत्ता घातली आहे, तीच हिंदुस्थान सरकार घालूं पाहत आहे. इतकेच नाहीं, तर त्यांनीं विवाहकालाची जी मर्यादा सांगितली आहे तिचें उल्लंघन न केल्यास, सध्यां सुधारकांत व सुधारणानिंदकांत जो वाद चालला आहे, तो देखील नाहींसा होणार आहे. मात्र एखाद्या भिकार ग्रंथकारानें रूढीस जुळण्यासारखें दिलेलें मतच आम्हांस ग्राह्य आहे, असा असंमजपणाचा हट्ट त्यांनीं धरून बसतां कामा नये. डॉ. भांडारकर हे अनेक उद्योगांत व्यापृत असून त्यांनीं या ऐन गर्दीच्या प्रसंगास, वेळांत वेळ करून हे अनेक शास्त्राधार गोळा केले, व त्यांच्या वाचनानें धर्मनिष्ठ लोकांचा गैरसमज दूर व्हावा या हेतूनेंत्यांचा लहानशा पुस्तकांत संग्रह करून ते स्वत:च्या खर्चानें प्रसिद्ध केलें याबद्दल साऱ्या सुधारणेच्छूंनीचसे काय, खुद्द हिंदुस्थान सरकारानेंही त्यांचे आभार मानिले पाहिजेत. कारण, यांच्या व्यासंगाइतका गीर्वाणवाणीचा व इतर भाषांचा व्यासंग, निदान या इलाख्यांत तरी दुसऱ्या कोणी गृहस्थानें केला आहे असें आम्हांस वाटत नाहीं; तसेंच यथार्थ धर्मनिष्ठा, सत्यप्रीति व स्वदेशोन्नतीविषयीं खरी कळकळ इत्यादि गुणांत यांहून श्रेष्ठ असा दुसरा गृहस्थ या प्रांतांत आम्हांस दिसत नाहीं; म्हणून अशा वादग्रस्त विषयाविषयीं अभिप्राय देण्यास यांच्याइतका दुसरा कोणास अधिकार नाहीं, असें आम्हांस वाटतें. ज्यांना आमच्या या लिहिण्याचा प्रत्यय घ्यावयाचा असेल, त्यांनीं येथील दुसऱ्या एका पत्रांत प्रसिद्ध केलेलीं एकदेशीय वचनें आणि प्रसिद्ध करणाराचें त्यावरील व्याख्यान पाहावें, म्हणजे त्यांची खात्री होणार आहे.

कासममामरणात्तिष्ठेद् गृहे कन्यर्तुमत्यपि।
न चैवेनां प्रयच्छेत्तु गुणहीनाय कर्हिचित् ।।

मनु. अ. ९, श्लो. ८९

अर्थ:- ऋतु प्राप्त झाला असूनही कन्या बापाच्या घरीं राहिली तरी हरकत नाहीं; पण गुणहीन अशा वराला त्यानें ती कधींही समर्पू नये.

या मनुवचनावर **मेधातिथि** नांवाच्या सर्वांत जुन्या टीकाकारानें अशी टीका केली आहे:-

प्रागृतो: कन्याया न दानम्। ऋतुदर्शनेपि
न दद्याद्यावद् गुणवान वरो न प्राप्त:।।

अर्थ:- नहाण येण्यापूर्वी मुलीचें लग्न करूं नये; व तें आल्यावरही चांगला वर मिळेतोंपर्यंत करूं नये.

त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्युतुमती सती।
ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विन्देत सदृशं पतिम्।।

मनु. अ. ९, श्लोक ९०

अर्थ:- ऋतु प्राप्त झाल्यावर मुलीनें तीन वर्षें वाट पाहावी; त्यानंतर आपला आपण योग्य वर पाहून त्याशीं तिनें विवाह करावा.

त्रीणि वर्षाण्युतुमती काङ्क्षेत पितृशासनम्।
ततश्चतुर्थे वर्षे तु वन्देत सदृशं पतिम्।।

बौधायन, ४. १. १४

अर्थ:- ऋतु प्राप्त झाल्यावर तीन वर्षेंपर्यंत मुलीनें बापाच्या आज्ञेची वाट पाहावी; नंतर चौथे वर्षीं तिनें आपण होऊन योग्य वराशीं विवाह करावा.

**वसिष्ठसूत्रांत**ही अशा अर्थाचेच श्लोक आहेत.

नग्निकां तु वेदत्कन्यां यावन्नर्तुमती भवेत्।।
ऋतुमती त्वनग्निका तां प्रयच्छेत्त्वनग्निकाम्।।

गेभीलीय गृह्यसूत्र, बि. इं. पा. ८३९

अर्थ:- मुलीला ऋतु प्राप्त झाला नाहीं, तोंपर्यंत तिला **नग्निका** म्हणतात; त्यानंतर **अनग्निका** म्हणतात. मुलगी **अनग्निका** झाल्यावर म्हणजे तिला ऋतु प्राप्त झाल्यावर (बापानें) तिचें लग्न करावे.

त्रिंशद्वर्षो वहेत्कन्यां हृद्यां द्वादशवार्षिकीम्।

मनु. अ. ९, श्लोक. ९४.

अर्थ:- तीस वर्षांच्या मनुष्यानें त्यास पसंत अशा बारा वर्षांच्या कन्येशीं विवाह करावा.

या सर्व वचनांवरून मुलींस ऋतु प्राप्त होईतोंपर्यंत किंवा बारावें वर्ष लागेतोंपर्यंत अविवाहित ठेवण्यांत कांहीं दोष नाहीं, इतकेंच नाहीं, तर तसें करणेंच प्रशस्त आहे, असें होत नाहीं काय? बारावें वर्ष उलटून गेलें व ऋतुदर्शन होऊन तीन वर्षें लोटलीं, तरी देखील मुलींच्या अविवाहित राहण्यानें धर्मोल्लंघन होतें असें ज्यांस वाटत नाहीं, अशा धर्मकर्त्यांच्या वचनांप्रमाणें आम्ही वागत असतों तर सुधारकदुर्धारकांतलें रण कशाला माजलें असतें? व आ. ए. स्कोबल साहेबांस संमतीच्या वयाचें बिल **सुप्रीम कौन्सिलपुढें** आणावें लागून त्याबद्दल सर्व हिंदुस्थानभर इतकी वाटाघाट व बाचाबाची कशाला झाली असती? अगदीं "मी मी" म्हणणाऱ्या सुधारकांसही या ऋषिवचनापलीकडे जाण्याची इच्छा नाहीं. ऋतु प्राप्त झाल्यावर तीन वर्षेंपर्यंत अविवाहित राहण्याची व त्यानंतर स्वतःस पसंत पडेल असा वर वरण्याची परवानगी मुलींना देण्यांत येईल तर यासंबंधानें सुधारकांना सुधारणेसाठीं कज्जा करीत बसण्यास म्हणण्यासारखे कांहींएक कारण नाहीं, हें उघड आहे! पण कलियुगाच्या प्रभावामुळें विषयलंपट, अविचारी, व नामर्द झालेल्या आम्हां भारतीय आर्यांस हा उत्साहजनक, हा विषयसुखवर्धक, हा संतानसामर्थ्यदायक, हा पुण्य स्वयंवरपंथ कोठून रुचणार?

अशा रीतीनें म्हणजे ऋतु प्राप्त झालेली कन्या विवाह होऊन भर्तृगृहीं गेली असतां, शास्त्रोल्लंघन न करतां पतिसमागम केल्याशिवाय तिला किती दिवस राहतां येईल, या संबंधाने डॉ. भांडारकर यांनीं जीं वचनें काढिलीं आहेत, त्यांवरून हा समागम तिला तीन दिवसांपासून तीन वर्षेंपर्यंत तहकूब करण्याचा अधिकार शास्त्रानें दिला आहे. तेव्हां मुलीला ऋतुदर्शन झाल्यापासून सोळा दिवसांच्या आंत तिचा गर्भधानविधि केलाच पाहिजे, असें जें कित्येकांचें म्हणणें आहे, तें बरोबर दिसत नाही. पण सर रोमेशचंद्रांचा रघुनंदन असें म्हणतो कीं, तसें झालेंच पाहिजे, नाहीं तर ब्रह्महत्येचें किंवा भ्रूणहत्येचें महापातक नवऱ्याच्या बोकांडीस बसणार! पण असें सांगण्यास **रघुनंदनच** कशाला पाहिजे? मन्वादि ऋषींच्या युगांत लोकांच्या अंगांत असलेल्या पौरुषाचा लोप झाल्यावर,. रघुनंदनासारखे निःसत्त्व धर्मकर्ते बंगाल्याप्रमाणें इकडेही झाले आहेत, व त्यांनीं हवा तसा बाष्कळपणा केला आहे. भेद इतकाच कीं, ज्याप्रमाणें स्त्रीमत्सरी व स्त्रीपारतंत्र्येच्छू वंगवासी लोक अगदीं स्त्रैण होऊन जाऊन रघुनंदनाच्या आज्ञेचें अतिक्रमण करण्यास असमर्थ झाले आहेत, तशीच केवळ आम्हां महाराष्ट्रीयांची स्थिती नाहीं; या गोष्टीचा विशेष खुलासा करण्यासाठीं या विषयाकडे आणखी एक वेळ वळणें जरूर आहे, म्हणून आज येथेंच मुक्काम करतों.

*

# संमतिबिलास धर्मशास्त्र बाधक नाहीं

संमतीचे बिल कौन्सिलापुढें आणितांना **सर ऑ. स्कोबल** यांनीं असें म्हटलें आहे कीं, या बिलास हिंदुधर्मशास्त्र प्रतिकूल नाहीं. या त्यांच्या स्वल्प उल्लेखामुळें आमच्या वृथाधर्मवाद्यांस शब्दजाल पसरण्यास उत्तम सवड सांपडून, त्यांनी त्याच मुद्यावर आतां आपला प्राण ठेविला आहे! बी.ए.च्या परीक्षेला लागणाऱ्या पांचचार संस्कृत पुस्तकांपलीकडे ज्यांचें संस्कृताचें अध्ययन गेलेलें नाहीं, असे लोक आपणांस पट्टीचे शास्त्री समजून, डॉक्टर भांडारकरांसारख्या विद्वानांस श्रुतींचा व स्मृतींचा अर्थ बरोबर करतां येत नाही, किंवा त्यांनीं तो बुद्ध्या केला नाहीं, अशी बडबड करीत आहेत, आणि जुने शास्त्री त्यांस ''धर्मरक्षक'' समजून त्यांच्या अज्ञानमय वादास आपली संमती देत आहेत! पण अशा प्रकारची ढिलाई करण्याबद्दल या जुन्या शास्त्रीमंडळीस विशेष दोष देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, एक तर अलीकडे निव्वळ संस्कृत विद्येचा अभ्यास फायदेशीर होईनासा झाल्यामुळें, आजिमितीस नांव घेण्यासारखा एकही शास्त्री या इलाख्यांत सांपडावयाचा नाहीं. असल्या शास्त्र्यांनी शास्त्रार्थ देण्यांत व बाकीच्यांनीं तो पतकरण्यांत मुळींच अर्थ नाहीं. शिवाय, प्रसंग पडेल त्याप्रमाणें ओढून ताणून हवा तो अर्थ काढण्याची या शास्त्र्यांची पूर्वापार चाल आहे; तेव्हां ते या वेळींच त्या आपल्या जुन्या शीलास अनुसरणास नाहींत, असें कोठून होणार? ब्राह्मणांनीं वस्तरा हातीं घेऊन, न्हाव्यांची रग जिरविण्यास कांहीं हरकत नाहीं, असा शास्त्रार्थ थोड्या वर्षांपूर्वी ज्यांनीं या पुणें शहरांत साफ ठोकून दिला, त्यांना पहिल्या ऋतूंतच गर्भाधान केलें पाहिजे, असें धर्मशास्त्राचे स्पष्ट म्हणणें आहे, असा आग्रह धरण्यास कोठून शंका येणार? पाश्चिमात्य शिक्षणाच्या वाढत जाणाऱ्या प्रसारामुळें आमच्या शास्त्री- वैदिकांचा धंदा अगदीं उठावणीस आला आहे व ते अन्नास मोताद झाले आहेत; तेव्हां अशा संकटावस्थेंत दोन पैसे मिळणारे संस्कार त्यांनीं आपल्या हातून जाऊं न देण्याविषयीं धडपड करावी, व कधीं न मिळालेली प्रतिष्ठा दोन दिवस भोगून घ्यावी, हें अगदीं स्वाभाविक आहे. पण अशा आपत्कालीं देखील त्यांनीं इतके पाखंडवादी व्हावें, हें त्यांच्या जुन्या विद्येस सुद्धां चांगलेसें शोभत नाहीं, असें आम्हांस वाटतें. बाकी संमतीचें बिल

पास होणें किंवा न होणें हें या शास्त्रार्थावर थोडेंच अवलंबून आहे! हें बिल पास करण्यांत ब्रिटिश सरकारास अमुक एक स्वहित साधावयाचें आहे, असें या वाक्पटु शास्त्र्यांसही म्हणतां येणार नाहीं; तसेंच हजार पांचशें सुधारकांस खुष करण्यासाठीं कोट्यवधि लोकांस नाखुष करण्यांतही कांहीं अर्थ नाहीं, हेंही तें सरकार पक्कें समजून आहे.तथापि त्या सरकारास हें पक्कें ठाऊक आहे कीं, हिंदुस्थानांतील बरेच लोक आपल्या बायका वयांत येण्यापूर्वी त्यांवर जुलूम करीत असल्यामुळें, त्यांसी आज कित्येक शतकें अनिर्वचनीय यातना भोगाव्या लागत आहेत; त्यांच्या यातनांच्या उपशमनार्थ होईल तितका प्रयत्न करणें हें आपलें कर्तव्य आहे; या कर्तव्यास हिंदू धर्माची अनुकूलता किंवा संमती नसली तरी प्रत्येक सदय, समंजस, व विचारी मनुष्याच्या अंत:करणांत वास करणारा जो साऱ्या धर्मांचा धर्म; त्याची पूर्ण संमती आहे इतकेंच नाहीं, तर तें कर्तव्य इतकी वर्षें न बजावल्याबद्दल त्यानें एकसारखी टोंचणी लाविली आहे; तेव्हां अडाणी, अविचारी, वृथाधर्माभिमानी, व आपमतलबी हिंदूंनीं केवढाही गवगवा केला, तरी दहा अकरा वर्षांच्या मुग्ध कन्या अधीर भर्त्याच्या अतिशय भडकलेल्या कामकुंडांत आहुती पडून जळून खाक होणार नाहींत अशाबद्दल कांहीं तरी उपाय केलाच पाहिजे, असें लक्षात येऊन त्यांनीं हें **संमतबिल** हातीं घेतलें आहे. तेव्हां आम्हीं आपल्या आक्रोशांनीं जरी सारें ब्रह्मांड हालवून सोडिलें तरी हें बिल पास करण्यास हिंदुस्थान सरकार अणुमात्रही भिणार नाहीं, अशी आमची बालंबाल खात्री झाली आहे. तथापि, ज्या रोग्यांना जें औषध द्यावयाचें तें त्यांचें नाक धरून व त्यांना पायावर उताणें पाडून, बोंडल्यानें त्यांच्या घशांत घालण्यापेक्षां, त्या औषधाचे गुण त्यांस समजावून देऊन, तें ते आपण होऊन आपल्या हातानें पितील, तर बरें होणार आहे, असें वाटून हिंदुस्थान सरकारनें आपल्या नेहमींच्या रिवाजाप्रमाणें त्याची चर्चा चालू दिली आहे, व ज्याला जीं वाटतील तीं साधक बाधक प्रमाणें त्यांनें खुशाल दाखवावीं, अशी नोटीस दिली आहे! या नोटिशीचा फायदा घेऊन, कांहीं ''नाकाडोळ्यांचे नाडीपरीक्षक'' वैदू; हें औषध तुम्हास सुखावह होणार नाहीं, अशी भीति भाबड्या लोकांस घालीत आहेत, ही केवढ्या शरमेची गोष्ट आहे बरें? हे झोळीवाले ''रसशेंदूरमात्रा वैद्य'' अज्ञान लोकांस असें सांगत फिरत आहेत कीं, हें बिल पास झाल्यास, बारा वर्षांच्या आंत जितक्या मुलींस ऋतुदर्शन होईल तितक्यांचें गर्भाधान ताबडतोब न करण्यास सांपडल्यामुळें त्यांच्या व त्यांच्या नवऱ्यांच्या कपाळीं भ्रूणहत्या येणार आहे! तेव्हां या पापांत हीं नवराबायलें खरोखरींच पडतात कीं काय, हें थोडक्यांत पाहूं.

स्त्रीस नहाण आल्याशिवाय तिच्याकडे तिच्या नवऱ्यानें जाऊं नये, अशी

आमच्या धर्मशास्त्राची सक्त ताकीद आहे. तेव्हां बारावें वर्ष लोटल्यावर ज्या मुली ऋतुमती होतील, त्यांना व त्यांच्या नवऱ्यांना हें बिल लागू पडत नाहीं, हें उघडच आहे. न्हाण न आलेल्या तेरा वर्षांच्या मुलीकडे तिचा नवरा गेल्यास आमचें धर्मशास्त्र त्यास काय शिक्षा करीत असेल किंवा करूं शकेल ती खरी; संमतीच्या बिलामुळें त्याला कोणत्याही प्रकारें उपसर्ग लागणार नाहीं. बारा वर्षांच्या आंत फार झालें तर शेंकडा चार मुली ऋतुमती होतात, असें दिसून आलें आहे. तेव्हां संमतीच्या बिलामुळें गर्भाधान थोड्याशा लांबणीवर टाकावें लागलें, तर ते या चार मुलींकरितां टाकावें लागणार, व पंचवीस मुलींपैकीं एका मुलीच्या संबंधानें हें बिल आमच्या धर्मास बाधक झालें असें होणार. पण ही गोष्ट कबूल करण्यापूर्वी पहिला ऋतु प्राप्त झाल्यावर गर्भाधान केलेंच पाहिजे, असा शास्त्राधार दाखविण्यांत आला पाहिजे, इतकेंच नाहीं, तर तें न केलें असतां, जे दंड सांगितले आहेत त्यांची मातब्बरी आणि तें न करण्यापासून होणारे फायदे यांचा शांतपणें विचार करून, शास्त्रकर्त्यांस कोणता मार्ग विशेष संमत आहे, हें निःपक्षपातानें ठरविलें पाहिजे. जो कोणी इतकी खटपट प्रामाणिकपणानें करील त्याला आमचे वेडेंवाकडें धर्मशास्त्र देखील **संमति बिलाचे तत्त्वास बिलकूल प्रतिकूल** नाहीं, असें खचित दिसून येणार आहे. कारण, पहिल्या ऋतूंतच गर्भाधान केलें पाहिजे, अशा अर्थाचें फक्त एक वाक्य आहे, व तें कोणी तरी अलीकडे धर्मशास्त्रांत घुसडून दिलें असावें, असें स्पष्ट दाखवितां येत आहे. कसें तें पहा. **आश्वलायनाच्या** नांवावर विकणाऱ्या स्मृतींत पुढील वाक्य आढळतें:-

गर्भाधानं द्विजः कुर्यादृतौ प्रथम एव हि।
चतुर्थदिवसादूर्ध्वं पुत्रार्थी दिवसे समे॥

अर्थ- "प्रथम ऋतुदर्शन होऊन ४ दिवस लोटल्यावर, ब्राह्मणानें गर्भाधान करावें, पुत्र पाहिजे असल्यास सम दिवशीं करावें" अनंतदेवानें "आश्वलायनाचें म्हणून" हें वाक्य आपल्या ग्रंथांत उतरून घेतलें आहे. अनंतदेवाखेरीज इतर अनेक निबंधकारांनीं यासंबंधानें व इतर संबंधानें **आश्वलायनस्मृतींतील** अनेक उतारे घेतले आहेत; पण त्यांपैकीं एकाच्या ग्रंथांतही हें वाक्य उतरून घेण्यांत आलेलें नाहीं. इतकेंच नाहीं, तर ज्या **आश्वलायनस्मृतींत** अनंतदेवानें उतरून घेतलेलीं दुसरीं वाक्यें सांपडतात, त्या **आश्वलायनस्मृतींत** अनंतदेवाखेरीज इतर निबंधकारांनीं आश्वलायनाची म्हणून आपल्या ग्रंथांत उतरून घेतलेलीं वाक्येंही सांपडत नाहींत! तेव्हां अनंतदेवाची **आश्वलायनस्मृति** आणि इतर निबंधकारांची **आश्वलायनस्मृति हे** भिन्न ग्रंथ असले पाहिजेत, हें सिद्ध होतें. या भानगडीवरून निदान आमचा तरी असा तर्क होत आहे की, ही अनंतदेवास सापडलेली

**आश्वलायनस्मृति** त्याच्याच डोक्यांतून निघाली असावी, व कांहीं विशेष हेतु साधण्यासाठीं त्यानें हें **पुण्यछद्म** ऊर्फ **धर्मकपट** केलें असावें! या खोट्या अथवा बनावट **आश्वलायनस्मृतीची** एक प्रत डॉ. भांडारकर यांचेजवळ आहे. अनंतदेवाखेरीज दुसरे सात आठ निबंधकार ज्या आश्वलायन स्मृतीचा उल्लेख करतात; तिच्याशीं ही ताडून पाहिली असतां उभयतांत कांहींच साम्य दृष्टीस पडत नाहीं. तेव्हां बाकीच्या निबंधकारांचा **आश्वलायन खरा** आणि अनंतदेवाचा **आश्वलायन तोतया** असें समजणें भाग आहे! आमच्या समजुतीनें डॉ. भांडारकर यांची ही विचारशैली निरुत्तर आहे, व टिळक वगैरे जे लोक आश्वलायनाच्या स्मृतीवर म्हणजे या अविश्वसनीय साक्षीदाराच्या बनावट ग्रंथावर आपल्या पक्षाचा व्यूह रचीत आहेत, ते जाणूनबुजून किंवा चिवट मूर्खपणामुळें असत्यपंथास लागले आहेत, असें वाटतें. सामर्थ्य असेल तर त्यांनीं ही **आश्वलायनस्मृति** खरी आहे, हें अगोदर सिद्ध करून द्यावें, आणि मग वादास उभें रहावें.

या एका बनावट स्मृतीशिवाय दुसऱ्यां कोणत्याही सर्वमान्य स्मृतींत किंवा प्रसिद्ध निबंधकारांच्या ग्रंथांत गर्भाधान पहिल्या ऋतूंत केलेंच पाहिजे, असे धर्मवादी सिद्ध करून दाखवतील, तर त्यांचा आग्रह किंचित् विचारणीय होणार आहे. अगदीं अलीकडील ग्रंथांत आणखी असें एक वाक्य सापडतें कीं, "**प्रत्येक ऋतूस नवऱ्यानें आपल्या बायकोकडे जावें**" नवऱ्याला बायकोकडे जावयाचें असल्यास त्यानें ऋतुकालीं जावें अशी जी सामान्य धर्माज्ञा होती; तिचा टीकाकारांनीं पुढें असा अर्थ काढला कीं, प्रत्येक ऋतूस आपल्या स्त्रीकडे गेलेंच पाहिजे; न गेल्यास भ्रूणहत्त्येचें पातक त्याच्या कपाळीं येतें! अर्थात् साऱ्याच ऋतूंविषयीं हें विधान करून टाकल्यामुळें, पहिल्या ऋतूंत स्त्रीगमन न करणाराही गर्भघातक होतो, हें उघडच आहे. तेव्हां जुन्या लोकांच्या समजुतीप्रमाणें पहिल्या ऋतूंतच गर्भाधान केलें पाहिजे, व न करील त्याला भ्रूणहत्या गांठणार, हें निर्विवाद झालें! पण हें संकट केवळ अपरिहार्य नाहीं. गर्भधानसंस्काराचीं दोन अंगें आहेत, एक प्राजापत्य म्हणजे होम वगैरे; दुसरें, खरें गर्भाधान म्हणजे रात्रीं ऋतुमती स्त्रीकडे तिच्या नवऱ्यानें जाणें. ज्याला धर्माप्रमाणें सर्व संस्कार करावयाचे असतील त्यानें पहिल्या ऋतूस अनुकूल दिवस पाहून तेवढा प्राजापत्य होम तरी उरकून घेतला पाहिजे. गर्भाधान पुढल्या कोणत्याही पाळीस अनुकूल रजनी पाहून करण्यास हरकत नाहीं, अशी स्पष्ट शास्त्राज्ञा आहे. पण प्रस्तुत वादांतील टिळकप्रभृति हट्टी लोकांस हा शास्त्राधार फारच बाधक असल्यामुळें हे दोनही विधी एकेच दिवशीं उरकले पाहिजेत, असें निराधार प्रतिपादन ते करीत आहेत. त्यांच्या प्रतिपादनास कांहीं आधार असल्यास तो चालू संप्रदायाचा आहे; शास्त्राचा नाहीं. शास्त्रांत

प्राजापत्य आणि गर्भाधान हे पृथक् विधि समजून ते पृथक् दिवशीं करावे, असें स्पष्ट सांगितलें आहे. **'अथर्तुमत्यः प्राजापत्यमृतौ प्रथमेऽनुकूलेऽहनि'** असें म्हणून पुढे **'अथ गर्भलभनमृतौ अनुकूलायां निशि'** असें म्हटले आहे. **हे आश्वलायन गृह्याच्या** नारायणभट्टकृत परिशिष्टांतील वाक्य आहे. नारायणभट्टानें गर्भाधानसंस्काराचे दोन भाग कल्पून पाहिल्यास **प्राजापत्य** व दुसऱ्यास **गर्भलभन** अशीं नांवें दिली आहेत, आणि नंतर त्यांतील विधींचें वर्णन केलें आहे. तें करतांना "आतां प्राजापत्याविषयीं:- हा विधि पहिला ऋतु प्राप्त झाला असतां अनुकूल दिवस पाहून करावा" याप्रमाणें याचें वर्णन झाल्यावर "आता गर्भलभनाविषयीं :- हा विधी ऋतुकालीं अनुकूल रात्र पाहून करावा" असें म्हटलें आहे. यावरून प्राजापत्यहोम पहिल्या ऋतूस योग्य मुहूर्तावर केलाच पाहिजे; गर्भाधान म्हणजे स्त्रीपुरुषांचा संयोग कोणत्याही पाळीस सवडीप्रमाणें करण्यास हरकत नाहीं, असा उत्तान अर्थ असून टिळक वगैरे लोकांनीं व्याकरणाकडे, वाक्यरचनेकडे, किंवा वाचनाच्या ओघाकडे लक्ष न देतां, चालू संप्रदायाशीं त्याची संगति जुळवून देण्यासाठीं ओढून ताणून त्याचा अर्थ केला आहे कीं, ज्या दिवशीं **प्राजापत्य** करावयाचें, त्याच दिवशीं **गर्भाधान** झालें पाहिजे. या वचनाचा असा अर्थ असता तर "अथ" व "अनुकूल" या शब्दांचा पुनरुच्चार करावयाला नको होता; तसेंच "ऋतु" शब्द मुळींच घालायाला नको होता, किंवा त्याच्या पाठीसागें "प्रथम" हें विशेषण तरी फिरून घालायला पाहिजे होतें. हे दोनही विधि चालू संप्रदायाप्रमाणें एकेच दिवशीं झाले पाहिजेत, असें लिहिण्याचा नारायणभट्टाचा आशय असता, तर "योग्य दिवस पाहून", व "योग्य रात्र पाहून" अशी द्विरुक्ति त्यानें केली नसती; हे किंवा दोनही विधि एकेच दिवशीं व्हावे अशी त्याची इच्छा असती, तरी "योग्य दिवस" आणि "योग्य रात्र" असा भेद तो कशाला करता? आपण असा भेद सध्यांच्या प्रचारांत मुळींच करीत नाहीं. अमुक मुहूर्त गर्भाधानाला चांगला आहे, असें ठरविलें म्हणजे तो दोनही विधि उरकण्यास ठीक आहे असें आपण समजतों. म्हणतांना "चांगला दिवस पहा" येवढेंच म्हणतों; व होमाला जो दिवस प्रशस्त असेल त्याचीच रात्र गर्भाधानाला प्रशस्त असें समजून फक्त "दिवस" हुडकण्याबद्दल पंचांग चाळतों. त्याच दिवसाची "रात्र" गर्भाधानास अनुकूल असेल किंवा नाहीं, अशी शंकाही आमच्या मनांत येत नाहीं, म्हणून आम्ही रात्रीविषयीं कधींच उल्लेख करीत नाहीं. पण नारायणभट्टाचें तसें म्हणणें नाहीं. त्यावर लोकसांप्रदायाची थोडीथोडी छाया पडूं लागली होती, पण तो आमच्या इतका त्याचा बंदा गुलाम होऊन गेला नव्हता. सुश्रुतवाग्भटादि-शारीरकोविदांची वाक्यें त्याच्या डोळयापुढें उभीं असल्यामुळें,

सुपुत्रेच्छु पुरुषांनीं पहिल्याच ऋतुकालीं गर्भाधानासाठीं रतिगृहात संगत व्हावे, हें त्यास बरें वाटलें नसावें, व म्हणूनच त्यानें होमविधि, प्रथम ऋतूस एखाद्या चांगल्या दिवशीं उरकून टाकून, पुढें योग्य वाटेल त्या पाळीस स्त्रीपुरुषांनीं चांगली रात्र पाहून रत्युपभोगासाठीं संगत व्हावें, असा शास्त्रार्थ दिला असावा, हें उघड आहे. असें केल्यानें धर्मशास्त्राचें उल्लंघन न करतां शारीरकशास्त्राच्या आज्ञा पाळण्याची सवडही त्यानें करून ठेवली, असें डॉक्टर भांडारकर याचें जें म्हणणें आहे, त्यावर धर्मशास्त्रदृष्ट्या किंवा व्याकरणदृष्ट्या प्रतिकूल कोटिक्रम करणें अशक्य आहे. पण ज्यांना खोट्या धर्माभिमानानें पक्कें घेरलें आहे, किंवा ज्यांना चालू संप्रदायास शास्त्राधार आहे असें दाखवून, अडाणी लोकांस सरकाराविरुद्ध क्षुब्ध करावयाचें आहे, त्यांना व्याकरणाशीं, संगतीशीं, किंवा शास्त्रार्थाशीं हवें तसें बागडणारांच्या पदरीं अप्रमाणिकपणा किंवा मूर्खपणा येतो, हें कसें समजणार? व समजलें तरी ते आपली चूक कोठून कबूल करणार?

यावरून पहिल्या पाळीसच गर्भाधान केलें पाहिजे, किंवा होम आणि गर्भाधान हे विधि पृथक्काली करतां येणारच नाहींत असें नाहीं, हें उघड होतें. पण आमच्या प्रतिपक्ष्यांस ती गोष्ट कोठून रुचणार? त्यांना बारा वर्षांच्या आंतील वयाचे मुलीस नहाण आलें असलें तरी पहिल्याच खेपेस तिचें गर्भाधान केलें पाहिजे, न केल्यास शास्त्रोल्लंघन होतें, असें स्थापण्याची आवश्यकता आहे; तसें केल्याखेरीज सरकारानें आमच्या धर्मांत हात घातला अशी ओरड त्यांस करतां येत नाहीं; तेव्हां त्यांनीं कित्येक लोकांत व प्रांतांत पहिल्या पाळीसच होम व गर्भाधान करण्याची जी चाल पडली आहे तीच पूर्णपणें शास्त्रसंमत आहे, व त्या चालीच्या विरुद्ध जाणें हें केवळ अशास्त्र नसलें तरी गौण आहे, आणि आपत्कालाखेरीज तसें करणें उचित नाहीं, व जेव्हां निरुपायास्तव तसें करणें भाग पडेल तेव्हां प्रायश्चित्ताशिवाय मुक्ति नाहीं, असें दाखविण्याची खटपट चालविली आहे. आमच्या मतें या प्रकरणांत शास्त्र व रूढि यांची उत्कृष्ट संगति कोणासही घालून देतां येणार नाहीं. संमतीच्या बिलास रूढीपेक्षां शास्त्र विशेष अनुकूल आहे, तरी रूढीही सर्वांशीं प्रतिकूल नाहीं.कारण पुष्कळ लोकांत गर्भाधानविधी मुळींच करीत नाहींत, किंवा तो पाहिजे तेव्हां करितात असें असून त्यांस कोणी वाळीत टाकीत नाहीं, किंवा प्रायश्चित्त घेण्यास लावीत नाहीं. पण हा सर्व खरा प्रकार धर्माच्या नांवावर गिल्ला करून अडाणी लोकांस सरकाराविरुद्ध चिथाविणाऱ्या भोंदू धर्मनिष्ठांस कोठून मानवणार? कोणाच्याही हातून वेळच्या वेळीं गर्भाधान न घडल्यास जें पाप होतें त्याचें क्षालन पांचचार आण्यांनीं किंवा शेंपन्नास प्राणायामांनीं करतां येण्याची ज्यांनीं सवड ठेविली आहे त्यांच्या दृष्टीनें तें पाप किती दर्जाचें

असेल, हें कां या भोंदूस समजण्याची अक्कल नाहीं? हवी तितकी आहे! पण त्यांना कोठें खरें समजण्याची गरज आहे? शास्त्रांतून हुसकून लाविलें म्हणजे रूढीच्या आड दडावें, व रूढीच्या मैदानांत चोप बसला कीं, शास्त्राच्या पाठीमागें दडी द्यावी, असा यांनीं पळापळीचा व लपंडावीचा प्रकार चालविला आहे, येवढें सुज्ञ वाचकांच्या नजरेस आले असेल, तर या संबंधानें आम्हीं आपलें कर्तव्य बजावलें, असें आम्हांस वाटणार आहे. यापलीकडे या धर्मवादांत पडण्याची आमची इच्छा नाहीं; कारण, संमतीच्या बिलाचें लीलेनें मंडन करतां येण्यासारखे आमच्या भात्यांत याहून खाशा नेमाचे दुसरे पुष्कळ बाण आहेत!



# महाराष्ट्रीयांस अनावृत पत्र

प्रिय देशबांधवहो, संमतीच्या बिलाच्या संबंधानें **सुधारकांत** अलिकडे आलेल्या कांहीं निबंधांतील भाषेची तीव्रता पाहून, तुम्हांपैकीं कित्येकांचीं मनें त्यावर रुष्ट झालीं असतील यांत संशय नाहीं. न्यू इंग्लिश स्कूल, डेक्कन एज्युकेशन सोसायटी व फर्ग्यूसन कॉलेज वगैरे लोकोपयोगी संस्थांची स्थापना व उत्कर्ष, त्याप्रमाणेंच **मराठा** आणि **केसरी** पत्रांचा अवतार, प्रसार, आणि करवीर प्रकरण वगैरे गोष्टींशीं या पत्राच्या नम्र लेखकाचा व रा. रा. बाळ गंगाधर टिळक यांचा असलेला संबंध ज्यांना ठाऊक आहे; व हे दोघे इसम बरींच वर्षे एकमेकांशी कसें वागत होते हें ज्यांनीं पाहिलें आहे, त्यांना **सुधारकासारख्या** नवीन पत्राचें जनन, रा. टिळक व पाटणकर यांचा पहिल्या तीन संस्थांशीं नुकताच घडून आलेला विश्लेष, व प्रस्तुत वादांत **सुधारक** आणि **केसरी** पत्राच्या चालकांनीं प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें एकमेकांवर चालविलेला भडिमार पाहून, या उभयतांच्या बेबनावास व फुटाफुटीस झालेलीं कारणें त्यांस ठाऊक नसल्यामुळें, विषाद वाटणें हें फार स्वाभाविक आहे. पण रा. टिळकांस तीं कारणें अवगत असतां, ज्या पत्राचें आधिपत्य त्यांचेकडे आहे त्याच्या गेल्या अंकांत ''ज्यांना वादांत स्वपक्षाची उणीव झांकण्यासाठीं परपक्षावर, आणि विशेषत: त्यांतील एकदोन व्यक्तींवर, अपशब्दरूपी गोळीबार करणें हीनपणाचें वाटत नाहीं; त्यांची कानउघाडणी करण्याच्या नादास लागणेंही व्यर्थ होय. सार्वजनिक विषयावर वादविवाद करण्याच्या मिषानें खासगी द्वेषाचें उट्टें काढण्याची अमूल्य संधि क्वचितच मिळते.'' अशीं दोन वाक्यें आहेत. हीं वाक्यें जेव्हां आमच्या नजरेस पडलीं तेव्हां मात्र आम्हांस मोठा विस्मय वाटला! टिळक आणि आगरकर यांचा **खासगी द्वेष**! आणि तो कशासाठीं? टिळक आगरकरांचे किंवा आगरकर टिळकांचे कांहींएक लागत नाहींत, आणि म्हणून एकाला दुसऱ्याचा ''खाजगी द्वेष'' करण्याचें कारण आजपर्यंत झालेलें नाहीं; इतकेंच नाहीं, तर त्यांपैकीं निदान एकाच्या मतानें तरी तें केव्हांच होण्याचा संभव नाहीं. त्या दोघांचा बेबनाव व फुटाफूट होण्यास ज्या समाईक संस्थांचे ते दोन सेवक होते; त्या संस्था चालविण्याच्या पद्धतीविषयी व त्यांच्या उत्कर्षाच्या साधनांविषयी कोणत्याही रीतीनें

एकवाक्यता न होणारा त्यांचा मतभेद कारण झाला, व याच मतभेदामुळें प्रस्तुत वादांत ते एकमेकांची मुर्वत न ठेवतां, आपापल्या मतांचा आणि पक्षाचा विजय होण्यासाठीं अन्योन्यांवर तुटून पडत आहेत; दुसरें कांहीं नाहीं! अशा रीतीनें आपापल्या देशाविषयक विचारांचे प्राबल्य स्थापण्यासाठीं अंत:करणपूर्वक झुंजणाऱ्या लढवय्यांचें संग्रामचातुर्य पाहत राहून व कौतुक करावयाचें तें विसरून जाऊन, अशा युद्धप्रसंगीं केवळ कर्णकटु टणत्कारांच्या श्रवणावरूनच प्रेक्षकांनीं 'एकाला दुसऱ्याचा मत्सर उत्पन्न झाला आहे' किंवा कोणी कोणाचें 'खासगी द्वेषाचें उट्टें काढून घेत आहे' असा कुतर्क करणें, अत्यंत अनुदार होय! एका जननीच्या उदरांतून अवतरलेल्या सहोदरांत देखील जर भांडण किंवा मतभेद झाल्याशिवाय राहत नाहीं, तर ज्यांचा एकमेकांशीं कोणत्याही प्रकारचा कुलसंबंध नाहीं, व ज्यांनीं राजसेवेचा सामान्य मार्ग सोडून देऊन आपापल्या मनास प्रशस्त वाटेल त्या रीतीनें; आपल्या हयातींत आपल्या हातून होईल तेवढें देशकार्य करण्याचा निश्चय केला आहे, त्यांचे विचार सर्वांशीं न जुळणें, व ज्याला त्याला प्रसंगविशेषीं आपापल्या विचारांचा पराकाष्ठेचा अभिमान उत्पन्न होऊन, एकदां उभयतांनीं आरंभिलेल्या सामान्य गोष्टींस आमरण चिकटून राहणें; स्वत:स किंवा इतरांस सुखास्पद व कल्याणप्रद होणार नाहीं, अशी खात्री झाल्यामुळें ज्याच्या मनास जी दिशा अत्यंत आक्रमणीय वाटेल त्यानें ती धरणें, यांत नवल वाटण्यासारणें काय आहे, हें आम्हांस समजत नाहीं! बांधवहो, विचारकलहाला तुम्हीं इतके कशासाठीं भितां? दुष्ट आचाराचें निर्मूलन, सदाचाराचा प्रसार, ज्ञानवृद्धी, सत्यसंशोधन व भूतदयेचा विचार इत्यादि मनुष्यांच्या सुखाची वृद्धि करणाऱ्या गोष्टी विचारकलहाखेरीज होत नाहींत. आजपर्यंत या देशांत हा कलह माजावा तितका कधीच न माजल्यामुळें, व बहुधा आमचे लोक 'गतानुगतिक'च असल्यामुळें, हें भरतखंड इतकीं शतकें अनेक प्रकारच्या विपत्तींत खितपत पडलें आहे! हा विचारकलह दुष्ट विकोपास जाऊं न देण्याविषयीं मात्र खबरदारी ठेवली पाहिजे. नाहींतर त्यापासून पुढें खऱ्या लढाया आणि रक्तस्राव होण्याचा संभव असतो. सुधारक आणि दुर्धारक, चपल सुधारक आणि मंद सुधारक, थंडे सुधारक आणि गरम सुधारक अथवा नानाप्रकारच्या मतांचे नवे आणि जुने लोक; यामध्यें सांप्रतकालीं जी दुही माजून राहिली आहे, ती पाहून घाबरून जाण्याचें किंवा देशावर कांहीं तरी प्रचंड संकट गुदरणार आहे, असें मानण्याचें बिलकूल कारण नाहीं! पाश्चिमात्य शिक्षणामुळें ज्या दिवशीं या वादास आरंभ झाला; तो दिवस हिंदुस्थानच्या भावी इतिहासांत महोत्सव करण्यासारखा होईल. त्या दिवशीं अनेक शतकें गाढ निद्रेंत घोरत पडलेला हिंदुस्थान देश किंचित् जागा होऊन चावळूं

लागला, किंवा प्रेतावस्थ झालेल्या त्याच्या विस्तीर्ण देहांत ईशकृपेनें पुन: एकवार चैतन्यावतार झाला, असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्या दिवशीं त्याचें स्थाणुत्व नाहींसें होऊन त्याला जी यत्किंचित् गति मिळाली; ती प्रतिवर्षी अगदीं नव प्रमाणांत कां होईना, पण सारखी वाढत आहे, व जों जों हा विचारकलह निकराचा होऊं लागेल तों तों ती झपाट्यानें होऊं लागणार आहे. आतां किती झालें, तरी कलह तो कलह! तो कशाही प्रकारचा आणि कितीही सौम्य असला तरी त्यांत अप्रिय असें कांहींच नाहीं, असें कोठून होणार? ज्या दोन मनुष्यांचा परस्परांशी संबंध आहे, त्यापैकीं एक दुसऱ्याच्या विरुद्ध जाऊं लागला म्हणजे कधीं त्या दोघांस एकमेकांशीं वर्दळीस यावें लागेल; कधीं एकमेकांवर शब्दप्रहार करावे लागतील; कधीं उभयतांनीं आरंभिलेल्या कामांतून अंग काढून घेऊन विलग व्हावें लागेल; कधीं पदराला बराच खार लावून घ्यावा लागेल; किंवा जिवाकडे न पाहतां अहोरात्र मानसिक शारीरिक कष्ट करावे लागतील; पण जोंपर्यंत आपण आपल्या विचाराच्या विजयासाठीं व प्रसारासाठीं भांडत आहों, असें प्रत्येकाच्या मनांत वागत राहील; तोपर्यंत न्यायसभेत पक्षकाराचें भांडण भांडणाऱ्या वकिलाच्या दिखाऊ वैराच्या फार पलीकडे अशा दोन व्यक्तींचें वैर जाईल असें आम्हांस वाटत नाहीं, व आगरकर आणि टिळक यांच्या वैराचें स्वरूप याहून भयंकर नाहीं; असें निदान त्यांपैकीं एकाला तरी वाटत आहे. तसेंच या वैरामुळें या दोघांच्या व्यासंगांत जें अंतर पडलें आहे, तें कमी न होतां कदाचित् अधिकच होत जाण्याचा जरी संभव आहे; तरी जेव्हां खुद्द आगरकरांच्या किंवा आगरकरांच्या निकट आप्तांच्या डोळ्यांस पाणी येण्यासारखी कांहीं अनिष्ट गोष्ट घडेल तेव्हां इतरांपेक्षां टिळकांस, व जेव्हां टिळकांचे घरीं तसा अनिष्ट प्रकार घडेल तेव्हां आगरकरांस, विशेष वाईट वाटून डोळ्यास पाणी येईल, व मतभेदामुळें उत्पन्न झालेल्या वैराचा एका क्षणांत विसर पडून, एक दुसऱ्याला मदत करण्यास सहज प्रवृत्त होईल!

धर्म, राज्य, व समाज यासंबंधानें अलीकडे हे औपपत्तिक सिद्धांत सर्वमान्य होऊन बसले आहेत. त्यांविषयीं आम्हां उभयतांत म्हणण्यासारखा मतभेद नाहीं. मनुष्याच्या बुद्धीचे व्यापार इंद्रियाधीन असल्यामुळें या बुद्धीस ब्रह्मांडाच्या आदिकारणांचें किंवा परमेश्वराचें यथार्थ ज्ञान होण्याचा संभव नाहीं, हें धर्मतत्त्व मनांत बाळगून धर्मकल्पनांत किंवा धर्माचारांत जे फेरफार करावयाचे ते करीत गेलें पाहिजे; राजकीय स्वातंत्र्य असल्याशिवाय कोणत्याही देशांत ऐहिक सुखाची परमावधि व्हावयाची नाहीं; पाश्चिमात्य शिक्षणाचा प्रसार आणि इंग्लिश लोकांचें साहाय्य असल्याशिवाय आमचें डोकें वर निघण्याचा संभव नाहीं, या करितां

राजनिष्ठा यत्किंचित् ढळूं न देतां, राजकीय हक्क संपादण्यासाठीं जें करणें असेल तें आम्हीं केलें पाहिजे; नीतिप्रसार, संपत्युत्पादन, आरोग्यरक्षण वगैरे अनेक महत्त्वाच्या गोष्टी ज्ञानाधीन असल्यामुळें, लोकशिक्षणाचें काम जितक्या झपाट्यानें चालवेल तितक्या झपाट्यानें चालविलें पाहिजे; जातिभेद नाहींसा झाला पाहिजे; स्त्री-पुरुषांच्या ज्ञानांत व स्वातंत्र्यांत जेवढें अंतर राहूं देणें अपरिहार्य असेल, तेवढ्याहून अधिक राहिल्यास पूर्ण संसारसुख प्राप्त होण्याचा संभव नाहीं, म्हणून स्त्रियांची उन्नति करण्याबद्दल रात्रंदिवस झटलें पाहिजे- वगैरे धार्मिक, राजकीय व सामाजिक विषयासंबंधानें स्थूल औपपत्तिक सिद्धांत जसे एकाला तसे दुसऱ्याला संमत आहेत. दोघांत जो मतभेद पडतो; तो आज तारखेस ते सिद्धांत अंमलांत आणण्यासाठीं काय करतां येईल व ते कोणत्या साधनानें करतां येईल, या संबंधानें पडतो. या घटकेस साध्य असलेल्या सुधारणेची इयत्ता आणि तिचीं साधनें याविषयीं टिळकांचे बहुतेक विचार सामान्य लोकांस मान्य होण्यासारखे असल्यामुळें, किंवा त्यांस मान्य असलेल्या विचाराबाहेर जाण्यास टिळक तयार नसल्यामुळें, त्यांचें वर्तन **भवभूतीनें** रामचंद्राकडून वदविलेल्या-

स्नेहं दयां च सौख्यंच यदि वा जानकीमपि
आराधनाय लोकानां मुंचतो नास्ति मे व्यथा।।

**अर्थः**- 'स्नेह, दया, सौख्य, फार तर काय; लोकांच्या संतोषासाठीं मला जानकीचा देखील त्याग करावा लागला, तरी त्याबद्दल खेद वाटणार नाहीं!' या श्लोकार्थाप्रमाणें होत आहे, व या क्षणीं ते अत्यंत लोकप्रिय झाले असून, प्रत्येकाच्या तोंडांतून त्यांचें नांव निघत आहे. पण लोकांना आज ज्या गोष्टी प्रिय आहेत त्या या हतभाग्य लेखकास पसंत नसल्यामुळें, लोकछंदानुवर्तन त्याला अशक्य झालें आहे; इतकेंच नाहीं, तर लोकांस अप्रिय परंतु पथ्यकारक असे विचार त्यांच्या मर्जीविरुद्ध पुन: पुन: त्यांचेपुढें आणणें हेंच आपलें कर्तव्य व जीविताचें सार्थक अशी त्याची दृढ कल्पना झाली असल्यामुळें, धार्मिक व सामाजिक गोष्टींत आपलें ज्ञान **विकटोपर्यंत** जाऊन पोहोंचलें आहे, व तत्संबंधक आचारांत सुधारणा करण्यास म्हणण्यासारखी जागा राहिलेली नाहीं, निदान त्या कामास सरकाराचें किंवा कायद्याचें साहाय्य घेतलें असतां सर्वथैव नुकसान होणार आहे असें समजणाऱ्या श्रद्धालू, पंडितंमन्य, व देशाभिमानी म्हणवून घेणाऱ्या जनसमूहाच्या उपहासाचें आणि रोषाचें स्थान, त्यानें आपणांस करून घेतलें आहे. तथापि त्याला असा भरंवसा आहे कीं, म्हणण्यासारखी द्रव्यानुकूलता नसतां, श्री. शिवाजीराव महाराज होळकरांनीं देऊं केलेली दरमहा पाचशें रुपयांची नोकरी ज्यानें ''मला नको'' म्हणून सांगितलें; विशेष बुद्धिसामर्थ्य किंवा शरीरसामर्थ्य नसतां, आज

दहा अकरा वर्षें, जो उत्साहपूर्वक शिक्षकाचा आणि लेखकाचा धंदा करीत आहे; कवडीची किफायत नसतां, ज्यानें सात आठ वर्षें सर्वत्र प्रसिद्ध **केसरी** पत्राचे बऱ्या वाईट रीतीनें "रकानें" भरून काढले; इतकेंच नाहीं, तर एका दुर्दैवी संस्थानिकास सुदशा यावी, येवढ्याच बुद्धीनें लिहिलेले लेख न्यायाधीशास अप्रशस्त वाटल्यामुळें त्यांनीं दिलेली शिक्षा त्यानें आनंदानें साहिली; हातीं असलेल्या पत्राचे मालक शुद्ध वाटेल ते लिहूं देत नाहींत असें दिसून आल्याबरोबर; त्यांच्या धमकावण्याकडे बिलकूल लक्ष न देतां समानशीलाच्या व विचारांच्या मित्राचें प्रोत्साहन व साहाय्य मिळतांच, सर्वतोमुखी निंदा होत असलेल्या **सुधारणेचा** आणि **सुधारकांचा** पक्ष लोकांस वाटत असल्याप्रमाणें दुर्बल नाहीं, इतकेंच नाहीं, तर त्याचेंच अखेरीस सर्वत्र साम्राज्य होणार आहे असें युक्तिवादानें सिद्ध करून देण्यासाठीं कोणत्याही गोष्टीची अनुकूलता नसतां, व लोकमत धडधडीत विरुद्ध असतां नवीन पत्राच्या नसत्या उठाठेवींत जो जाणूनबुजून पडला; रूढ धर्माचारांतील आणि लोकाचारांतील व्यंगांचें निर्भयपणें आविष्करण करण्याचें भयंकर पाप हातून घडत असल्यामुळें, देशाभिमानी व धर्माभिमानी म्हणविणाऱ्या पत्रांकडून होत असलेला शिव्यांचा व शापांचा प्रचंड भडिमार ज्याला व ज्याच्या निरपराधी स्त्रीला एकसारखा सोसावा लागत आहे; स्वमताचें मंडन व तदनुसार होईल तेवढें वर्तन करण्यासाठीं, आपल्या फार दिवसांच्या मित्रांचाचसा काय, तर रात्रंदिवस काळजी वाहून आणि कडेवर व खांद्यावर खेळवून, ज्यांनीं लहानाचें थोर केलें अशा अत्यंत ममताळू व पूज्य आप्तांचाही दीर्घ रोष ज्यानें आपणांवर करून घेतला आहे- अशा मनुष्याच्या लेखांत कितीही प्रमाद होत असेल व केवढीही कटुता असली; तरी ते समंजस मनुष्याच्या स्वल्प आदरांस, निदान थोड्याशा अनुकंपेस तरी पात्र झाले पाहिजेत. "हा वेडापीर इतके हाल, संकटें व लोकापवाद सोसून ज्या अर्थी इतकी धडपड करीत आहे, त्या अर्थी ती लोकांस अंतीं हितावह होईल अशी निदान याच्या मनाची तरी खात्री झाली असावी," असा विचार त्यांच्या मनांत येऊन त्यांनीं त्याच्या दोषाबद्दल त्यास क्षमा केली पाहिजे. त्यांनीं तसें केलं तर ठीकच आहे; पण नाहीं केलें, तरी त्यास विशेषसें वाईट वाटण्याचा संभव नाहीं; कारण सारे जग त्यावर उलटलें तरी पुढील कविवाक्याचें स्मरण करून त्याला आपलें समाधान करून घेतां येतें.

> ये नाम केचिदिह नः प्रथयंत्यवज्ञाम्।
> जानन्ति ते किमपि तान्प्रति नैष यत्नः।।
> उत्पत्स्यतेऽस्ति मम कोपि समानधर्मा।

कालोह्ययं निरवधिर्विपुला च पृथ्वी।।

अर्थ:- खरोखरींच जे या गोष्टींत आमची निर्भर्त्सना करतात, त्यांना कांहींच समजत नाहीं, व त्यांच्याकरितां हा आमचा प्रयत्नही नाहीं. माझ्या शीलाचा एखादा इसम कोठें तरी असेल किंवा निपजेल: पृथ्वी अफाट आहे व काल अनंत आहे!

✷

बांधवहो, विचारकलहाला तुम्ही इतके कशासाठी भितां? स्पष्ट आचारांचें निर्मूलन, सदाचाराचा प्रसार, ज्ञानवृद्धि, सत्यसंशोधन व भूतदयेचा विचार इत्यादी मनुष्यांच्या सुखाची वृद्धि करणाऱ्या गोष्टी विचारकलहाखेरीज होत नाहीत. आजपर्यंत या देशांत हा कलह माजावा तितका कधींच न माजल्यामुळें, व बहुधा आमचे लोक 'गतानुगतिक'च असल्यामुळें, हें भरतखंड इतकीं शतकें अनेक प्रकारच्या विपत्तींत खितपत पडलें आहे! हा विचारकलह दुष्ट विकोपास जाऊं न देण्याविषयीं मात्र खबरदारी ठेवली पाहिजे.

—गो. ग. आगरकर

सुधारक आणि सुधारणा या शब्दांचा विपरीत अर्थ करून, त्याच्या भरांत तुम्ही त्यांविरुद्ध हवें तसें बहकूं लागलां आहांत; पण हें पक्कें ध्यानांत ठेवा कीं, मांसाहार, मदिरापान, व्यभिचार, अनृत भाषण, विश्वासघात, अप्रामाणिकपणा, क्रूरपणा वगैरे गोष्टी खऱ्या सुधारकांस तुम्हांपेक्षां अधिक निंद्य वाटतात. पण ही महापातकें कितीहि वाढलीं तरी त्याची तुम्हांस विशेष काळजी वाटत नाहीं. अशा प्रकारच्या पातकांत रात्रंदिवस पोहणारा मनुष्य तुमच्या दृष्टीनें अत्यंत धर्मनिष्ठ असून, त्याच्याशीं अन्नोदकव्यवहार करण्यासच काय,पण त्याच्या अंगुष्ठाचें तीर्थ घेऊन, आपल्या पापाचें क्षालन करून घेण्यास देखील तुम्ही तयार व्हाल! पण या घोर पातकांपैकी ज्याला एकाचाहि स्पर्श झाला नाहीं, असा एखादा ब्राह्मण, प्रभू किंवा सारस्वत शूद्राच्या हाताचें उघडपणें पाणी पिईल, एखाद्या ख्रिस्ती स्नेह्याच्या घरचीं चारदोन बिस्कुटें आणि पेलाभर चहा यांचें सेवन करील, किंवा अडचणीच्या वेळीं एखाद्या मुसलमानानें तयार केलेला भात खाईल, तर मात्र तुम्ही त्यास वाळींत टाकणार, व पंधरा पावल्या दिल्या कीं त्यावरील बहिष्कार काढून घेणार! काय धर्म! काय प्रायश्चित!! काय धर्मशास्ते!!! धिक् तुमच्या धर्माला, तुमच्या प्रायश्चित्ताला आणि तुम्हांला!

—गोपाळ गणेश आगरकर